ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेच्या प्रमाणांविषयीं

# हिंदुस्थानांतील तरुणांस पत्रें

भाषांतरकर्ता

रे० गणपतराव मल्हार.



मुंबई:

जावजी दादाजी यांचा "निर्णयसागर" छापखाना.

१९०३.

# PREFACE.

The following pages contain a translation into Marathi of an English work which states in a compact form the evidence, whether External, Internal or Experimental in support of the Christian religion.

It also examines, at considerable length, the evidence which is usually adduced in support of Hinduism, whether in its primitive, its philosophic or its popular form. The evidence for Muhammadanism is next somewhat more briefly examined, a short description is also given of most of the other great religions, both of ancient and modern times.

As the title shows, the book was written for the youth of India—especially for students in the colleges whether connected with Missions or Government. It is hoped that the style is sufficiently simple even for junior students.

The book is at present in the eleventh English edition. It has been translated into Bengali, Hindustani and several other Indian languages.

The Marathi version has been carefully executed by the Rev. D. G. Malhar of Poona.

The little book has been already useful; and it is the hope and prayer of the author and the translator that it may be made increasingly so.

On the great subject of religion, the mind of India is at present in a state of much bewilderment. May every reader of these Letters daily offer up the prayer that was offered many centuries ago, but which is as fitting now as it ever was : "Show me Thy ways, O Lord ; teach me Thy paths. Lead me in Thy truth and teach me ; for Thou art the God of my salvation, and on Thee do I wait all the day." (Psalm xxv. 4,5.)

J. MURRAY MITCHELL.

*Edinburgh,*
*7th May 1902.*

# भाषांतरकर्त्याची प्रस्तावना.

हें एका प्रसिद्ध इंग्रजी पुस्तकाचें भाषांतर आहे. हें काम इ० १८९० सालीं मीं हातीं घेतलें व इ० १८९२ सालापर्यंत यांतील पहिलीं सात पत्रें **मुंबई ट्रॅक्ट व बुक सोसायटीनें** छापून प्रसिद्ध केलीं.[१] पुढें सदरहू संस्थेस पैशाची तूट आल्यामुळें अवशिष्ट पत्रें तशींच पडून राहिलीं. त्यानंतर या पुस्तकाचे कर्ते **रे० डॉक्टर मरे मिचलसाहेबांनीं** मेहरबानीनें विलायतेहून द्रव्यसाहाय्य पाठविल्यामुळें **ट्रॅक्ट सोसायटीनें** हें पुस्तक समग्र छापून प्रसिद्ध करण्याचें पत्करिलें व आज बारा वर्षांमागें हातीं घेतलेलें काम तडीस गेलें ह्मणून मी ईश्वराची स्तुति करितों.

या पुस्तकांत ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेबद्दल जीं अंतर्बाह्य व अनुभविक प्रमाणें आहेत त्यांचा मुख्यत्वेंकरून समावेश केलेला आहे. तसेंच, यांत हिंदु, महमदी, व इतर अर्वाचीन व प्राचीन धर्मांचें संक्षेपानें परीक्षण केलें आहे. धर्मासारख्या अत्यंत महत्वाच्या विषयाकडे शाळा व पाठशाळा यांतून विद्याभ्यास करणाऱ्या तरुणांचें लक्ष्य लागावें या उद्देशानें **डॉक्टर मरे मिचलसाहेबांनीं** हें पुस्तक इंग्रजींत लिहिलें. त्याचा लाभ मराठी वाचकांस करून द्यावा ह्मणून मीं हा प्रयत्न केला आहे. भाषांतर कसें साधलें आहे हें ठरविण्याचें काम मी आपल्या सुज्ञ वाचकांकडेस सोंपवितों. या कामीं माझे प्रिय बंधु **रे० बाबा पदमनजी** यांनीं व इतर मित्रांनीं माझें जें साहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

या पुस्तकाचीं बंगाली, हिंदुस्थानी वगैरे देशभाषांतून भाषांतरें झालीं असून इंग्रजी पुस्तकाच्या अकरा आवृत्ति छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. यावरून हें पुस्तक किती लोकमान्य झालें आहे हें सहज लक्ष्यांत येईल. ख्रिस्ती शाळा व पाळकवर्ग यांतून या पुस्तकाचा उपयोग केला असतां apologetics "**ख्रिस्ती धर्ममंडन**" या महत्वाच्या विषयासंबंधानें तरुणांस बरीच माहिती होईल असें मला वाटतें.

**पुणें**, ऑक्टोबर ५, १९०२. **गणपत मल्हार.**

---

[१] हे भाग विक्रीस आहेत.

# अनुक्रमणिका.

## पत्र पहिलें.



## पत्र दुसरें.



## पत्र तिसरें.



## पत्र चौथें.

## पत्र नववें.



## पत्र दहावें.



## पत्र अकरावें.



## पत्र बारावें.

## पत्र तेरावें.



## पत्र चौदावें.



## पत्र पंधरावें.

---



# ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेच्या प्रमाणांविषयीं हिंदुस्थानांतील तरुणांस पत्रें.



## पत्र पहिलें.

### धर्माचें महत्त्व.

हीं पत्रें लिहिण्याचें प्रयोजन—हिंदुस्थानांत विद्येचा प्रसार—नानाप्रकारचे लोक व नानाप्रकारचे धर्म—धर्माचें अपार महत्त्व—सुशिक्षित तरुणांची धर्मस्थिति—धर्मोपेक्षक विद्यालयें—मिशनेरी विद्यालयें—धर्माची हेळसांड करण्याची लोकरूढि—या प्रकारचें वर्तन दोषयुक्त असून भयावह आहे—आमची श्रद्धा कशावर आहे या बाबतींत आमची जबाबदारी—मरण—तत्संबंधानें सज्ज असण्याचें अगत्य.

**प्रिय मित्र—,**

हिंदुस्थानांत विद्येचा प्रसार.

तुमच्या इच्छेनुरूप ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयीं पत्रद्वारा तुह्मांस लिहिण्यास मला मोठा आनंद वाटतो. प्रस्तुत काळीं जें धर्मसंबंधी औदासीन्य सर्वत्र दिसून येतें, तेणेंकरून माझें मन व मजसारख्या बहुतांचीं मनें चिंतेनें उद्विग्न झालीं आहेत. या देशांत विद्या प्राप्त करून घेणाऱ्या अशा आस्थेवाईक तरुणांची संख्या दिवसेंदिवस वाढत चालली आहे; इंग्लिश भाषेचा अभ्यासही उत्तरोत्तर वृद्धि पावत आहे, पाश्चिमात्य कला आणि विद्या यांच्यापुढें आज हजारों वर्षांपासून बिनदिक्कत चालत आलेल्या मतांचा लोप व ऱ्हास होत चालला आहे. या ज्ञानाची जी भरती येत आहे तिला कोणीं मागें सारीन ह्मटलें ह्मणजे त्याच्या प्रवाहाच्या वेगानें वाहून जाणें, एवढें मात्र व्हावयाचें, अशी कांहीं विलक्षण शक्ति त्यामध्यें आहे.

अशा प्रकारचीं विद्यावृद्धीचीं चिन्हें पाहून चित्तास मोठें समाधान वाटतें. जें कांहीं ज्ञान एतद्देशीय तरुणांनीं संपादन केलें आहे तें निःसंशय त्यांस भूषणार्ह आहे. ह्या विद्याभिलाषी तरुणांचे मनांमध्यें ज्ञानाविषयीं अकृत्रिम प्रेम उत्पन्न झालें असेल अशी मी आशा करितों. सत्यावर निष्ठा ठेवणें हीच थोर मनोवृत्ति, सत्याचा शोध करणें व आपल्यास सत्य सांपडल्यावर तें इतरांस कळविणें हाच थोर उद्योग. तर प्रस्तुत काळीं या देशांतील तरुण ज्या अनेक विद्या प्राप्त करून घेतात त्यांतील सत्याच्या शोधार्थ त्यांचे हातून प्रयत्न होतील अशी आशा बाळगून मी आपल्या मनाचें समाधान करून घेतों.

परंतु आणखी एक विषय आहे; त्याच्या महत्त्वाच्या परिमाणानें तरुणांचें लक्ष्य त्याकडे जितकें लागावें तितकें लागल्याचें दिसत नाहीं. हा विषय कोणता ह्मणाल तर धर्म.

नानाप्रकारचे लोक.

हिंदुस्थानांतील मोठमोठाल्या शहरांतून निरनिराळ्या जातींचे लोक रहातात. ते आपापल्या रीति, रिवाज, वर्ण आणि पेहराव यांकडून परस्परांपासून भिन्न आहेत. उदाहरणार्थ, जर कोणी सूर्यास्ताचे सुमारास कलकत्त्याचे मैदानावर किंवा मुंबईतल्या कापाच्या मैदानावर सहल करण्यास निघाला, तर त्या ठिकाणीं जो देखावा त्याच्या दृष्टीस पडेल तो किती प्रोत्साहित असतो बरें? त्या वेळेस यूरोप, एशिया, आफ्रिका व अमेरिका या चार्‍ही खंडांतील माणसें तर्‍हेतर्‍हेचा छानदार पोशाख करून इकडून तिकडे सहल करताहेत असें दृष्टीस पडतें. हा चित्रविचित्र पोशाख पाहून मनास आनंद होतो. आरब, तुर्क, इराणी, चिनी, यूरोपियन व हिंदु हे आपापल्या देशच्या रिवाजाप्रमाणें पोशाख राखोत, व आचारविचार पाळोत, तेणेंकरून कोणाचें नुकसान ह्मणून नाहीं. परंतु दुसरा एक भेद पाहून चित्तास खेद होतो. तो कोणता म्हणाल तर धर्मसंबंधी भेद. मोठाल्या शहरांतून हिंदु, मुसलमान,

नानाप्रकारचे धर्म.

ख्रिस्ती वगैरे धर्मांचे लोक राहतात. या लोकांच्या धर्मांत जो कांहीं परस्पर विपर्यास दृष्टीस पडतो, तो वर्ण, पेहराव आणि भाषा यांकडून झालेल्या भेदापेक्षां अधिकच, परंतु कमी नाहीं असें दिसून येतें.

अशा प्रकारचें धर्मसंबंधी वैगुण्य असणें ही मोठी शोचनीय गोष्ट होय. तुह्मी हिंदु आहां तरी याविषयीं तुमचें माझें मत एक पडेल. देवानें निरनिराळ्या राष्ट्रांस निरनिराळे धर्म लावून दिले, आणि प्रत्येक राष्ट्रानें आपापले धर्मांप्रमाणें वागून ईश्वरप्राप्ति करून घ्यावी, असें जुन्या चालीचे भाविक हिंदु लोक म्हणतात. परंतु नव्या चालीचे सुशिक्षित हिंदु लोकांस हें ह्मणणें मान्य होणार नाहीं. नीतिविषयक ज्या गोष्टी आहेत त्या देश किंवा हवा यांच्या मानावर अवलंबून नसतात; त्या स्वतःसिद्ध असल्यामुळें सर्वत्र दृढ व नित्य असायाच्याच. त्या या देशांत जितक्या स्थिर आहेत तितक्याच विलायतेंत देखील आहेत. परमेश्वराचे गुण चिरकाल सारखेच, ते कधीं बदलत नाहींत. त्याची इच्छा, आमच्या ज्या भावनेकडून तो प्रसन्न होतो ती भावना, जी त्याला मान्य आहे अशी भक्ति, हीं सर्व प्रसंगीं व सर्व ठिकाणीं सारखींच असतात. परंतु जीं धर्ममतें या देशांत पसरलीं आहेत तीं पुष्कळ स्थळीं परस्परांशीं अगदीं विरुद्ध आहेत. ज्या गोष्टीविषयीं एका धर्मांत सदर परवानगी आहे तीच दुसर्‍या धर्मांत निषिद्ध आहे. जें कर्म केल्यानें ईश्वर प्रसन्न होतो असें एका धर्मांत सांगितलें आहे तेंच केल्यानें ईश्वराचा क्षोभ होतो असें दुसर्‍या धर्मांत सांगितलें आहे. असे हे परस्परविरुद्ध धर्म सर्वच खरे होऊं शकत नाहींत. जर आह्मांपैकीं कित्येकांनीं सत्याचा स्वीकार केला आहे तर मग अर्थात् बाकीच्यांनीं असत्याचा पक्ष धरिला आहे असें ह्मणणें भाग पडतें.

धर्माच्या प्रकरणांत मनुष्याच्या मनामध्यें भ्रांति असणें ही मोठी शोचनीय गोष्ट होय. कारण धर्मासारखा श्रेष्ठ व महत्तर असा दुसरा विषयच नाहीं. क्षणभर धर्मामध्यें कोणकोणत्या गोष्टींचा समावेश होतो हें पाहूं. धर्माकडून आह्मांस ईश्वर ह्मणजे त्याचे गुण, व त्याच्या आज्ञा, मनुष्य ह्मणजे त्याचा स्वभाव, त्याचा ईश्वराशीं संबंध, त्याचीं इहजन्मांतील कर्त्तव्यें, व मरणानंतर तो कोठें जाणार, इत्यादि सर्व गोष्टींचें ज्ञान धर्माकडून होतें. आह्मांस ही भूलोकची वस्ती सुखावह व्हावी, आमचें आयुष्य सत्कारणीं लागून पवित्र व्हावें हा मोठा गंभीर विचार आहे, व याचा उलगडा केवळ धर्माकडूनच होतो. शिवाय आमचें या जगांतलें जिणें क्षणभंगुर असल्यामुळें तें लवकरच संपणार व त्या वेळीं मृत्यूचा शिपाई आमचे पुढें उभा ठाकणार तेव्हां जें आमचें रूपांतर होणार त्यासाठीं कसें सिद्ध व्हावें हें समजणें मोठें अगत्याचें आहे. आमच्या निर्माणकर्त्याचें आमच्यापाशीं काय मागणें आहे व त्याची आह्मांवर कशी कृपा होईल हे प्रश्न कोणत्याही प्रापंचिक वस्तूच्या विचारापेक्षां अर्थभरित व वजनदार आहेत असें कोणीही विचारशील मनुष्य कबूल करील. विद्येसंबंधी शोध मनोरंजक असून आपापल्या ठिकाणीं महत्त्वाचेही आहेत, परंतु धर्मसंबंधी शोध त्यांहीपेक्षां फारच महत्त्वाचे व अगत्याचे आहेत.

धर्माचें अपार महत्त्व.

तर मग धर्मासारख्या अत्यंत महत्त्वाच्या विषयाकडे लक्ष्य पुरविणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्त्तव्य आहे, आणि आपलें कल्याण साधीत असतांना त्यानें दुसऱ्यांच्या कल्याणावर देखील दृष्टि ठेवली पाहिजे. ह्मणजे आपले आप्तविषय, इष्टमित्र, देशबांधव यांचें हित पाहणें हेंही त्याचें कर्त्तव्य आहे. परंतु खऱ्या धर्माचें ज्ञान व त्याचें आचरण यांखेरीज त्यांचें हित कसें होईल? जे स्वदेशाभिमानाचा बाणा बाळगतात त्यांनीं ही गोष्ट चित्तांत वागवावी अशी माझी त्यांस विनंती आहे.

कोणीकडून तरी पहा, धर्म हा विषय अति महत्त्वाचा ठरतो. परंतु पुष्कळांस याचा विसर पडतो. बहुत लोक प्रपंचांत निमग्न झाले आहेत. त्यांस खावें काय, प्यावें काय व ल्यावें काय हीच रात्रंदिवस विवंचना. आत्म्याची उपेक्षा करून दैहिक वासना तृप्त करण्याकडे त्यांची सर्व ओढ. धर्म हा महत्त्वाचा विषय नाहीं असें वाचेनें बोलून दाखविणारे विरळा; परंतु धर्माची कदर न राखणारे असे शेंकडों. मनुष्यांचे मनांतील वासना इतक्या कांहीं बलिष्ठ आहेत कीं त्यांच्या धांदलींत बुद्धि व विवेक यांचें सांगणें एकीकडे राहतें. ज्यांस नास्तिक असें ह्मटलें असतां त्यांच्या शरीरावर रोमांच उभे रहातील, परंतु पाहूं गेलें तर आचारविचार सर्व नास्तिकाचे, असे पुष्कळ आहेत. त्यांस परमेश्वराचें स्मरण देखील होत नसतें. हिंदुस्थानांतील तरुणांच्या मार्गांत मोठें संकट तें काय आहे? तर ज्याविषयीं मीं वर सांगितलें तेंच, ह्मणजे धर्माचें विस्मरण.

दैहिक वासना.

हल्लींच्या विद्वान् मंडळीची धर्मस्थिति कशी आहे याविषयीं पुढील वर्णनास तुमची

संमति पडेल असें मला वाटतें. हल्लीं प्रचारांत असलेल्या धर्मांत जे ठोकळ मतभेद आहेत त्यांची त्यांस साधारणपणें माहिती असते. या सर्व धर्मांतून कोणता तरी एक खरा असावा हेंही ते बहुशः कबूल करतील. जर त्यांस फारच नेट लावला तर सर्व धर्मांची तुलना करून कोणत्या धर्मास खातरीलायक प्रमाणें आहेत याचा शोध करणें हें आमचें कर्त्तव्य आहे असेंही ते मान्य करतील. आतां ज्यांनीं मिशनेरी विद्यालयांत अभ्यास केला आहे त्यांच्यांत व ज्या विद्यालयांतून मुळींच धर्म शिकवीत नाहींत अशा विद्यालयांत ज्यांस शिक्षण मिळालें आहे त्यांच्या स्थितींत अंतर असतें. ज्यांनीं चार पांच वर्षें मिशनेरी विद्यालयांत घालविलीं असतात त्यांस धर्म ह्मणून जो अति महत्त्वाचा विषय त्याचा चांगला परिचय होतो, आणि ख्रिस्ती धर्म हा ईश्वरदत्त आहे अशी त्यांपैकीं बहुतांची खातरी झालेली असते. परंतु ज्या विद्यालयांतून दुर्दैवेंकरून हा विषय शिक्षणक्रमांतून मुळींच वर्ज केलेला असतो तेथील विद्यार्थ्यांचीं धर्माविषयींचीं मतें अतिशय भ्रामक असतात. कित्येक उघडपणें आपण नास्तिक आहों असें ह्मणतात, ह्मणजे ईश्वरदत्त धर्म नाहीं व अशा धर्माचें मनुष्यास अगत्य नाहीं असें त्यांचें मत असतें. कांहीं कांहीं असें ह्मणतात कीं ईश्वरदत्त धर्म जगांत असलाच तर तो बहुशः ख्रिस्ती धर्मच असावा, कारण सांप्रत काळीं जीं मोठालीं बुद्धिमान् व सुधारलेलीं राष्ट्रें आहेत त्यांनीं त्या धर्माचें अवलंबन केलें आहे. दुसरे असें ह्मणतात कीं सर्व धर्मांत बऱ्यावाइटाची मिसळ आहे. परंतु ज्या विद्यालयांतून धर्माकडे मुळींच लक्ष्य पुरवीत नाहींत अशांतील तरुणांचीं मनें धर्माविषयीं अगदीं गोंधळलेलीं असतात. कोणती गोष्ट ग्राह्य आहे व कोणती त्याज्य आहे हें त्यांस माहीत नसतें. ही स्थिति खरोखर अत्यंत शोचनीय होय.

एकंदरीनें पहातां असें कबूल करावें लागतें कीं या देशांतले शिकलेले तरुण धर्माचा विचार मनांतून घालविण्यासाठीं होईल तितका प्रयत्न करितात. अशी स्थिति बहुशः मिशनेरी विद्यालयांतील तरुणांची असते; मग धर्मशिक्षणशून्य विद्यालयांतल्या तरुणांचीही तशीच असावी यांत नवल नाहीं.

ख्रिस्ती धर्माचें गुणलक्षण व अधिकार यांविषयीं मिशनेरी विद्यालयांतले तरुणांस चांगली माहिती असते. त्या धर्माच्या पवित्रतेविषयीं व त्याच्या खंबीरपणाविषयीं मनांत आशंका बाळगणारे क्वचित् त्यांमधून सांपडतील. परंतु त्यांस अशी भीति वाटते कीं जर ख्रिस्ती धर्म खरा ह्मणावा तर आपला पक्ष खोटा ठरतो; कारण मूर्त्तिपूजेच्या आचारांत राहण्याविषयीं ख्रिस्ती धर्माची सक्त मनाई आहे. ख्रिस्ती धर्माचें अधिकारप्रयुक्त सांगणें आहे, कीं सर्वांनीं पापाविषयीं अनुतापी व्हावें, ख्रिस्तावर विश्वास ठेवावा, व बाप्तिस्मा घेऊन ख्रिस्ती मंडळींत प्रवेश करावा. ख्रिस्ती धर्म जरी खरा आहे अशी त्यांची खातरी असली तरी हें करण्यास ते कोठें तयार आहेत? असें करणें हें आपलें कर्त्तव्य आहे हें त्यांस माहीत असतें, परंतु तें बजावण्यास ते माघार घेतात. ज्या गोष्टींचा सर्वस्वीं परित्याग करा ह्मणून ख्रिस्ती धर्म सांगतो त्यांवर पाणी सोडण्यास ते नाखुष आहेत. ख्रिस्ती धर्माच्या

आज्ञा फारच कडक, व त्यांविषयीं विचार करणें हें कंटाळवाणें, असें त्यांस भासल्यामुळें त्या धर्माचा विसर पाडण्याचा ते प्रयत्न करितात. मिशनेरी विद्यालयांतल्या तरुणांची जर ही अवस्था तर जेथें धर्मशिक्षण मुळींच दिलें जात नाहीं अशा विद्यालयांतल्या तरुणांनीं धर्माला टाळा देणें यांत फारसें नवल नाहीं.

धर्माची हेळसांड हा मोठा अधर्म व अत्यंत दुर्वर्त्तन.

परंतु असें वर्त्तन अत्यंत दुष्ट व फारच धोक्याचें आहे. आपण हें वर्त्तन सोडून वेगळ्या रीतीनें वागाल अशी मी मनापासून आशा बाळगतों. परमेश्वरानें तुह्मांस आपले गौरवासाठीं निर्माण केलें. परमेश्वर कोण व कसा, त्याच्या आज्ञा कोणत्या, ह्या गोष्टींचा शोध करणें हें तुमचें श्रेष्ठ कर्त्तव्य आहे. जरी आह्मांस या जगांत एक हजार वर्षें वांचण्याची हमी मिळाली, तरी देखील धर्मसंबंधी औदासीन्य बाळगणें हें अत्यंत दोषयुक्त व भयावह होईल; तर कोणत्याही क्षणीं हातांपायांच्या नाड्या बंद होण्याचा संभव असतां जर आह्मी आळस करितों तर तें वर्त्तन किती मूर्खपणाचें व अनिष्टकारक असलें पाहिजे बरें! चांगले होतकरू तरुण, परंतु ज्यांनीं धर्माविषयीं हेळसांड केली, अशांच्या अकस्मात् मरणावरून आमचे मनास अनेक वेळां फार दुःख झालें. असा एक तरुण गृहस्थ ह्या क्षणीं माझ्या नजरेपुढें आहे. त्यानें ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेचा शोध वेळ मिळाल्यास अवश्य करीन असा निश्चय केला होता; परंतु त्याला अवकाश मिळण्याचे अगोदरच मृत्यूनें गांठिलें. न जाणों, कदाचित् तुह्मांस हें पत्र वाचीत असतां एखाद्या भयंकर रोगानें अकस्मात् गांठून तुमची गठडी केली तर मग काय? दुसरा दिवस उगवतो आहे इतक्यांत तुह्मांला चितेवर नेऊन ठेवितील व कांहीं क्रियाकर्म करून तिला अग्नि लावतील व थोड्याच अवधींत सर्व रक्षा होऊन जाईल! अहा! तुमचा अमर आत्मा त्या वेळीं कोठें असेल? ह्या देहांत त्याची वस्ती असतांना जीं कामें त्यानें केलीं, जे सुप्रसंग त्याला मिळाले त्यांची त्यानें टाळाटाळ केली, ज्या सूचना त्याला मिळाल्या त्यांकडे दुर्लक्ष्य केलें, देवाच्या आज्ञांचा धिक्कार केला; या सर्वांचा जाब देण्यासाठीं देव जो नीतिमान् न्यायाधीश त्यासमोर त्याला उभें रहावें लागेल.*

याकरितां तुह्मांस माझें आग्रहपूर्वक सांगणें आहे, कीं तुह्मी याविषयीं विचार करावा. मनुष्यप्राणी बुद्धिवैभवानें पशूहून श्रेष्ठ आहे; परमेश्वरानें तुह्मांस बुद्धि व विवेक दिला आहे, त्यांचा सद्व्यय करा. मननशील व्हा. परमेश्वराचा शोध करावा असें जें तुमच्या विवेकाचें सांगणें तें ऐका. सर्व सत्याचा व विशेषेंकरून धर्मसंबंधी सत्याचा शोध करून त्याचें अवलंबन करा. तुमचे सर्व प्रयत्न परमेश्वर सफळ करो. परमेश्वर आमचा पिता आहे, याकरितां त्याला शरण गेलें असतां तो आशीर्वाद दिल्यावांचून राहणार नाहीं. कळावें, लोभ असावा, ही विनंती.

**आपला मित्र—.**

---

* परिशिष्ट १ पहा.

# पत्र दुसरें.

## प्रमाणांचें परिशीलन.

प्रार्थनेची आवश्यकता—ईश्वरदत्त शास्त्र ह्मणजे काय—ईश्वरदत्त शास्त्राचें अगत्य—तत्संबंधानें प्राचीन तत्त्ववेत्त्यांचे विचार—या पत्रांतून येणारे विचार—प्रमाणांचे निरनिराळे प्रकार—बाह्य प्रमाण—अंतःप्रमाण—अनुभवसिद्ध प्रमाण.

**प्रिय मित्र—,**

प्रार्थनेची आवश्यकता.

मागल्या पत्रांत धर्मासंबंधी शोध अत्यंत महत्त्वाचा आहे याविषयीं मीं बरेंच लिहिलें तें तुह्मांला आवडलें असेल, अशी मी आशा करितों. आपण आतां सत्याच्या शोधास लागलों आहों: हें काम कांहीं हलकें नव्हे. आपण सुज्ञ आहां तेव्हां ह्या शोधाचें महत्त्व अर्थात्‌च आपल्या लक्ष्यांत येईल. एकदा सत्याचा शोध करूं लागल्यावर ज्या कांहीं गोष्टी आपल्यापुढें येतील त्यांचा खरेपणानें व आस्थेनें विचार केला पाहिजे, असा तुमचा निश्चय झाला असेल! तथापि मुख्य विषयाला आरंभ करण्यापूर्वीं दुसऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीकडे तुह्मीं अवश्य लक्ष्य पोंहचवावें अशी तुह्मांस शिफारस केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. सकल सृष्टीचा उत्पन्नकर्त्ता व अधिकारी जो परमात्मा त्याचे अस्तित्वावर तुमचा विश्वास आहे याविषयीं संशय धरायास नको; बरें तर त्यानें निर्माण केलेला जो मनुष्यप्राणी त्याच्या ठायीं ज्या काळीं परिशुद्ध व उन्नत आकांक्षा उत्पन्न होते त्या काळीं त्याला बहुत संतोष होतो. अशा परमात्म्याची प्रार्थना करणें हें उचित आहे, हें तुम्ही मान्य करालच. प्रपंचाच्या अगदीं साधारण कृत्यांत जर प्रार्थना करणें उचित व अवश्य आहे, तर मग जिच्यामध्यें आपलें सुख सर्वस्वीं भरलेलें आहे, अशा गोष्टीचा विचार करतेसमयीं प्रार्थना तर अत्यावश्यक आहे. जो उद्योग आपण हातीं धरला आहे त्यामध्यें प्रार्थनेशिवाय गत्यंतरच नाहीं. ईश्वरप्राप्ति करून घ्यायाची असली तर भोळ्या भावानें लेंकरांप्रमाणें त्यास शरण जाऊन त्याला विनवावें, कीं हे परमेश्वरा, हा जो उद्योग आह्मीं आरंभिला आहे त्यामध्यें तूंच आमचा गुरु हो; आम्हांस नम्र, सरळ, व समजून घेण्याची बुद्धि दे; आम्हांमधून सर्व दुराग्रह व कठिनता घालीव. सत्याचें ज्ञान व्हावें एवढेंच नव्हे, तर सत्यावर आमची निष्ठा बसावी, आणि नम्रतेनें तें ग्रहण करून तदनुसार आमचें आचरण व्हावें, एतदर्थ ही प्रार्थना केली पाहिजे.

माझ्या या बोलण्याचें महत्त्व आपणांस कळून आलेंच असेल. मागल्या पत्रांत कित्येकांचें आचरण नास्तिकासारखें असतें ह्मणून सांगितलें, तर त्यांसारखे तुह्मी होऊं नका. ही गोष्ट अगदीं खरी आहे कीं तुह्मी धर्माच्या शोधास आरंभ करण्यापूर्वीं व तो करूं लागल्यानंतर ईश्वरास अनन्यभावें शरण जाऊन त्याचें सहाय्य घेतल्याशिवाय तुह्मांस सत्याचें ज्ञान किमपि होणार नाहीं. सर्वशक्तिमान् देवाच्या प्रबोधक कृपेशिवाय या पत्रांचें

वाचन केवळ निष्फल होणार आहे. जो मनुष्य स्वतः प्रार्थना करीत नाहीं, त्याला माझ्याकडून पारमार्थिक गोष्टीचा लाभ होणें अगदीं अशक्य आहे. याजकरितां पूर्वींच मी आपणांस सांगून ठेवतों कीं हीं पत्रें आपण 'वाचतांना ईश्वराची प्रार्थना न कराल तर त्यांचा उपहास मात्र कराल. "मागा ह्मणजे तुह्मांस मिळेल, शोधा ह्मणजे तुह्मांस सांपडेल" (मात्थी ७:७) अशी ईश्वराची आज्ञा व भाक आहे, याकरितां जर आपण अनन्यभावें प्रार्थना कराल, तर तो तुमची विनंती निःसंशय ऐकेल.

**ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे कीं काय?** हा महत्त्वाचा प्रश्न आहे व त्याचा उलगडा करण्यास आपण आतां यत्न करूं.

ईश्वरदत्त धर्म ह्मणजे काय?

मनुष्यास सृष्टीची रचना, आपल्या मनाची घटना व ईश्वरी सूत्र इत्यादि अनेक मार्गांनीं ईश्वराविषयींचें ज्ञान होतें. उदाहरणार्थ, सूर्याकडे पाहिलें म्हणजे त्याचा निर्माणकर्त्ता मोठा ज्ञानी व शक्तिमान् असावा असें विचारवंताच्या मनांत आल्यावांचून रहात नाहीं. तसेंच, सत्यासत्याचा विचार करूं लागलों ह्मणजे सत्य ईश्वराला प्रिय आहे, व तो असत्याचा द्वेष करतो असा विचार लागलाच मनांत उभा राहतो. परंतु याप्रकारें ईश्वराचें अस्तित्व, त्याचे गुणस्वभाव व त्याची इच्छा यांविषयींचें जें ज्ञान आह्मांस होतें, त्यास ईश्वरदत्त ज्ञान असें क्वचित्‌च ह्मणतां येईल. कारण जेव्हां आपण एखादी धर्मव्यवस्था ईश्वरदत्त आहे असें ह्मणतों, तेव्हां वर जो प्रकार सांगितला त्या प्रकारें ईश्वरानें स्वतः होऊन त्या धर्माचें ज्ञान मनुष्यास करून दिलें असें आपण समजत नाहीं. ईश्वरदत्त धर्म ह्मटला ह्मणजे अद्भुत रीतीनें मानवास ईश्वराविषयींचें जें ज्ञान होतें तें होय. ईश्वरदत्त धर्म या शब्दाची ही व्याख्या आमच्या हिंदु, मुसलमान, व पारशी बांधवांच्या लक्ष्यांत सहज येण्यासारखी आहे. तौरेत, जबूर, इंजील आणि कुराण हीं अलौकिक रीतीनें आपल्यास ईश्वरानें दिलीं आहेत असें प्रत्येक मुसलमान मानितो. चार वेद व अठरा पुराणें हीं त्याच रीतीनें आपल्यास मिळालीं आहेत असें हिंदु लोक कबूल करितात. जंदावस्ता ह्मणून जो पारशी लोकांचा धर्मग्रंथ तो याच प्रकारें आपल्यास ईश्वराकडून प्राप्त झाला असें ते ह्मणतात. बायबल हें ईश्वरदत्त आहे असें ख्रिस्ती लोक समजतात[१].

ईश्वरदत्त शास्त्राचें अगत्य व तें प्रायः दिलें असावें.

मनुष्यास ईश्वरदत्त शास्त्राचें अगत्य आहे, व तें त्यानें त्यास दिलें ही गोष्ट संभवनीय आहे, याविषयीं बहुत ग्रंथकारांनीं विस्तारानें प्रतिपादन केलें आहे. परंतु तूर्त त्याविषयीं मी कांहीं लिहीत नाहीं. ईश्वरदत्त शास्त्रापासून जे लाभ होतात त्यांविषयीं मी कांहीं विचार पुढें प्रगट करीन. सध्यां एवढेंच सांगतों कीं या आमच्या शहरांतील लोकांमध्यें धर्मा-

---

[१] **ईश्वरकृत्यें** व **ईश्वरोक्ति** ह्या दोन गोष्टींचा समावेश ईश्वरदत्त शास्त्रांत होतो. ईश्वरानें जेव्हां मानवांस धर्मशास्त्र दिलें तेव्हां तें लेखी असलेंच पाहिजे असें जरी सिद्धकारणापासून अनुमानकारणाच्या पद्धतीनें खातरीनें स्थापन करतां येत नाहीं असें बिशप बटलर साहेबांचें ह्मणणें आहे, तथापि तें लेखी असणें हें अत्यंत अगत्याचें आहे.

विषयीं जो अमर्याद व शोचनीय मतभेद आहे त्यावरून हें सिद्ध होतें कीं आपणांस ईश्वरापासूनच धर्मशिक्षण मिळालें पाहिजे. अनेक प्रकारच्या व परस्परविरुद्ध अशा मतांचा जेथें लढा पडला आहे, तेथें तीं सर्व मागें सारून ईश्वरी अधिकारप्रयुक्त असें एकमत चालू झाल्यानें केवढा मोठा लाभ होणार आहे बरें! व जे लोक लीनतेनें धर्म समजून घेण्याविषयीं उत्सुक आहेत त्यांस तें किती सुखप्रद होणार आहे, हें सांगावयास नको. परमेश्वरापासून असा संदेश आपणांस प्राप्त व्हावा याची ग्रीस देशांतील सर्वांपेक्षां ज्ञानी असे तत्त्ववेत्ते अपेक्षा करीत असत; आणि ज्या प्रकाशाच्या प्राप्तीसाठीं प्लेटो उसासे टाकीत असे त्याची अवहेलणा एतद्देशीय तरुणांनीं करावी हें अगदीं योग्य नाहीं एवढेंच केवळ नव्हे, तर तें त्यांस भयावह आहे[१].

ईश्वरदत्त शास्त्राचें अगत्य मनुष्यास आहे याविषयीं ख्रिस्ती, हिंदु, मुसलमान आणि पारशी या सर्वांचें पुष्कळ प्रकारें एक मत पडतें ही मोठी गोष्ट होय. नास्तिक किंवा निःशास्त्रवादी यांच्याविरुद्ध या सर्वांचें हें मत आहे. "ईश्वराला मनुष्यास शास्त्र देण्याचें प्रयोजन नाहीं," असें नास्तिकांचें ह्मणणें आहे. ख्रिस्ती, मुसलमान, हिंदु व पारशी

---

[१] ईश्वरी धर्मशास्त्राचें अगत्य मनुष्यास आहे अशा अर्थाचीं वाक्यें प्लेटोच्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं सांपडतात. दंतकथांच्या योगानें परंपरेनें जें ईश्वराविषयींचें ज्ञान जगांत राखलें गेलें त्याकडे त्यानें केव्हां केव्हां हवाला दिलासा वाटतो. कित्येक ठिकाणीं आपल्यास ईश्वरदत्त धर्म पुढें प्राप्त होईल अशी उत्कट इच्छा प्रदर्शित केली आहे. प्लेटोच्या ग्रंथांतील अशा अर्थाचीं बहुतेक वाक्यें Clarke's Boyle Lectures in the Evidences of Natural and Revealed Religion, Prop. VII. या पुस्तकांत उतरून घेतलीं आहेत तीं पहावीं. पुढील चित्तवेधक वाक्यें प्लेटोच्या फिडो नामक ग्रंथांत सांपडतात:—"मनुष्याच्या आत्म्याच्या अमरत्वादि गोष्टीविषयीं निश्चित ज्ञान इहजन्मांत मिळविणें हें अगदीं अशक्य आहे, किंवा तें मिळविण्याचें अत्यंत कठीण आहे. जो पुरुष त्याविषयीं शोध करण्यांत उत्साहानें झटत नाहीं, किंवा उत्साहानें झटत असून थोडाबहुत शोध करून तें काम तडीस न नेतां मध्येंच सोडून देतो, तो मोठा अधम होय. तर आपण पुढें सांगितलेल्या दोन मार्गांपैकीं एकाचें अवलंबन केलें पाहिजे. एक हा कीं दुसऱ्यापासून सत्य शिकावें, किंवा स्वतः तें शोधून काढावें. किंवा, हें जर अशक्य आहे तर ज्ञानीजनांचे ह्या विषयासंबंधी जे उत्तम आणि निश्चित तर्क आहेत त्यांचें अवलंबन करून त्यांप्रमाणें वागावें. परंतु एखाद्या नुकसान ताफ्यावर बसून महासागराचें पर्यटन करणें जसें धोक्याचें आहे, तसें ह्या विद्वानांचे तर्कांचें अवलंबन करणें भयावह होय. हा आयुष्यरूप सागर उतरून जाण्यास ईश्वरी धर्मशास्त्राशिवाय दुसरें उत्तम साधनच नाहीं."

प्लेटोचे व पिथागोरस नामक तत्त्ववेत्त्याचे बहुतेक सर्व शिष्यांनीं ईश्वरी शास्त्राचें अगत्य कबूल केलें आहे. या संबंधानें Leland's Advantage and Necessity of the Christian Revelation नामक पुस्तकाचा भाग १, प्रकरण २१वें पहावें.

यांचें यास एकच उत्तर आहे, कीं "मनुष्याला ईश्वरी शास्त्राची गरज आहे." त्यावर नास्तिक ह्मणतात, कीं "देवानें मुळींच शास्त्र दिलेलें नाहीं." त्याला या चाऱ्ही धर्मांच्या अनुयायींचें एकच उत्तर आहे, कीं "ईश्वरदत्त शास्त्र आहे याविषयीं शंकाच नको." तर मग या चाऱ्ही धर्मांच्या अनुयायींचें असें एक मत असणें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. आतां तिसऱ्या एका गोष्टीविषयीं म्हणजे देवानें ज्या शास्त्रामध्यें आपली इच्छा प्रगट केली आहे असें अमुकच शास्त्र होय असें त्या सर्वांनीं एकमत केल्यास किती बरें चांगली गोष्ट होईल! ख्रिस्ती, मुसलमान, हिंदु आणि पारशी यांनीं मोकळ्या मनानें व प्रीतीनें आपला मतभेद प्रगट करून खरें धर्मशास्त्र कोणतें याचा शोध करण्याविषयीं परस्परांचें साहाय्य करावें. अशा प्रकरणांत वितंडवाद कशास असावा? तेणेंकरून भ्रमांत पडण्याची मात्र भीति आहे. शत्रूस पराभूत करण्याच्या बुद्धीनें नव्हे तर बंधूस मदत करण्याच्या इच्छेनें या उद्योगास सर्वांनीं हात लावावा.

**या पत्रांत येणारे विचार.**

बायबल हें ईश्वरदत्त शास्त्र आहे हें सिद्ध करण्याचे मार्ग पुष्कळ आहेत. त्या सर्वांची यथायोग्य कलमबंदी करण्याचा माझा आतां बेत नाहीं, केवळ थोडक्यांत साध्या रीतीनें त्यांचें दिग्दर्शन करण्याचा माझा हेतु आहे. गणितांतले सिद्धांत वारंवार अनेक रीतींनीं सिद्ध करतां येतात, ह्मणून गणिती त्या सर्वांचा उल्लेख करण्याच्या भरीस पडत नाहीं, एकच परिपूर्ण प्रतिपादनानें त्यांचें काम होतें. तद्वत् ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेच्या प्रतिपादनार्थ एकच खातरीलायक तर्कप्रबंध रचिला असतां कार्यसिद्धि झाली असें मी समजतों. जर अधिक माहिती करून घेण्याची तुमची इच्छा असली तर या विषयावर दुसरे ग्रंथ आहेत त्यांचें अवलोकन केलें असतां तुमचे मनोरथ पूर्ण होतील.

**प्रमाणांचे निरनिराळे प्रकार.**

ख्रिस्ती धर्माची सत्यता सिद्ध करण्यास्तव ज्या प्रमाणांचा उपयोग करतात त्यांचे जे निरनिराळे प्रकार आहेत ते आपण प्रथम पाहूं. हे प्रकार तीन आहेत: पहिला प्रकार, बाह्यप्रमाण; दुसरा प्रकार, अंतःप्रमाण; तिसरा प्रकार, अनुभवसिद्धप्रमाण. ह्याच्या स्पष्टीकरणार्थ आपण एक उदाहरण घेऊं. अशी कल्पना करा कीं या शहरांतील एका तरुणास कोणीं एकानें त्याच्या बापापासून मोठा निकडीचा निरोप आणिला आहे. तो निरोप खरोखर आपले बापापासूनच आला आहे किंवा नाहीं हें पहाण्याचे त्या तरुणास अनेक मार्ग आहेत. पहिल्यानें ज्यानें तो निरोप आणिला तो कोणत्या चालीचा मनुष्य आहे हें कदाचित् तो पाहील. तो सचोटीचा आहे किंवा नाहीं, आपल्या कुटुंबाविषयीं त्यास माहिती आहे किंवा नाहीं, तो बापाचे ओळखीचा आहे किंवा नाहीं, त्यास ज्या गांवीं बाप राहतो त्या गांवाची माहिती आहे किंवा नाहीं, हें सर्व पाहून त्या निरोपाची तो परीक्षा करील; किंवा आपले बापाचा स्वभाव, त्याचा हुद्दा, त्याची आपल्या विषयींची इच्छा यांशीं त्या निरोपाचें साम्य मिळतें किंवा नाहीं हें तो पाहील. अशा

प्रसंगीं निरोप आणणाराची लायकी आणि निरोपाचें लक्षण या दोहोंची तुलना केल्याशिवाय खरें काय तें त्यास समजणारच नाहीं. पुनः अशी कल्पना करा कीं त्या मनुष्यानें त्यास "तुमचा बाप मरणोन्मुख झाला आहे, वे तुह्मीं नौकरीचा राजीनामा देऊन घरीं परत निघून यावें" असा निरोप सांगितला. त्या वेळीं तो तरुण अशा मजकुराचें पत्र या निरोपाचे पूर्वी आल्याचा शोध करील, व जर आलें असलें तर तो त्या पत्राचें अक्षर आपल्या बापाच्याच हातचें आहे किंवा नाहीं हें नीट तपासून पाहील, व आपले कुटुंबाविषयीं त्यानें सांगितलेली माहिती बरोबर जुळते किंवा नाहीं याकडेही तो लक्ष्य देईल, व त्या निरोप्यास आपल्या कुटुंबाविषयीं, बापाविषयीं वगैरे अनेक प्रकारचे प्रश्न करून आपल्या मनाची खातरी करून घेईल. इतकें करूनही त्यास संशय राहिल्यास तो स्वतः घरीं जाऊन कसें काय आहे हें पाहील.

आतां ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे असें जें त्या धर्माचें प्रतिज्ञापूर्वक ह्मणणें आहे, त्याची परीक्षा करायाची तीही वरील प्रकारेंच केली पाहिजे. येशू ख्रीस्त व त्याचे शिष्य यांनीं जो ईश्वराचा संदेश आह्मांस कळविला तो त्यांस देवापासून प्राप्त झाला व त्यांस देवानें पाठविलें असें ते प्रतिज्ञेनें बोलतात. तर मग त्यांची वर्त्तणूक कोणत्या प्रकारची आहे, त्यांना हा संदेश मिळण्यास कोणते प्रसंग होते व त्यांचा प्रामाणिकपणा कसा आहे, वगैरे गोष्टींचा आपण शोध केला पाहिजे. यास बाह्यप्रमाण पाहणें ह्मणावें.

किंवा जो संदेश त्यांनीं प्रगट केला तो ईश्वरापासून येण्यासारखा आहे कीं काय, अशी आपल्यास शंका घेतां येईल, व ती आपण घेतली तर सृष्टिरचनेवरून व आपले मनाच्या घटनेवरून ईश्वराचें जें अल्पस्वल्प ज्ञान आपल्यास प्राप्त झालें आहे त्याची व ख्रिस्ती धर्मापासून मिळालेल्या ज्ञानाची तुलना करून त्यांत कितपत साम्य आहे, हें पहाणें अंतःप्रमाण होय.

आतां राहिलें अनुभविकप्रमाण : तें अनुभवानेंच मिळावयाचें. हें पुढील दृष्टांतावरून स्पष्ट होईल. बायूबलांत लिहिलें आहे कीं "पाप्यांचा उद्धार व्हावा यासाठीं येशू ख्रीस्त अवतरला." पाप म्हणाल तर एक प्रकारचा खडतर रोग आहे व तो मनुष्याच्या आत्म्याला जडला आहे. ख्रीस्त हा एक वैद्य आहे. तो सांगतो कीं जे कोणी मजकडे येतील त्यांस मी बरें करीन. तर आपण त्याची प्रतीति घेतली पाहिजे. जो उपाय ख्रीस्त सांगतो त्यानें गुण येतो किंवा नाहीं हें अजमावून पहावें. आपण स्वतः तो उपाय करून पहावा, किंवा ज्यांनीं ख्रिस्ताच्या सांगण्याप्रमाणें केलें आहे त्यांस कांहीं गुण आला आहे किंवा नाहीं हें पहावें. रोग बरा झालेल्या मनुष्यांची स्थिति व त्यांची संख्या यांवरून ही गोष्ट तेव्हांच लक्ष्यांत येईल.

अंतर्बाह्य प्रमाणांची तुलना.

प्रमाणाची ही प्रत्येक शाखा मोठी महत्त्वाची आहे, व त्या प्रत्येकीचा लक्ष्यपूर्वक अभ्यास करणें हें अगत्याचें आहे; तथापि जे नूतन शोधक आहेत त्यांनीं बाह्यप्रमाणापासून आरंभ करावा हें उत्तम. कारण बाह्य प्रमाणाच्या विचारांत ऐतिहासिक गोष्टींचा विचार येतो, व त्यांसंबंधी पाहिजे तेवढी माहिती मिळण्याचा संभव असतो. येशू ख्रीस्त या

नांवाचा पुरुष खरोखरीच होऊन गेला कीं काय? त्यानें जीं कामें केलीं ह्मणून सांगतात, तीं त्यानें खरोखरच केलीं आहेत कीं काय? ज्या तोडीचे हे ऐतिहासिक प्रश्न आहेत त्याच तोडीचे पुढील प्रश्न आहेत:—जूलिअस सीजर ह्मणून कोणी एक पुरुष होऊन गेला कीं काय? त्याविषयीं जें लिहिलें आहे तें त्याच्या हातून झालें कीं काय? या दोन्ही प्रश्नांची तपासणी व तिचा निकाल एकाच रीतीनें होणार आहे हें सांगावयास नको.

आतां ज्या पद्धतीचा निर्देश आह्मीं केला आहे तीहून वेगळी पद्धत कित्येकांस आवडावी हें अगदीं साहजिक आहे. एक विचारी ग्रंथकार असें ह्मणतो कीं हिंदुलोकांस ऐतिहासिक शोधाची मुळींच गोडी नाहीं. कवींचें लाघव व आध्यात्मिक विचार यांत निमग्न होण्याची त्यांस मोठी आवड आहे. परंतु अशा घोटाळ्यांत एकदा आपण पडलों कीं त्यांतून निघणें कठीण. याकरितां हिंदुस्थानांतील तरुणांनीं इतिहासशास्त्रांत चांगलें वाकबगार व्हावें हें फारच अगत्याचें आहे.[१]

यासाठींच ख्रिस्ती धर्माच्या बाह्यप्रमाणांचा आपण पहिल्यानें विचार करूं. ज्याप्रकारें इतिहासांतील गोष्टींवर आमचा पूर्ण विश्वास बसतो, त्याच प्रकारें बायबलांतील गोष्टी पूर्ण विश्वसनीय आहेत याविषयीं तुमची पक्की खातरी करून देतां येईल असें मला वाटतें. जूलिअस सीजर यानें ब्रिटन देशावर स्वारी केली, किंवा मराठी राज्याचा स्थापक शिवाजी हा मोंगलांवर चालून गेला, ह्या गोष्टी जितक्या विश्वसनीय आहेत, तितक्याच यहूदा देशांत येशू ख्रीस्त ह्मणून कोणी पुरुष होऊन गेला, व त्यानें जीं कामें केलीं ह्मणून ख्रिस्ती लोक सांगतात तीं त्यानें खरोखर केलीं हें देखील विश्वसनीय आहे, असें आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल.

**आपला मित्र—.**



---

१ केंब्रिज येथील प्रोफेसर कोवेल यांचें असें ह्मणणें आहे कीं "पूर्वींच्या घडलेल्या गोष्टी सप्रमाण व सत्य अशा लिहून ठेवण्याची कल्पना फार पुरातन कालापासून तों आजतागाईत हिंदु लोकांत मुळींच आलेली नाहीं."

# पत्र तिसरें.

## नवा करार प्राचीन असून असल आहे.

बाह्य प्रमाण–नवा करार–त्याचीं पुरातन भाषांतरें आहेत त्यांवरून तो ग्रंथ पुरातन आहे हें ठरतें–तो असल आहे हें देखील त्याच रीतीनें ठरवितां येतें–त्याच्या पुरातन हस्त-लिखित प्रती आहेत त्यांवरून तो ग्रंथ प्राचीन व असल आहे हें ठरतें–पाठभेद–पुरातन कालचे ख्रिस्ती ग्रंथकार व मूर्त्तिपूजक ग्रंथकार यांनीं आपापल्या ग्रंथांमधून नव्या कराराचे जे हवाले व त्यांतून जे उतारे घेतले आहेत त्यांवरून तो ग्रंथ प्राचीन व असल आहे हें ठरतें–सेलसस नामक ग्रंथकाराचे पुस्तकांतून या अर्थाचे मासले.

**प्रिय मित्र—,**

ज्या धर्मपुस्तकास ख्रिस्ती लोक ईश्वरदत्त शास्त्र ह्मणून मानितात त्यास **बायूबल** ह्मणतात हें तुह्मांस नव्यानें सांगण्याची गरज नाहीं. बायूबलाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागाचें नांव जुना करार व दुसऱ्याचें नवा करार. जुना करार मूळ इब्री भाषेंत लिहिलेला होता, आणि नवा करार ग्रीक भाषेंत लिहिलेला होता. या दोन्ही भागांपैकीं जो तुह्मांस पसंत पडेल तो घेऊन, मागील पत्रांत सांगितल्याप्रमाणें त्याची तुह्मीं परीक्षा करावी. ज्यापेक्षां नव्या कराराची परीक्षा करण्याची रीत सोपी व विशेष मनोरंजक आहे त्यापेक्षां तोच पहिल्यानें परीक्षेकरितां आपण हातीं घेऊं.

जेव्हां कोणी एखाद्या महत्त्वाचे विषयावर लिहिलेलें पुस्तक आमचे हातीं देतो, तेव्हां तें पुस्तक कोणीं लिहिलें, केव्हां लिहिलें, आणि त्याचा प्रसार प्रथम कोठें झाला असे प्रश्न साहजिक उत्पन्न होतात. सुमारें १८०० वर्षांपूर्वीं नवा करार लिहिला गेला असें ख्रिस्ती लोकांचें ह्मणणें आहे, परंतु अशा महत्त्वाच्या विषयावर नुस्तें ख्रिस्ती लोकांचें ह्मणणें उपयोगी नाहीं. नवा करार १८०० वर्षांपूर्वीं लिहिला गेला याला प्रमाण काय? चार-पांचशें वर्षांमागें लिहिला नसेल हें कशावरून? तर तो १७०० वर्षांपेक्षांही अधिक पुरातन आहे किंवा नाहीं हें पाहण्याचा माझा विचार आहे.

नव्या कराराचीं पुरातन भाषांतरें.

१ नवा करार ह्मणून जो बायूबलाचा दुसरा भाग आहे त्याचें प्राचीनत्व व असलाई हीं त्याच्या पुरातन भाषांतरांवरून सिद्ध होतात.

नव्या कराराचें प्राचीनत्व ठरविण्याचे प्रकार.

(१) बायूबलाचें भाषांतर या देशांतील मराठी, बंगाली वगैरे भाषांत झालें आहे हें आपणांस विदित आहेच. परंतु ख्रिस्ती शास्त्राचीं भाषांतरें होऊन त्याचा सर्व जगांत प्रसार व्हावा एतदर्थ ख्रिस्ती लोक आतांच जागृत झाले आहेत असें मानणें मोठी चूक होय. यूरोपांत ज्या काळामध्यें धर्मसुधारणा (रेफरमेशन) झाली, ह्मणजे १६वे शतकाचे सुमारास ल्यूथर ह्मणून नामांकित पुरुष होऊन गेला, त्यानें बायूबलाचें भाषांतर

जर्मन भाषेंत केलें, त्याच्या पूर्वींही त्या भाषेंत भाषांतरें होतीं. त्याशिवाय अनेक विद्वान् पुरुषांकडून फ्रेंच, स्पॅनिश, इंग्लिश, डेनिश आदिकरून यूरोपांतील भाषांमध्यें त्याचीं भाषांतरें झालीं. यूरोपांतील सर्व प्राटेस्टंट मतावलंबी लोकांच्या मंडळ्यांतून सांप्रत ख्रिस्ती शास्त्राचीं जीं भाषांतरें वाचलीं जातात तीं सर्व वर सांगितलेल्या काळीं किंवा त्याच सुमारास झालीं. तेव्हां अर्थात्‌च हीं भाषांतरें झाल्यानंतर हें पुस्तक रचलें गेलें अशी कोणीही शंका घेणार नाहीं.

परंतु पूर्वोक्त भाषांतरांहूनही फार प्राचीन अशा भाषांतरांचा उल्लेख अद्याप करावयाचाच आहे. सिरेइक, लाटीन, कापटीक, आरबी, परशन, अरमेनियन, इथिओपिक, गाथिक, आंग्लोसाक्सन व इतर भाषांतून बायबलाचीं भाषांतरें निरनिराळ्या काळांत झालेलीं आहेत. यांपैकीं कित्येक तर फारच प्राचीन आहेत. उदाहरणार्थ, बायबलाचें आंग्लोसॅक्सन भाषांतर आठव्या शतकाचे आरंभीं, ह्मणजे सुमारें अकराशें वर्षांपूर्वीं झालेलें आहे. अरमिनियन भाषांतर पांचव्या शतकाचे आरंभीं झालें; गाथिक भाषांतर चौथ्या शतकाचे अखेरीस ह्मणजे सुमारें दीड हजार वर्षांपूर्वीं झालें. चौथ्या शतकाचे पूर्वार्धांत इथिओपिक भाषांतर झालें. कापटिक भाषेंतील प्राचीन भाषांतरें तिसऱ्या शतकांत झालीं. लाटीन भाषेंतील भाषांतर प्रथम दुसऱ्या शतकांत झालें व चौथे शतकाचे अखेरीस जेरोम ह्मणून कोणी ज्ञानी मनुष्य होऊन गेला त्यानें तें तपासून शुद्ध केलें. सिरेइक भाषेंतील नव्या कराराचीं मोठ्या महत्त्वाचीं भाषांतरें अनेक आहेत, त्यांपैकीं पिशीटो नांवाचें (ह्म० सोपें किंवा शुद्ध) जें भाषांतर आहे तें दुसऱ्या शतकांत किंवा पहिल्या शतकाचे अखेरीस ह्मणजे इ० स० १००च्या सुमारास झालें असावें.[१] याचे पूर्वीं नव्या कराराचीं भाषांतरें होण्याची जरुरी नव्हती, एवढेंच केवळ नव्हे, तर तसें करणें अशक्य होतें, कारण नव्या करारांतील निरनिराळीं पुस्तकें इ० स० २२ आणि इ० स० ९० यांचे दरम्यान लिहिलीं गेलीं. तेव्हां आपण ज्या काळांत सिरेइक भाषांतर झालें त्याचे अगदीं सन्निध येऊन ठेपलों.

( २ ) आतां वर सांगितलेलीं भाषांतरें परस्परांशीं व ग्रीक भाषेंतील त्याच्या मुळाशीं अगत्य असल्यास ताडून पहातां येतील. तीं सर्व भाषांतरें ईश्वरप्रणीत आहेत असें आमचें ह्मणणें नाहीं. अर्वाचीन काळांत नव्या कराराचीं बंगाली, मराठी वगैरे भाषांत झालेलीं भाषांतरें ज्याप्रमाणें ईश्वरप्रणीत नाहींत, त्याप्रमाणेंच सिरिएक, लाटीन, इत्यादि

[१] लंडन शहरांत ब्रिटिश म्यूझीअम नामक जें मोठें पदार्थसंग्रहालय आहे त्यांत मिसर देशांतील नव्या कराराच्या सिरिअक भाषांतराच्या ज्या हस्तलिखित प्रती आहेत त्यांतील एक प्रत फार प्राचीन आहे असें डाक्तर क्युरेटन साहेबांनीं शोधून काढलें. हें भाषांतर नव्या कराराच्या भाषांतरांत फार जुनें व महत्त्वाचें आहे असें आलफोर्ड नामक टीकाकाराचें मत आहे.

नव्या कराराची असलाई ठरविण्याचे प्रकार.

प्राचीन काळीं झालेलीं भाषांतरें हीं ईश्वरप्रणीत नाहींत. शिवाय, मूळ अर्थ उमजला नाहीं अशींही कित्येक स्थळें त्यांत आहेत. परंतु अशा वादग्रस्त स्थळांचा निकाल ग्रीक भाषेंतील मुळाशीं तीं स्थळें ताडून पहातां तेव्हांच लागतो. हीं सर्व प्राचीन व अर्वाचीन भाषांतरें परस्परांशीं जुळतात व तीं सर्व एकाच मूळ प्रतीवरून केलेलीं असावींत अशी त्यांची तुलना केली असतां कोणालाही सहज दिसून येणार आहे.

वर केलेल्या उपपादनावरून नव्या करारार्चे प्राचीनत्व सिद्ध झालें हें तुमच्या लक्ष्यांत येऊन चुकलेंच असेल. त्या ग्रंथाचा माग काढीत काढीत आपण इ० स० १००पर्यंत येऊन पोहोंचलों. तेथूनही नव्या कराराच्या निरनिराळ्या पुस्तकांचा माग काढीत आपल्याच्यानें अधिक मागें जाववेल; परंतु तसें करण्याचें आपल्यास अगत्य नाहीं.

नव्या करारार्चे मूलस्वरूप ज्या प्रकारचें होतें तेंच हल्लीं कायम आहे, हेंही वरील उपपादनावरूनच सिद्ध होतें. या ग्रंथाचीं भाषांतरें झाल्यावर, त्या सर्वांचा एकसारखा सर्वत्र मेळ पडावा ह्मणून तीं सर्व एकत्र करून त्यांमध्यें फेरफार केला अशी शंका घेतांच येत नाहीं. कारण इंग्लंडांतील साक्सन लोक, मिसिआ प्रांतांतील गाथ् लोक, आफ्रिकेंतील अबिसिनियन लोक, अराराट पर्वताच्या आसमंतात् राहणारे अरमिनियन लोक, मेसोपोटेमिया व दक्षिण हिंदुस्थानांतील सिरिअन लोक, अशा दूरदूरच्या लोकांजवळ नव्या कराराच्या त्यांच्या त्यांच्या भाषांतील भाषांतराच्या प्रती होत्या, त्या सर्वांचा एकसारखा मेळ पडावा ह्मणून हे सर्व लोक एकत्र मिळाले, व त्यांनीं आपापल्या प्रती तपासून शुद्ध केल्या अशी कल्पना काढणें केवळ वेडगळपणाचें होईल. असें होणें हें अनेक कारणांमुळें अगदीं अशक्य होतें. हीं भाषांतरें एकदा झाल्यावर त्यांच्या अनेक नकला झाल्यामुळें त्यांमध्यें थोडाबहुत फरक पडला असेल; तथापि नवल हें कीं त्यांमध्यें तादृश विसंगतपणा दिसून येत नाहीं. यावरून हें सिद्ध होतें, कीं हीं सर्व भाषांतरें एकाच मुळावरून केलीं; आणि मुळांत किंवा भाषांतरांत फारसा बदल झालेला नाहीं. सारांश, जें नव्या करारार्चे मूळस्वरूप होतें तेंच अद्याप कायम राहिलें आहे.

नव्या कराराच्या पुरातन हस्तलिखित प्रती.

२ नव्या करारार्चे प्राचीनत्व व त्याची असलाई हीं त्याच्या ज्या पुरातन हस्तलिखित प्रती विद्यमान आहेत त्यांवरून सिद्ध होतात.

छापण्याची कला १५व्या शतकांत निघाली. त्या वेळेपासून बायबलाच्या लक्षावधि प्रतींचा खप प्रतिवर्षीं यूरोप खंडांतच काय पण जगभर होत आहे. परंतु छापण्याची विद्या निघण्यापूर्वीं, पुस्तकाच्या प्रती करणें ह्मटलें ह्मणजे मोठ्या मंदगतीचें काम असे. संस्कृत व प्राकृत ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती तुमच्या पहाण्यांत आल्याच असतील; हिंदुलोकांचीं धर्मशास्त्रें छापखान्यांतून छापून बाहेर पडूं लागल्याला फार वर्षें झालीं नाहींत हें तर तुह्मी जाणतच आहां. त्यापूर्वीं वेद आणि पुराणें यांच्या प्रती हिंदु लोकांच्या संग्रहीं असल्या

तरी त्या हस्तलिखितच असत हें सांगावयास नको. तद्वत् सर्व यूरोप खंडांत व आफ्रिकेंत व एशिया खंडाच्या कित्येक भागांत, छापण्याची कला निघण्याचे पूर्वींच्या बायबलाच्या प्रती हस्तलिखित आहेत. पाश्चिमात्य विद्वानांनीं नव्या कराराच्या ग्रीक भाषेंतील अनेक हस्त-लिखित प्रती शोधण्यास आरंभ केला व तो उद्योग अद्याप चालूच आहे.[1] यांपैकीं कांहीं प्रती फारच प्राचीन आहेत. ब्रिटिश म्यूझीअम एथें अशी एक प्रत राखून ठेविली आहे: तिला अलेक्षांद्राईन हस्त-लिखित प्रत ह्मणतात. ती प्रत इसवी सनाचे सातवे शतकांत किंवा त्याचे पूर्वीं २००शें वर्षें लिहिली असावी असा अदमास आहे. दुसरी एक प्रसिद्ध हस्तलिखित प्रत रोम येथील पोपाच्या व्हॅटिकन नामक महालांत राखून ठेविली आहे. ती इसवी सनाचे चौथ्या शतकाचे मध्यास लिहिली असावी असा अदमास आहे.[2]

अलेक्षांद्राईन हस्तलिखित प्रत.

व्हॅटिकन हस्त-लिखित प्रत.

अद्याप मधून मधून नव्या कराराच्या हस्तलिखित प्रतींचा शोध लागत आहे. सीनाय पर्वतावरील पुस्तकालयांत नव्या कराराच्या एका प्रसिद्ध हस्तलिखित प्रतीचा शोध टिशेन-डार्फ नामक विद्वानानें इ० स० १८५९ या वर्षीं लावला. ही प्रत इसवी सनाचे चौथ्या शतकाचे मध्यास लिहिलेली असावी असा तर्क केला आहे. ही व्हॅटिकन हस्तलिखित प्रतीपेक्षां कांहींशी पुरातन असावी असें वाटतें.

या रीतीनें नव्या कराराच्या दीडहजार वर्षांच्या पुरातन अशा हस्तलिखित प्रती उजेडास आल्यानें, त्याच्या प्राचीनत्वाविषयीं शोध करण्यास दीडहजार वर्षांच्या मागें आह्मांस एकदम जातां येतें.

आतां असा प्रश्न निघतो कीं या पुरातन हस्तलिखित प्रती कोणत्या काळांत लिहिल्या हें विद्वान् लोक कसें सिद्ध करितात? जो काळ त्यांनीं ठरविला आहे तो भरंवशालायक आहे किंवा अटकळीचा आहे? विचारांतीं असें दिसून येतें कीं हें ठरविण्याचें काम इतकें बारकाईनें केलें आहे, कीं त्यांत संशय धरण्याला जागा रहात नाहीं. हस्तलिखित ग्रंथाचा काळ समजण्याचीं अनेक साधनें आहेत. त्यांपैकीं कांहीं सांगतों. जी प्रत तपासायाची ती कशावर लिहिली आहे ह्मणजे चर्मपत्रावर किंवा कागदावर लिहिली आहे, हें पहावें लागतें. जर कागद असला तर तो कोणत्या प्रकारचा आहे याचा शोध करावा लागतो. ज्या शाईनें ती लिहिली आहे ती कोणत्या द्रव्याची

नव्या करारा-च्या हस्तलिखित प्रतींचें पुराणत्व समजावें कसें?

[1] मोठ्या अक्षरांनीं लिहिलेल्या, ज्यांना इंग्रजींत *uncial* ह्मणून ह्मणतात, अशा १२७ हस्तलिखित प्रती आहेत; *cursive* किंवा लहान अक्षरांनीं लिहिलेल्या १४६३ हस्तलिखित प्रती आहेत. यांपैकीं पुष्कळांत नवा करार अंशतः सांपडतो.

[2] Codex Ephraemi ह्मणून जी प्रत आहे ती त्याच सुमारास लिहिली असावी आणि Codex Bezæ इ. स. ५०० यांत लिहिली असावी असें अनुमान आहे.

केली आहे, व ती टिकाऊ आहे किंवा नाहीं हें पहाणें जरूर आहे. तसेंच हस्ताक्षराचें स्वरूप व वळण हीं ध्यानांत आणावीं लागतात. ही परीक्षा कशी करावी याचा तपास फार बारकाईनें करून, विद्वानांनीं जे त्यावरून निर्णय केले आहेत ते पूर्ण भरंवशालायक आहेत.[1] ग्रीक किंवा लाटिन किंवा कोणत्याही प्राचीन भाषेंतील हस्तलिखित प्रतींचा काळ ठरविण्यास ज्या नियमांचें अवलंबन करावें लागतें, त्याच नियमांचें सहाय्य बायबलाच्या हस्तलिखित पुरातन प्रतींची परीक्षा करतांना घ्यावें लागतें, हें पक्कें लक्ष्यांत ठेवावें. होमर किंवा सिसरो, या प्राचीन ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या प्रती, किंवा वेदाची प्रत किंवा एखादें परशिअन काव्य, यांचें पुरातनत्व ज्या कसास लावून पाहिल्यानें व्यक्त होतें, त्याच कसास नव्या कराराच्या हस्तलिखित प्रती लाविल्यानें त्याच्या पुरातनत्वाचा उलगडा होतो. जर ग्रीक, लाटिन इ० भाषांतील हस्तलिखित प्रतींचा काळ याच रीतीनें बरोबर समजला आहे असें ह्मणतां येतें, तर नव्या कराराच्या हस्तलिखित प्रतींचा काळही बरोबर समजला आहे ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. जर कोठें चूक झाली आहे असें म्हणावें, तर सर्वच हस्तलिखित प्रतींचें पुरातनत्व बरोबर समजलें नाहीं असें ह्मटलें पाहिजे.

हा विचार नव्या कराराच्या हस्तलिखित प्रतींचें पुरातनत्व व तो ग्रंथ लिहिण्याचा काळ यांविषयीं झाला. आतां ह्या ग्रंथाचें मूळस्वरूप न बिघडतां तें कायम कसें राखलें गेलें हें आपण पाहूं. तें येणेंप्रमाणें:—नव्या कराराच्या ज्या हस्तलिखित प्रती आहेत त्या एकमेकींशीं जुळतात. यावरून त्या अक्षरशः एकसारख्या आहेत असें समजायाचें नाहीं. ज्याला पाठ ह्मणतात असे भेद त्यांमध्यें आहेत. आतां हे भेद कसे उत्पन्न झाले हें एका उदाहरणावरून सहज लक्ष्यांत येईल. अशी कल्पना करा, कीं कोणी एकानें एका पत्राची वीस मनुष्यांस नकल करावयास सांगितली, तर त्याची बिनचूक नकल एकाचे हातून देखील होणार नाहीं. कोणी अक्षरवटिकेंत चुकेल, कोणी एखादा शब्दच गाळून टाकील, याप्रमाणें त्यांमध्यें भेद दिसून येतील. आतां ह्या वीस हस्तलिखित प्रती झाल्या खऱ्या; परंतु त्या सर्वांमध्यें पाठभेदही झाले. हे कसे झाले? पहिल्यानें हे भेद महत्त्वाचे आहेत कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. कदाचित् त्या वीस नकलांमध्यें एक चूक साधारण असेल. यामुळें त्या नकला कांहीं उपयोगाच्या नाहींत असें बोलणें रास्त होणार नाहीं. आतां अशी कल्पना करा, कीं ज्यावरून ह्या नकला केल्या तें असल पत्र हरवलें, व वीस नकला मात्र राहिल्या, तर या वीस नकलांवरून मूळप्रतीचें स्वरूप कसें समजावें? हें समजण्यास कांहीं अडचण पडणार नाहीं. त्या नकलांची परीक्षा मात्र केली पाहिजे. परीक्षेंत कदाचित् असें दिसून येईल, कीं एखादा शब्द एका प्रतींत आहे तो बाकीच्या १९ प्रतींमध्यें नाहीं. त्यावरून जिजमध्यें तो अधिक शब्द पडला ती प्रत चुकली व बाकीच्या १९ बरोबर असें व्यक्त होतें. सर्वच प्रतींमध्यें एकसारख्याच चुका असतात असें नाहीं, परंतु तपासणीमध्यें

पाठभेद.

---

[1] On the Transmission of Ancient Books नामक पुस्तकांत Mr. Isaac Taylor साहेबांनीं याच विषयाचें फारच उत्तमप्रकारें प्रतिपादन केलें आहे.

एक नकल दुसऱ्या नकलेला दुरुस्त करिते. याप्रमाणें त्या प्रतींची बारीक रीतीनें चौकशी करतां करतां शेवटीं असल कागदाचें हरवलेलें मूळस्वरूप यथातथ्य मिळालें असें दिसून येईल.

याच प्रकारें विद्वानांनीं नव्या कराराचे हस्तलिखित प्रतींची परीक्षा केली. त्यांनीं जगांतील निरनिराळ्या भागांत मिळालेल्या प्रतींची तुलना करून त्यांतील पाठभेदांचें टिपण केलें, व त्यावरून नव्या कराराचें मूळस्वरूप कसें असावें हें ठरविलें. नव्या कराच्या हस्तलिखित प्रतींमध्यें असणारे पाठभेद अगदीं क्षुल्लक आहेत. नव्या कराराची अगदीं अपुरी अशी हस्तलिखित प्रत घेऊन त्यांतील पाठभेदांकडे लक्ष्य देतां असें दिसतें कीं त्यांकडून ख्रिस्ती धर्माच्या एका सिद्धांताला किंवा तत्त्वाला बाध येईल असे ते मुळींच नाहींत. ज्याप्रकारें Honour या इंग्रजी शब्दाची अक्षरवटिका करण्याचे दोन प्रकार आहेत, त्याच प्रकारचे हे पाठभेद आहेत असें दिसून येतें.

शेवटीं इतकें सांगणें आहे कीं प्राचीन ग्रीक व लाटिन ग्रंथांच्या प्रतींत जितके पाठभेद आहेत त्यांपेक्षां फारच थोडे ख्रिस्ती शास्त्राच्या प्रतींत आहेत. आणि हिंदुस्थान, इराण, अरबस्थान वगैरे देशांतील पुरातन ग्रंथांच्या हस्तलिखित प्रतींमध्यें जी पाठभेदांची संख्या आहे तिच्या मानानें पाहूं गेलें असतां ख्रिस्ती शास्त्राच्या हस्तलिखित प्रतींमध्यें फारच थोडे पाठभेद आहेत असें ह्मणावें लागतें.

३ पुरातनकालच्या ख्रिस्ती लोकांनीं आपल्या ग्रंथांमध्यें नव्या कराराचे जे हवाले दिले आहेत व त्यांतून जे उतारे घेतले आहेत त्यांवरून नव्या कराराचें प्राचीनत्व व असलाई हीं स्थापित होतात.

ख्रिस्ती धर्मसंबंधी विषयावर अर्वाचीन ग्रंथकारांच्या ग्रंथांत बायबलांतले उतारे असतात हें तर तुह्मांला माहीतच आहे. रेफरमेशन( धर्मसुधारणा )च्या काळापासून धर्मसंबंधी विषयावर जे ग्रंथकार उदयास आले त्यांत ज्यांच्या ग्रंथांत नव्या करारांतले उतारे नाहींत असे ग्रंथ विरळा सांपडतील. कित्येकांनीं कांहीं भाग शेंकडों वेळां घेतले आहेत. तसेंच, ज्या काळास 'मिडल एजेस' म्हणतात ( इ० स० ८००–१५०० पर्यंत ) त्यांत जे ग्रंथकार झाले त्यांचे लेखांमध्यें देखील ख्रिस्ती शास्त्रांतले उतारे आढळतात. या रीतीनें आह्मांस फार मागें जातां येतें. उदाहरणार्थ, चौथे शतकाचे अखेरीस व पांचवे शतकाचे आरंभीं आगस्तीन नामक एक विद्वान् व भक्तिमान् पुरुष होऊन गेला. त्यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले, त्यांमध्यें नव्या करारांतील उतारे ओतप्रोत भरले आहेत. आगस्तीनच्या पूर्वीं एक शतक युसिबिएस ह्मणून एक मोठा ग्रंथकार झाला; त्यानें नव्या कराराचें उत्तम प्रकारें अध्ययन केलें होतें. त्याचे ग्रंथांत देखील नव्या करारांतले पुष्कळ उतारे आहेत. युसिबिएसच्या काळाच्या मागें पाहिलें असतां नवा करार तयार होईपर्यंत म्हणजे इ० सनाच्या पहिल्या शतकापर्यंत ज्यांचे ग्रंथ विद्यमान आहेत असे ३० ग्रंथकार होऊन गेले.[१]

[१] या ग्रंथकारांपैकीं ओरिजिन या नांवाचा फार विद्वान् ग्रंथकार इ० स० १८५–

हे जे ग्रंथकार वर सांगितले त्यांनीं बायबलांतील वचनांचे उतारे आपल्या ग्रंथांमध्यें घेतले आहेत. कित्येकांनीं तर पुष्कळच घेतले आहेत. या ग्रंथकारांपैकीं कित्येक तर परस्परांपासून फारच दूर ह्मणजे लायन्स, कार्थेज, आलेक्षांड्रिआ, आंतियोख अशा नगरांतून रहात असल्यामुळें ख्रिस्ती शास्त्राच्या असलाईविषयीं जीं प्रमाणें मिळतात तीं एकमेकांवर अवलंबून नसतां स्वतंत्र आहेत असें सिद्ध होतें; येवढेंच केवळ नव्हे, तर ख्रिस्ती शास्त्राच्या ज्ञानाचा प्रसार त्या आद्य काळांत किती दूरवर झाला होता हेंही त्यावरून दिसून येतें.

४ पुरातन काळीं जे नास्तिक होऊन गेले त्यांनीं आपले ग्रंथांमध्यें नव्या कराराचे जे हवाले दिले आहेत व उतारे घेतले आहेत त्यांवरून नव्या कराराचें प्राचीनत्व व असलाई हीं सिद्ध होतात.

ज्या ग्रंथकारांचीं नांवें मीं नुक्तींच सांगितलीं ते सर्व ख्रिस्तीधर्मानुयायी होते. त्यांनीं ख्रिस्ती धर्माचे स्पष्टीकरणार्थ व प्रतिपादनार्थ आपले लेखणीचा उपयोग केला. परंतु ख्रिस्ती-धर्मविरोधी असेही कित्येक ग्रंथकार होऊन गेले. त्यांनीं ख्रिस्तीधर्माविरुद्ध पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं. अशांपैकीं तिघे फारच प्रसिद्धीस आले. त्यांचीं नांवें सेलसस, पारफरी, आणि जूलिअन. चौथ्या शतकाचे मध्यास जूलिअनचा उत्कर्ष झाला; तिसऱ्या शतकाचे मध्यास पारफरी होऊन गेला; आणि दुसऱ्या शतकाचे अखेरीस सेलसस झाला.

या तिघांपैकीं सेलसस[1] हा फार प्राचीन असल्यामुळें त्यानें जें लिहिलें आहे त्याविषयीं आपण विशेष विचार करूं. त्याच्या ग्रंथाचा जो अवशेष भाग राहिला आहे त्यामध्यें नव्या करारांतले सुमारें ८० उतारे आहेत. ख्रिस्ताचा जन्म, त्याचा बाप्तिस्मा, उपदेश, चमत्कार, मरण, पुनः उठणें इत्यादि ठोकळ गोष्टी ख्रिस्ती शास्त्रांतून घेतल्या आहेत असें तो ह्मणतो.

ख्रीसास्टम नामक कोणी ख्रिस्ती ग्रंथकार पांचवे शतकांत होता; तो असें ह्मणतो कीं "आमचा धर्मग्रंथ पुरातन आहे यास सेलसस आणि पारफरी हे दोन साक्षीदार पुरे आहेत; कारण ज्या ग्रंथावर त्यांनीं हल्ले केले तो त्यांचे मागून झाला हें मुळींच संभवत नाहीं." हें त्याचें बोलणें सयुक्तिक आहे.

---

२५४ यांचे दरम्यान होऊन गेला. यानें आपले ग्रंथांमध्यें नव्या करारांतील बहुतकरून सर्व पुस्तकांचीं नांवें लिहिलीं आहेत. ओरिजिनच्या पूर्वीं ४० वर्षें जस्टीन मार्टर ह्मणून कोणी विद्वान् ग्रंथकार झाला. याहीपेक्षां मागल्या ग्रंथकाराचें नांव क्लेमन्स रोमानस ह्मणून होतें; तो इ० स० पहिल्या शतकाचे अखेरीस होऊन गेला.

[1] इ० स० १७६च्या सुमारास सेलसस हा उदयास आला. त्यानें ख्रिस्तीधर्माविरुद्ध जो ग्रंथ लिहिला त्याचें नांव "सत्यवचन" असें होतें. या पुस्तकास उत्तरादाखल ग्रंथ ओरिजिन यानें इ० स० २४६त प्रसिद्ध केला. सेलसस याचा ग्रंथ गहाळ झाला; परंतु जो ग्रंथ त्यास उत्तरादाखल केला त्यांत ओरिजन यानें त्यामधून पुष्कळ उतारे घेतले आहेत.

उताऱ्यांच्या साम्यतेवरून असें दिसून येतें कीं ज्या प्रतीचा उपयोग सेलसस यानें इ० स० १७६त केला ती व हल्लीं लोकप्रचारांत असलेली ख्रिस्ती शास्त्राची प्रत या दोन्ही एकच होत. "ज्या गोष्टी तुह्मीं लिहिल्या त्या ख्रिस्ताच्या मुखांतून निघाल्या असें तुमच्याच ग्रंथांत ह्मटलें आहे" असे उल्लेख त्याच्या ग्रंथांत अनेक स्थळीं आढळतात. अशा साम्यतेवरून नव्या कराराचे असलाईस मोठें ठळक प्रमाण मिळतें.

इ० स० १५०च्या सुमारास नव्या करारांतील पहिलीं चार पुस्तकें अधिकारप्रयुक्त मानिलीं असून तीं ख्रिस्ती भजनालयांतून प्रसिद्धपणें वाचलीं जात हें सिद्ध करून देतां येतें. यांपैकीं पहिलीं तीन पुस्तकें यरूशलेमाचा नाश होण्याचे पूर्वीं जशीं आतां आहेत तशींच होतीं हें पूर्ण संभवनीय आहे. चौथें पुस्तक फार फार झालें तर इ० स० ९०च्या सुमारास लिहिलें याविषयीं सर्व प्राचीन इतिहासांची साक्ष आहे.

पौलसाच्या पत्रांचा काल इ० स० ५२ पासून ६७ पर्यंत आहे. यांपैकीं चार पत्रांचा उपयोग पुराव्यादाखल करतात; तीं इ० स० ५८ किंवा ६०च्या सुमारास लिहिलीं.

ह्या प्रमाणांवरून नव्या करारांतील पुस्तकें इ० स० च्या १ ल्या शतकांत लिहिलीं गेलीं व तीं आरंभीं जशीं होतीं तशींच आतां आहेत हें सिद्ध.

**आपला मित्र—.**



## पत्र चौथें.

### नवा करार विश्वसनीय आहे.

नवा करार विश्वसनीय आहे काय?—त्यांतील इतिहास खरा आहे यास अनेक प्रमाणें—ख्रिस्ताच्या जीवनचरित्राचीं चार पुस्तकें—पौलसाचीं पत्रें—लिहिणारांची स्थिति—त्यांचें वर्तन—प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींविषयीं त्यांची साक्ष—प्राचीन काळच्या ख्रिस्ती लोकांची साक्ष—ख्रिस्ताच्या चरित्रांतील गोष्टी खऱ्या आहेत अशी ख्रिस्तीधर्मद्वेष्ट्यांची साक्ष—नव्या करारांतील इतिहासास रोमन व ग्रीक ग्रंथांवरून पुष्टीकरण—नाणीं, पदकें वगैरे यांवरून पुष्टीकरण.

**प्रिय मित्र—,**

जे विचार मीं मागल्या पत्रांत प्रगट केले, त्यांत नवा करार जुना व असल आहे असें सिद्ध केलें आहे. बायबलाचा पहिला भाग ह्मणजे जुना करार, याचें देखील प्राचीनत्व व सत्यता सिद्ध करून देण्यास त्याच प्रकारच्या विचारसरणीचें अवलंबन केलें असतां हें कार्य होणार आहे. परंतु सांप्रत नव्या कराराविषयीं मात्र विचार करण्याचा माझा मानस आहे. तथापि नवा व जुना करार यांचा अति निकट संबंध असल्यामुळें एकाविषयीं विचार करूं गेलें असतां दुसऱ्याविषयीं विचार केल्याशिवाय निर्वाह होणार नाहीं असें दिसून येईल.

जो शोध आपण आरंभिला आहे त्यामध्यें आपण कोठपर्यंत येऊन पोहोंचलों हें नीट लक्ष्यांत आणा ह्मणजे पुढील गोष्टी समजण्यास कठीण जाणार नाहीं. नव्या करारांतील पुस्तकें ज्या काळांत लिहिलीं असें ख्रिस्ती लोक ह्मणतात, त्याच काळांत तीं खरोखर लिहिलीं, व नव्या कराराचें प्रथमारंभीं जें स्वरूप होतें तेंच हल्लीं कायम आहे, हें सिद्ध झालें. आतां त्या ग्रंथांत काय आहे हें पाहिलें पाहिजे. ग्रंथ उघडून पाहतांच सकृद्दर्शनीं त्यामध्यें आठ वेगवेगळ्या ग्रंथकारांचीं नांवें दृष्टीस पडतात. पुढें जरा बारकाईनें पाहतां असें दिसतें कीं ग्रंथाचा अर्धा भाग ख्रिस्ती धर्माचा आरंभ कोणत्या प्रकारें होऊन त्याचा प्रसार कसा झाला ह्या विषयाच्या निरूपणानें व्यापिला आहे. बाकीचा भाग कोणी एक ख्रिस्ती धर्माचा नामांकित उपदेशक त्याच काळांत उदयास आला, त्याच्या पत्रांनीं बहुतकरून आटोपला आहे असें दिसतें. आतां अशा प्रकारच्या ग्रंथाचें महत्त्व किती आहे हें सांगण्याची येथें गरज नाहीं. कारण, जर आज ग्रीक किंवा रोमन, हिंदु किंवा चिनी धर्मांच्या इतिहासांसंबंधी फार प्राचीन काळीं लिहिलेल्या ग्रंथांचा शोध कोणीं लावला, तर जगांतील विद्वान् लोक ते ग्रंथ वाचून पाहण्यास किती उत्सुकतेनें प्रयत्न करतील, हें सांगावयास नको. परंतु पूर्वदेशाचा इतिहास चांगला समजण्याचें जें साधन ह्मणजे ऐतिहासिक लेख किंवा कागदपत्रें तीं मुळींच नाहींत, असें

आपण कोठवर येऊन ठेपलों.

नव्या कराराच्या पुरातनत्वावरून व त्यांतील मजकुरावरून त्याचें मोल.

एशिआ खंडांतील भाषा जाणणाऱ्या विद्वन्मंडलाचें गाऱ्हाणें आहे, व ह्मणूनच हिंदुस्थान, इराण, अरबस्थान वगैरे देशांचा प्राचीन इतिहास उपलब्ध नसल्यानें विद्वानांस दुःख करीत बसावें लागत आहे, व त्याचें निरसन करण्याची त्यांस मुळींच आशा राहिली नाहीं. आतां अशी कल्पना करा, कीं झोरास्तर किंवा बुद्ध हे ज्या काळांत उदयास आले त्या काळांत लिहिलेला व ज्यामध्यें त्यांच्या धर्मांची चांगली पक्की माहिती असून त्या धर्मस्थापकांच्या शिष्यांच्या हातचीं पत्रें आहेत, असा ग्रंथ सांपडला व त्याची खबर चहूंकडे पसरली तर विद्वन्मंडलांत केवढी चळवळ सुरू होईल बरें ? असला अमूल्य ग्रंथ पाहण्यास, तो लावण्यास, त्याचा अर्थ करण्यास व त्यांतील अर्थाची चर्चा करून त्यावर टीका लिहिण्यास जो तो प्रयत्न करील. जर पारशी किंवा बौद्ध धर्माचा ग्रंथ सांपडल्यास विद्वान् लोकांत अशी चळवळ सुरू होण्याचा संभव आहे, तर ज्या ग्रंथाच्या योगानें ख्रिस्ती धर्माचा आरंभ कसा झाला व त्या धर्माचें वजन मनुष्यामात्रावर कसें पडलें व हल्लीं पडत आहे व पुढें सदोदित पडण्याचा क्रम राहील वगैरे गोष्टींचें ज्ञान होतें असल्या ग्रंथाकडे लक्ष्य किती विशेष लागलें पाहिजे !

तर मग या अप्रतिम ग्रंथांत कोणती माहिती आहे हें आपण आतां नीट पाहूं. नव्या करारांत येशू ख्रीस्त ह्मणून कोणी पुरुष होऊन गेला, त्याचें वृत्त त्याचे जन्मापासून तों मरणानंतर त्याचें पुनरुत्थान होऊन तो स्वर्गांत जाईपर्यंत लिहिलें आहे. ख्रीस्ताचें स्वर्गारोहण होण्याच्या अगोदर त्यानें आपले शिष्यांस धर्मप्रसारार्थ जी आज्ञा दिली, तिचें पालन त्यांनीं कसें केलें व सर्व जगांत त्या धर्माचा प्रसार कसा केला वगैरे हकीकत ख्रीस्ताच्या चरित्राच्या मागून लिहिली आहे.

तर आतां ह्यावरून असा एक प्रश्न निघतो, कीं नव्या करारांतील गोष्टी विश्वसनीय आहेत कीं काय? नवा करार हा पुरातन ग्रंथ आहे हें मागें सिद्ध झालें. परंतु तो पुरातन आहे एवढ्यानेंच तो विश्वसनीय आहे असें होत नाहीं. तसेंच, तो ऐतिहासिक ग्रंथ आहे हेंही आम्हीं सिद्ध केलें. परंतु सर्वच इतिहास खरे व भरंवशालायक असतात असेंही नाहीं. तर नव्या करारांतील इतिहास खरा आहे किंवा कल्पित आहे हें पाहिलें पाहिजे.

नव्या करारांतील गोष्टी विश्वसनीय आहेत हें पुढील प्रमाणांवरून सिद्ध होतें.

ख्रीस्ताच्या जीवनचरित्राचीं चार पुस्तकें.

**पहिलें प्रमाण.**—ख्रीस्ताचें चरित्र नाहीं तरी चोहोंपेक्षां कमीजणांनीं लिहिलेलें नाहीं, आणि त्यांच्या लेखांतील गोष्टींच्या पुष्टीकरणार्थ नव्या करारांतील इतर भागांचा पुरावा मिळतो.

ख्रीस्ताचीं चाऱ्ही चरित्रें चार जणांनीं स्वतंत्र रीतीनें वेगवेगळ्या वेळीं व वेगवेगळ्या ठिकाणीं लिहिलेलीं आहेत. तेव्हां अर्थात्‌च तीं लिहिणारांनीं एकमेकांचें पाहून व एकमेकांच्या विचारानें मुळींच लिहिलेलीं नाहींत. तथापि त्या चाऱ्हीही चरित्रांतील साम्य मोठ्या विलक्षण प्रकारचें आहे. त्या चौघां लेखकांच्या भाषेची शैली व चरित्रलेखकांची

विचारसरणीही वेगवेगळ्या प्रकारची आहे, तरी त्यांतील बहुतेक सर्व गोष्टींशीं मोठा मेळ आहे. एखादा इतिहास एकापेक्षां अधिक जणांनीं लिहून ठेवला असला व त्या सर्वांत मुख्य गोष्टींचें साम्य असलें तर तो भरंवशालायक आहे असें आपण मानितों. सिपिओ आफ्रिकानस यानें ज्या रोमन लढाया मारिल्या, त्यांचें वृत्त केवळ एकानेंच ह्मणजे पोलिबियस नामक इतिहासकारानें लिहून ठेविलें आहे; तथापि पोलिबियस याचा इतिहास जगन्मान्य असण्याचें कारण हें आहे कीं तो स्वतः सिपियोबरोबर लढाईंत होता व ज्या कांहीं गोष्टी त्यानें प्रत्यक्ष पाहिल्या, त्यांतील मुख्य मुख्य त्यानें लिहिल्या. असें जर आहे, तर ख्रीस्ताच्या चरित्रांतील गोष्टींचा वृत्तांत चार समकालीन इतिहासकारांनीं लिहिलेला आहे. यांपैकीं दोघे ह्मणजे मात्थी व योहान हे ख्रीस्ताच्या बरोबर नेहमीं असत व ज्या गोष्टी त्यांनीं प्रत्यक्ष पाहिल्या त्या त्यांनीं टिपून ठेविल्या. तिसरा चरित्रकार मार्क ह्मणून जो होता त्याचा ख्रीस्ताचा शिष्य पेत्रस याशीं अति निकट संबंध असे. बाकी राहिलेला जो लूक तो पौलस प्रेषिताचा सहचारी असे. तेव्हां त्यांनीं लिहिलेलीं चरित्रें खरीं न मानण्यास जागाच नाहीं.

नव्या करारांतील पत्रें केवळ ऐतिहासिक गोष्टींनींच जरी भरलेलीं नाहींत, तथापि नव्या करारांतील ऐतिहासिक पुस्तकांत आलेल्या गोष्टींचे उल्लेख त्यांत जागोजाग केलेले आहेत, व असे उल्लेख व शुभवर्त्तमानांतील इतिहास यांमध्यें उत्तम प्रकारचा मेळ आहे. हा मेळ कसा हें आपण पाहूं. पौलसानें रोमकरांस, करिंथकरांस, व गलतीकरांस जीं पत्रें लिहिलीं तीं इ० स० ५८च्या सुमारास किंवा निदानपक्षीं इ० स० ६० या सालीं लिहिलीं असावीं. आतां या पत्रांमध्यें ख्रीस्ताच्या चरित्रांतील मुख्य मुख्य गोष्टी आल्या आहेत. उदाहरणार्थ, ख्रीस्ताचे पुनरुत्थानाविषयीं पौलस वारंवार उल्लेख करून त्यावर ख्रिस्ती धर्माची इमारत उभारलेली आहे, असें दाखवितो. यावरून असें ठरतें, कीं हल्लीं ख्रिस्ती लोक ख्रीस्ताविषयीं ज्या कांहीं गोष्टी मानितात, त्याच गोष्टी ख्रीस्ताचें पुनरुत्थान झाल्यावर सुमारें २५ वर्षांच्या आंत त्याविषयीं मानीत असत. परंतु याहीपेक्षां सबळ प्रमाण आहे: तें असें कीं पौलसानें गलतीकरांस जें पत्र लिहिलें तें इ० स० ५४व्या वर्षीं लिहिलें असावें. या पत्रांत तो असें ह्मणतो, कीं यरूशलेमास जाण्याच्या अगोदर चौदा वर्षें मीं शुभवर्त्तमान गाजविलें. तर ज्या सालीं तें पत्र लिहिलें तें साल ह्मणजे इ० स० ५४ यांतून चौदा वर्षें बाद केलीं असतां इ० स० ४० या वर्षाजवळ ह्मणजे येशू ख्रीस्ताच्या मरणानंतर सहा सात वर्षांच्या काळाजवळ आह्मी येऊन ठेपतों.

ख्रीस्ताच्या चरित्रांतील गोष्टी खऱ्या आहेत यास जशीं सबळ प्रमाणें मिळतात तशीं प्रमाणें दुसऱ्या कोणत्याही ऐतिहासिक गोष्टीला क्वचित्‌च मिळतात.

प्रेषितांचीं कृत्यें ह्मणून दुसरा एक ऐतिहासिक ग्रंथ नव्या करारांत आहे. तो लूकानें लिहिलेला आहे. त्यांत त्यानें मुख्यत्वेंकरून आपला सहचारी पौलस याचें वृत्त लिहिलें आहे.

**दुसरें प्रमाण.**—नव्या करारांतील गोष्टी खऱ्या आहेत असें तो ग्रंथ लिहिणारांच्या स्थितीवरून ठरतें. कारण त्यांनीं त्यांत ज्या गोष्टी लिहिल्या आहेत त्यांची माहिती मिळविण्याज्ञीं त्यांजवळ पुष्कळ साधनें होतीं; आणि त्यांची एकंदर स्थिति अशी होती कीं त्यांस त्या माहितीचा उत्तम उपयोग करितां आला.

लिहिणारांची स्थिति.

नव्या कराराचे लिहिणारे फार पुरातन काळाविषयीं किंवा एखाद्या दूरच्या अज्ञात देशाविषयीं लिहीत नाहींत, परंतु ज्या गोष्टी त्यांनीं प्रत्यक्ष पाहिल्या व प्रत्यक्ष ख्रीस्ताकडून ऐकिल्या, त्या त्यांनीं लिहून ठेविल्या आहेत.* आणखी, ज्या गोष्टी त्यांनीं लिहून ठेवल्या आहेत त्या कोन्याकोंपऱ्यांत झाल्या व त्यांसच माहीत होत्या असें नाहीं, तर त्या गोष्टी यरूशलेम व यहूदा यांतील इतर गांव यांतून घडून आल्यामुळें तेथील सर्व समजूतदार लोकांसमक्ष व तेथील बंदोबस्ताकरितां ठेवलेल्या रोमन शिपाई व रोमन अमलदारांसमक्ष त्या घडून आल्या. नव्या करारांतील गोष्टी लोकप्रसिद्ध असल्यामुळें त्यांस किती महत्त्व आलें आहे हें तुमच्या लक्ष्यांत सहज येईल. महमदाविषयीं ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्यांमध्यें लोकप्रसिद्धीचा मुळींच अभाव आहे. मुसलमान लोक असें ह्मणतात, कीं महमद एके रात्रींतून घोड्यावर बसून मक्केहून यरूशलेमास गेला, तेथून स्वर्गास गेला, व तेथून कांहीं आश्चर्यकारक गोष्टी पाहून व ऐकून तो त्याच रात्रीं परतला. हें वाचतांच याला प्रमाण काय अशी आशंका उत्पन्न होते. हा जो प्रवास महमदानें आश्चर्यकारक रीतीनें केला, त्या वेळेस त्याच्या शिष्यवर्गापैकीं कोणी त्याच्या बरोबर होता किंवा नाहीं, किंवा ज्यानें ती गोष्ट लिहून ठेवली, तो तरी त्याच्या बरोबर होता किंवा त्याचा समकालीन होता किंवा नाहीं, वगैरे शंकानिवारणार्थ कांहीं एक पुरावा मिळत नाहीं. महमदाची ही गोष्ट खरी किंवा खोटी याविषयीं प्रस्तुत विचार करायाचा नाहीं. तिच्या संबंधानें केवळ इतकेंच माझें ह्मणणें आहे, कीं ती गोष्ट सिद्ध करून देणें ह्मटलें ह्मणजे कठीण आहे. जे त्या गोष्टीवर भरंवसा ठेवितात ते केवळ महमद ह्मणतो ह्मणून ठेवितात हें उघड आहे. आतां अशा गोष्टीवर भरंवसा ठेवणें हें योग्य किंवा अयोग्य हें ज्याचें त्यानें पहावें: मात्र ही गोष्ट घडली यास कोणी साक्षी नाहीं एवढें त्यानें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे.

माहिती मिळण्याचीं साधनें.

लोकप्रसिद्ध गोष्टी.

आतां ख्रीस्ताची सैतानाकडून झालेली परीक्षा वगैरे ख्रीस्तचरित्रांतील कित्येक चमत्कारिक गोष्टी जरी एकांतांत झाल्या, तरी दुसऱ्या पुष्कळ लौकिकांत झाल्या. त्यानें हजारों लोकांसमक्ष उपदेश केले. पुढें जेव्हां त्याच्या शिष्यांनीं त्याच्या कामांविषयीं लोकांस सांगितलें, तेव्हां त्या गोष्टी खोट्या आहेत असें त्यांच्यानें म्हणवलें नाहीं, कारण ख्रीस्तानें

---

* ते ह्मणतात, "जें आह्मीं ऐकिलें, जें आह्मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें, तेंच आह्मी सांगतों." १ योहान १ : ३.

अंधळ्यांस दृष्टि दिली, लंगड्यांस चालावयास लाविलें व बहिऱ्यांस ऐकूं येईल असें केलें; इत्यादि ज्या त्यानें अनेक अद्भुत गोष्टी केल्या, त्यांस हजारों लोक साक्षी होते. आणखी, शुभवर्त्तमानकारांनीं ख्रीस्ताचीं चरित्रें लिहून ज्या देशांत त्या गोष्टी घडल्या म्हणून सांगितलें आहे त्याच देशामध्यें म्हणजे यहूदामध्येंच तीं प्रसिद्ध केलीं. याकरितां त्या चरित्रांमध्यें जर कांहीं खोट्या गोष्टी असत्या तर त्याच वेळचे यहूदा देशांत राहणारे यहूदी आणि रोमन लोक यांनीं त्या तेव्हांच उघडकीस आणिल्या असत्या.

यहूदी लोक हे ख्रिस्ती लोकांचा अत्यंत द्वेष करीत असत. त्यांनींच ख्रिस्ताला जिवें मारिलें, आणि ख्रिस्ती धर्माचा जगामध्यें मागमूस राहूं देऊं नये असें त्यांच्या मनांतून होतें. मूर्त्तिपूजक लोक देखील पुढें लवकरच ख्रिस्ती लोकांस छळूं लागले व हरतऱ्हेनें त्यांच्या धर्मावर हल्ला करण्यास त्यांनीं सुरवात केली. यावरून असें दिसून येतें कीं जर

नव्या करारांतील चुका यहूदी लोक काढल्यावांचून कधीं न राहते.

करितां नव्या कराराच्या ग्रंथकारांनीं सत्यापलाप करून एखादी गोष्ट लिहिली असती, किंवा धर्मास भूषण यावें याकरितां एखादे गोष्टींत रजाचा गज केला असता, अथवा धर्मास लांच्छन येईल अशा कोणत्याही गोष्टीवर पांघरूण घातलें असतें, किंवा ख्रीस्तामध्यें चमत्कार करण्याची शक्ति नसतां ती होती असें बिरीद बांधलें असतें, किंवा ख्रीस्त शुद्धाचारी नसतां तो शुद्धाचारी होता असें ह्मटलें असतें, तर ख्रिस्ती धर्माच्या शत्रूंचें चांगलेंच कार्य साधलें असतें, व ज्यांनीं त्या धर्माचा स्वीकार केला होता त्यांजवर ह्या गोष्टीबाबत दोष ठेविला असता. परंतु ख्रिस्ती धर्मद्वेष्ट्यांनीं असें कांहीं केलें नाहीं, हें मी पुढें ह्याच पत्रांत दाखविणार आहें; त्यावरून नव्या करारांत लिहिलेल्या गोष्टी केवळ भरंवशालायक आहेत अशी तुमची खातरी होईल.

लिहिणारांचें वर्तन.

**तिसरें प्रमाण.**—नवा करार लिहिणारांच्या वर्तणुकीवरून त्या ग्रंथांतील गोष्टीच्या सत्यतेस सबळ प्रमाण मिळतें.

ज्या गोष्टी त्यांनीं लिहून ठेवल्या आहेत त्यांच्या सत्यतेविषयीं खातरी करून घेण्यास त्यांस पुष्कळ प्रसंग मिळाले हें मीं मागें सांगितलें. आतां त्यांनीं या प्रसंगाचा सत्कारणीं व्यय केला हें मी दाखविणार आहें. त्यांच्या सर्व लेखांच्या रोंखावरून पाहिलें असतां,

त्यांचा प्रामाणिकपणा.

तीं सचोटीचीं मनुष्यें होतीं हें सिद्ध होतें. त्यांच्या लेखांवरून ते किती साळसूद, भावार्थी, निष्कपट व सत्यवादी होते हें निष्पक्षपाती वाचकास सहज दिसून येईल. एखादी गोष्ट तिखट मीठ लावून सांगण्याचा प्रकार किंवा एखाद्या गोष्टीवर झांकण घालण्याचा प्रकार त्यांच्या लिहिण्यांत कोठेंही दिसत नाहीं. आपल्या प्रभूचा दारिद्र्यावस्थेंतील जन्म, व त्याची मोठी गरिबी—त्यांची स्वतांःची निकृष्टावस्था, जडबुद्धि, व अविश्वास—त्यांनीं आपल्या प्रभूचा केलेला त्याग—प्रभूचें खांबावरील मरण (जी गोष्ट ख्रीस्तास व

ख्रिस्ती लोकांस लांच्छनास्पद आहे, असें यहूदी व मूर्तिपूजक लोकांनीं मानलें आहे[१] )—ह्या आणि दुसऱ्या यांसारख्या ज्या गोष्टी मनुष्याच्या अभिमानाला बाधक आहेत त्या नव्या कराराच्या ग्रंथकारांनीं धरसोड न करितां, किंवा त्यांवर झांकण न घालतां, किंवा कांहीं गोष्टी साजऱ्या दिसण्याकरितां त्या न गौरवितां जशाच्या तशा लिहून ठेविल्या आहेत. ह्यावरून साधारणपणें मानवी स्वभावाशीं त्यांचे स्वभावांची तुलना केली असतां ते प्रामाणिक व सत्यवचनी होते असें स्पष्ट दिसतें.

आतां त्यांच्या ग्रंथांच्या समग्र लक्षणावरून देखील ते मोठे सत्यनिष्ठ होते असें ठरतें.

त्यांच्या दुःख सोसण्यावरून त्यांचें प्रामाणिकपण सिद्ध होतें.

धर्माकरितां त्यांस व खीस्ताचे इतर शिष्यांस असंख्य व दुःसह दुःखें सोसावीं लागलीं. बहिष्कार, अप्रतिष्ठा, छळणूक, कैद, मरण हीं त्या काळांत ख्रिस्ती लोकांच्या वांट्यास वारंवार येत असत.[२] या देशांतील जे लोक आपल्या वडिलोपार्जित धर्माचा त्याग करून ख्रिस्ती मंडळींत प्रवेश करितात त्यांस किती कठीण दुःखें सोसावीं लागतात हें तुम्हांस चांगलें माहीत आहे. ज्यांची ख्रिस्ती धर्माविषयीं पुष्कळ खातरी झाली आहे अशा तरुणांनीं वर सांगितलेल्या प्रकारचीं दुःसह दुःखें पाहिलीं असतां त्यांपैकीं कित्येकांच्या अंगांचा थरकांप होतो, ते चुचकळ्यांत पडतात, सत्य धर्म स्वीकारण्यास मागें घेतात आणि शेवटीं खीस्ताचें नांवही घेण्याचें सोडून देतात. परंतु हल्लींच्या काळांत ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यास या देशांत जीं दुःखें सोसावीं लागतात तीं प्राचीन काळीं ख्रिस्ती लोकांच्या दुःखांशीं ताडून पाहिलीं असतां त्यांत जमीनअस्मानाचा फरक दृष्टीस पडतो. ख्रिस्ती धर्मरूप वृक्ष जेव्हां कोमल रोपडा होता तेव्हां त्याला खरोखर रक्ताचें शिंपणें झालें असें म्हणायास कांहीं हरकत नाहीं.

ह्यावरून काय सिद्ध होतें? हे खीस्ताचे शिष्य सत्यव्रत होते अशी आपली खातरी होते. ते ठक नव्हते. जें कांहीं त्यांनीं स्वीकारिलें होतें त्यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. जेव्हां मनुष्य आपल्या धर्माकरितां प्राण अर्पण करितो तेव्हां त्याला कोणी ढोंगी ह्मणत नाहींत, व त्याचें बोलणें मनापासून आहे याविषयीं कोणाला संशय येत नाहीं.

---

[१] बौद्ध धर्माचे अलीकडील ग्रंथांत खीस्ताच्या चरित्रांतील बहुतेक मुख्य गोष्टींचें विनोदार्थ अनुकरण केलें आहे. परंतु खीस्ताचें खांबावरील मरण ही जी एक वगळलेली व मानवी व्यर्थ अभिमानास बाध आणणारी गोष्ट तिचा उल्लेख त्या ग्रंथांत केलेला कोठेंच आढळत नाहीं. त्याचप्रमाणें, प्राचीन काळीं देखील मूर्तिपूजक लोकांनीं खीस्ताच्या चरित्रांतील बहुतेक गोष्टींचें अनुकरण केलेलें दिसून येतें. टयाना येथील आपोलोनियस ह्यासारखे कित्येक पुरुष खीस्ताच्या तोलाचे होते असें ह्मणत असत. परंतु त्यांपैकीं एकानें देखील खीस्ताप्रमाणें खांबावर जीव दिला असें त्याचें वर्णन केल्याचें कोठेंही आढळून येत नाहीं.

[२] आमचे वाचकांस प्राचीन इतिहासाचें ज्ञान असल्यास आमचें लिहिणें सर्वशः खरें आहे असें तेव्हांच दिसून येईल.

२. ज्या गोष्टींकरितां ख्रीस्ताच्या शिष्यांस अशीं भयंकर संकटें सोसावीं लागलीं, त्या कोणत्या होत्या हें आपण पाहूं. ज्या गोष्टी त्यांच्या देखत घडून आल्या व ज्या त्यांनीं भरंवसा ठेवण्यालायक मनुष्यांकडून ऐकिल्या व त्यांवर त्यांनीं आपला भरंवसा ठेविला म्हणून त्यांस वर सांगितल्याप्रमाणें अनेक दुःखें सोसावीं लागलीं. आतां अनुमान करण्यासारख्या गोष्टी व प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टी या दोहोंमध्यें महदंतर आहे. ज्या अनुमान करण्यालायक गोष्टी त्या केवळ तर्कानें ठरविलेल्या आहेत, परंतु ज्या गोष्टी प्रत्यक्ष घडून आलेल्या आहेत त्या अमुक एका ठिकाणीं व अमुक वेळीं घडून आल्या असें त्यांविषयीं सांगतां येतें. हें अधिक स्पष्ट करण्याकरितां आपण एक उदाहरण घेऊं. अशी कल्पना करा, कीं साक्रेटीसासारख्या तत्त्वज्ञान्यावर देवाविषयीं कांहीं मतें प्रतिपादन केल्यामुळें दोषारोप आणिला आहे, व जर तो त्या मतांचा त्याग करीत नाहीं तर त्यास देहांत शिक्षा मिळेल असेंही पण सांगितलें आहे. अशा प्रसंगीं तो काय करील बरें? जर त्या मतांवर त्याचा पक्का भरंवसा नसला तर तो अर्थात्च तीं मतें सोडून देऊन मरण टाळील; किंवा जरी तीं मतें खरीं आहेत अशी त्याची खातरी असली, तरी मरणाच्या भयामुळें तो आपले बोल परत घेऊन आपले जिवाचें रक्षण करील. जगद्विख्यात गालिलियो यानें असेंच वर्तन केलें हें सर्वांस माहीत आहे. परंतु अशा संबंधांत तिसऱ्याही एका गोष्टीचा संभव आहे. त्या तत्त्वज्ञान्याचा आपल्या मतांवर पूर्ण विश्वास असल्यामुळें तो आपलीं मतें कदापि न सोडतां मरायासही तयार होईल. अशी कल्पना करा, कीं ज्यानें बौद्ध व जैन लोकांशीं पुष्कळ वादप्रतिवाद केले त्या शंकराचार्याला त्या लोकांनीं धरून बंदींत घातलें, व वेदान्त मत सोडल्याविना आह्मी तुह्मांस मुक्त करणार नाहीं, नाहींपेक्षां प्राणत्याग करावा लागेल, अशी त्यांस भीति घातली आहे. परंतु शंकराचार्य या दरडावण्यास जुमानीत नसल्यामुळें त्यास मरावें लागलें. यावरून काय ठरतें बरें? यावरून असें ठरतें, कीं शंकराचार्याचा विश्वास जीं मतें तो प्रतिपादन करीत असे त्यांवर पूर्णपणें होता इतकेंच. त्यावरून वेदान्त मत खरें असें किमपिही ठरत नाहीं. त्यानें आपला प्राण मतांकरितां दिला इतकें मात्र खरें; परंतु न जाणों तीं मतें खरींच कशावरून, खोटीं कां असणार नाहींत? त्यानें प्राण दिला यांत त्याच्या निग्रहाची स्तुति केली पाहिजे; परंतु ज्यांसाठीं त्यास मरण सोसावें लागलें, तीं मतें खरीं किंवा खोटीं ही गोष्ट संशयात्मकच राहिली. कदाचित् असें ह्मणावें लागेल, कीं त्याच्या चित्तास भ्रम झाल्यामुळें त्यानें प्राण दिला. तेव्हां अनुमान केलेल्या गोष्टी मरणानें खऱ्या ठरतात असें कदापि नाहीं, असें तुह्मांस सहज कळून येईल.

प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींविषयीं त्यांची साक्ष.

प्रत्यक्ष गोष्टी व अनुमानाच्या गोष्टी यांतील अंतर.

ख्रीस्ताच्या शिष्यांस जें मरण सोसावें लागलें, तें अनुमानसिद्ध गोष्टींकरितां नसून, खरोखर घडून आलेल्या गोष्टींकरितां होतें. त्यांचा प्रभु मरण पावून पुनः उठला, त्या

नंतर तो बहुतांस दिसला व त्यांच्या समक्ष स्वर्गाकडे जाता झाला.[१] ही जी घडून आलेली मुख्य गोष्ट तिच्यावर त्यांनीं विश्वास ठेविला ह्मणून त्यांस पुष्कळ दुःखें सोसावीं लागलीं. त्या गोष्टीमध्यें अनुमानाचें कांहीं नसून ती केवळ मानवजातीस आपल्या इंद्रियांच्या योगें समजून घेण्याजोगी होती. तिजविषयीं त्यांनीं अनेक ठिकाणीं या प्रकारें उल्लेख केला आहे :—"जीवनाच्या शब्दाविषयीं, जें प्रारंभापासून होतें, जें आह्मीं ऐकिलें, जें आह्मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें, जें आह्मीं न्यहाळिलें व आपल्या हातांनीं चांपसिलें आहे, तेंच आह्मी सांगतों."* "आह्मीं पाहिलें आहे व साक्ष देतों."† "आह्मीं पवित्र डोंगरावर त्याच्या संगतीं असतां ही आकाशांतून झालेली वाणी ऐकिली."‡ हें बोलणें अगदीं स्पष्ट आहे.

मनुष्यांस इंद्रियांच्या द्वारा जें ज्ञान होतें त्यावर त्यांनीं जर विश्वास ठेवूं नये तर त्यांचा व्यवहार चालावा कसा? इंद्रियजन्य ज्ञानावर त्यांस विश्वास ठेविलाच पाहिजे: तसें केल्याशिवाय त्यांच्यानें जगांत राहवणारच नाहीं.

त्यांच्या इंद्रियांनीं त्यांस फसविलें हें संभवत नाहीं.

ह्या प्रमाणाचें खंडन करण्याच्या हेतूनें कोणी कदाचित् अशी शंका घेईल, कीं जीं मनुष्यें अशिक्षित, कोत्या मनाचीं, भोळीं व धर्मवेडीं असतात, त्यांस ज्या गोष्टी त्यांनीं कधीं पाहिल्या नाहींत व ऐकिल्या नाहींत त्या प्रत्यक्ष आह्मी पहात आहोंत व ऐकत आहोंत असा भास होतो, त्याप्रकारें ख्रीस्ताचे शिष्यांस झालें नसेल हें कशावरून? आतां ही गोष्ट खरी आहे, कीं ज्यांस पिशाचादि गोष्टी खऱ्या वाटतात, ज्यांचा शकुनादि गोष्टींवर भरंवसा बसून त्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत असा ज्यांच्या मनाचा पूर्ण ग्रह झालेला असतो, त्यांस आह्मांस पिशाच दिसत आहे, व तें बोलत आहे, व त्याचे शब्द

---

[१] पश्चिम हिंदुस्थानांत ख्रिस्ती लोक जेव्हां ख्रीस्ताविषयीं उपदेश करतात तेव्हां हिंदु लोक तुकारामाची गोष्ट सांगतात, व तो सदेह वैकुंठास गेला असें ह्मणतात. तुकाराम हा महाराष्ट्र देशांतील कवि सुमारें २०० वर्षांमागें (१६४९) होऊन गेला. त्याच्या जन्मापासून १०० वर्षांपर्यंत जे ग्रंथ झाले त्यांपैकीं एका देखील ग्रंथांत तो वैकुंठास गेला असें लिहिलेलें नाहीं. जरी त्याचे भक्त तो अमक्या दिवशीं वैकुंठास गेला असें ह्मणतात, तथापि त्याच्या अभंगांची जी मूल्यवान् हस्तलिखित प्रत देहू एथें आहे तिजमध्यें असें स्पष्ट लिहिलें आहे, कीं त्या दिवशीं तुकाराम तीर्थाटनास निघाला. इ० स० १८६९ सालीं तुकारामाची गाथा ह्मणून जो ग्रंथ छापला गेला त्यांत जें तुकारामाचें चरित्र दिलें आहे त्यांत त्या चरित्रकारानें असें स्पष्ट ह्मटलें आहे कीं त्या वेळीं कांहीं अमानुष कृत्य घडलें नाहीं.

तुकाराम वैकुंठास गेला ही आख्यायिका प्रसिद्ध होण्याचे पूर्वीं १५० वर्षें व तुकारामाचें चरित्र प्रसिद्ध होण्याचे पूर्वीं २५० वर्षें महाराष्ट्र देशांत रो० कॅ० मिशनेरी लोक येशू ख्रीस्ताविषयीं उपदेश करीत होते. त्यावरून ख्रीस्ताचे स्वर्गारोहणाचें अनुकरण करण्याच्या बुद्धीनें ही आख्यायिका निघाली असावी असें वाटतें.

* १ योहान १:१. † १ योहान ४:१४. ‡ २ पेत्रस १:१८.

आमचे कानीं पडत आहेत, असा भास होतो. परंतु ख्रीस्ताचे शिष्यांस ह्या प्रकारचा विकार झाला असावा हें कसें बरें संभवेल? एकांतवासांत किंवा अंधारांत मन घाबरें होऊन वर सांगितल्या प्रकारच्या एखाद्या मनुष्याला मजपुढें भूत आहे असा भास होईल, परंतु हा आभास अंधार निघून उजेड झाल्यावर, किंवा त्या ठिकाणीं दुसरें कोणी आल्यास नाहींसा होतो, हें सर्वांस माहीत आहे. परंतु ख्रीस्ताच्या शिष्यांची अशी स्थिति नव्हती. ख्रीस्ताचें पुनरुत्थान झाल्यावर आपण मरून पुनः जीवंत झालों, ह्या गोष्टीविषयीं लोकांची खातरी करण्याकरितां ४० दिवसपर्यंत तो आपले शिष्यांस दिसत होता, तो त्यांचे बरोबर बसला उठला, त्यानें त्यांच्या बरोबर अन्न खाल्लें व आपण पुनः उठल्याबद्दल त्यांचे मनांतील सर्व शंकांचें समाधान केलें. त्यावरून मी खरोखर उठलों आहें अशी त्यांची खातरी झाली यांत नवल तें काय? एके प्रसंगीं तर ५०० पेक्षां अधिक लोकांस ख्रीस्त दिसला. तेव्हां ख्रीस्ताचे शिष्य हे सर्वच वेडे होते असें ह्मटलें पाहिजे, किंवा जें त्यांनीं पाहिलें, ऐकिलें व स्पर्शानें जाणलें ह्मणून ह्मटलें आहे, तें सर्व खरें आहे असें तरी ह्मटलें पाहिजे, त्याशिवाय गत्यंतरच नाहीं. न्यायाच्या कोर्टांत देखील प्रत्यक्ष पाहणाऱ्या साक्षीदाराच्या साक्षीस खरे आणि निष्पक्षपाती न्यायाधीश प्रत्यंतर साक्षीपेक्षां किती जास्त महत्त्व देतात, हें तुह्मांस माहीत आहेच.

ख्रीस्ताचे शिष्य स्वतः फसले नाहींत व दुसऱ्यांस त्यांनीं फसविलें नाहीं.

यावरून असा निर्णय होतो, कीं ख्रीस्ताचे शिष्य ज्या खरोखर गोष्टी घडून आल्या त्यांविषयीं ते स्वतः फसले नव्हते, व दुसऱ्यांस फसविण्याचा यत्न त्यांनीं केला नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. जर ते स्वतः फसले नाहींत व फसविण्याचा त्यांचा उद्देश नव्हता, तर त्यांची साक्ष खरी आहे; ह्मणजे नव्या करारांतील इतिहास सत्य व विश्वसनीय आहे.

प्राचीन काळच्या ख्रिस्ती लोकांची साक्ष.

**चौथें प्रमाण.**—आणखी एक गोष्ट आह्मीं लक्ष्यांत वागविली पाहिजे. ती कोणती ह्मणाल तर नव्या कराराचे सत्यतेविषयीं त्या ग्रंथाचे लिहिणारे व ख्रीस्ताचे प्रेषित हेच मात्र साक्ष देतात असें नाहीं, तर प्राचीन काळीं ज्यांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारला त्यांची देखील साक्ष मिळते. ज्या प्रकारें शुभवर्त्तमानकार आणि ख्रीस्ताचे प्रेषित हे फसले नाहींत किंवा दुसऱ्यांस फसविण्याचा त्यांचा उद्देश नव्हता हें सिद्ध करून देतां येतें, त्याच प्रकारें त्या काळच्या इतर ख्रिस्ती लोकांविषयींही ह्मणतां येतें. कारण त्यांस देखील छळ, तुरुंग व मरण हीं भोगावीं लागलीं. ते फसले नाहींत, कारण ख्रीस्ताविषयीं ज्या कांहीं गोष्टी लिहिल्या होत्या त्या खऱ्या किंवा खोट्या हें त्यांस पुरतेपणीं पाहतां आलें. त्या काळांत ख्रीस्ताचा अंगीकार करणें ह्मटलें ह्मणजे मालमत्ता, स्वतंत्रता व जीव धोक्यांत घालणें असें होतें. तेव्हां इतकेंही असून त्यांनीं जर ख्रीस्ताला अंगीकारलें तर यावरून हें स्पष्ट होतें, कीं नव्या करारांतील गोष्टी खऱ्या असल्यावांचून त्यांनीं या प्रकारें वर्तन केलेंच नसतें.

**पांचवें प्रमाण.**—प्राचीन काळीं जे ख्रिस्ती नव्हते त्यांनीं ख्रिस्ती धर्माच्या बहुतेक मुख्य गोष्टी ग्राह्य केल्यावरून नव्या करारांतील इतिहास भरंवशालायक आहे असें स्पष्टपणें व्यक्त होतें, हें आह्मीं खालीं आधार दिले आहेत त्यांवरून कळेल. प्लीनी ह्मणून एक ग्रंथकार ख्रीस्ताच्या मरणानंतर ७० वर्षांनीं होऊन गेला. त्यानें ख्रिस्ती लोकांविषयीं या प्रकारें ह्मटलें आहे:—"बिथिनिआ प्रांतांत ख्रिस्ती लोकांची मोठी संख्या असून ते ख्रीस्ताला देव समजून भजत असत." ख्रीस्ताच्या मरणानंतर ३४ वर्षांनीं टासिटस ह्मणून कोणी इतिहासकार होऊन गेला; त्यानें आपले इतिहासांत असें ह्मटलें आहे, कीं "रोमचा बादशाह निरो यानें ख्रिस्ती लोकांचा फार क्रूरतेनें रोम शहरीं छळ केला." आणखी तो असें ह्मणतो, कीं "तिबेरीयस बादशहाचे कारकीर्दींत पंतस पिलातस गवरनर असतां येशू ख्रीस्तास यहूदा प्रांतांत जिवें मारिलें." सुटोनियस ह्मणून दुसरा एक इतिहासकर्ता अशाच प्रकारें आपले ग्रंथांत लिहितो. योसीफस ह्मणून एक यहूदी इतिहासकार होऊन गेला; त्यानें नव्या करारांतील पुष्कळ गोष्टींचा उल्लेख आपले ग्रंथांत केला आहे.

जे ख्रिस्ती नव्हते त्यांची साक्ष.

प्लीनी.

टासिटस.

सुटोनियस.

योसीफस.

ख्रिस्ती धर्माचे हाडवैरी यांस देखील त्या काळांत नव्या करारांतील इतिहास नाकबूल करतां आला नाहीं, ही गोष्ट ध्यानांत ठेवणें अत्यंत महत्त्वाचें आहे. यद्यपि यहूदी किंवा मूर्तिपूजक ख्रिस्तीधर्मद्वेष्टे ह्यांनीं ख्रीस्ताचें पुनरुत्थान झालें नाहीं असें ह्मटलें आहे, तथापि नव्या करारांत लिहिलेल्या ख्रीस्ताचे चरित्रांतील मुख्य मुख्य गोष्टी त्यांनीं कबूल केल्या आहेत. त्या गोष्टी जर खऱ्या नसत्या तर त्यांनीं मोठ्या आनंदानें त्या गोष्टींचा खोटसाळपणा उघडकीस आणिला असता.

**सहावें प्रमाण.**—नव्या करारांतील इतिहासास हें जें वरील स्पष्ट प्रमाण मिळतें त्याशिवाय नव्या करारांत कित्येक गोष्टी अशा आहेत, कीं त्यांच्या सत्यतेविषयीं साक्ष पुष्कळ रोमन व ग्रीक ग्रंथांवरून मिळते. उदाहरणार्थ, नव्या करारांत पुष्कळ शहरांविषयीं आणि राष्ट्रांविषयीं जे उल्लेख केले आहेत ते सर्व खरे आहेत असें पुरातन कालच्या ग्रंथांवरून स्पष्ट होतें. यरूशलेम, सिजरीआ दमास्कस, अंत्योख, तारसस, एफसस, आलेक्षांद्रिआ, फिलिपै, आथेन्स, करिंथ व रोम इत्यादि शहरें, तेथील राज्यव्यवस्था, रीतिरिवाज, धर्म वगैरे गोष्टींविषयीं नव्या करारांत लिहिलेलें आढळतें; जर नवा करार ज्या काळांत लिहिला म्हणून ह्मणतात, त्या काळांत तो लिहिलेला नसता, तर त्या वेळच्या ज्या ऐतिहासिक बारीक बारीक गोष्टी प्रसंगोपात्त त्यामध्यें सांपडतात त्यांत पुष्कळ चुका दिसून येत्या. परंतु नवा करार व ग्रीक व रोमन ग्रंथ यांची तुलना करतांना नव्या करारांतील ऐतिहासिक गोष्टी अत्यंत भरंवशालायक आहेत हें तेव्हांच दिसून येतें.

नव्या करारांतील इतिहासास रोमन व ग्रीक ग्रंथांवरून पुष्टीकरण.

**सातवें प्रमाण.**—नव्या करारांतील इतिहासाचे सत्यतेस ग्रीक व रोमन ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या पुराव्याहून दुसरा एक पुरावा १८०० वर्षांचे पूर्वींचीं नाणीं, पदकें, व वैभव किंवा महत्कार्यदर्शकस्तंभ, मनोरे इ० जीं हल्लीं आहेत त्यांजवरील, व काळाच्या तडाक्यांत सांपडून भूमींत गरक झालेलीं जीं हल्लीं जमीन खणतांना सांपडतात, त्यांजवरील लेखांवरून उत्तम प्रकारें मिळतो. हा पुरावा फारच महत्त्वाचा आहे यांत संशय नाहीं. कळावें, लोभ असावा ही विनंती.

नाणीं, पदकें वगैरे यांवरून पुष्टीकरण.

**आपला मित्र—.**



# पत्र पांचवें.

## ख्रिस्ताचे चमत्कार.

नवा करार विश्वसनीय आहे हें निर्विवाद आहे—त्या ग्रंथांत सांगितलेले चमत्कार—चमत्कार कशास ह्मणावें—तत्संबंधानें मुख्य तीन गोष्टी—पहिली: अद्भुत गोष्टींची परीक्षा केली पाहिजे—दुसरी: ख्रीस्तानें चमत्कार केले याला भरपूर पुरावा आहे—याबद्दल सात पुरावे—तिसरी: ख्रीस्ताचें काम ईश्वरी योजनेप्रमाणें होतें असें त्याच्या चमत्कारांवरून ठरतें—यहूदी लोकांच्या आक्षेपास उत्तर.

**प्रिय मित्र—,**

जे विचार मीं मागील पत्रांत प्रगट केले, त्यांवरून नव्या करारांतील इतिहास हा पूर्ण भरंवशालायक आहे अशी कोणत्याही सरळ मनाच्या मनुष्याची खातरी करण्यास बस्स आहेत असें मला वाटतें. नवा करार हा खोटा आहे असें ह्मणणें सोपें नाहीं. कारण जर तो खोटा तर जगाचा संपूर्ण प्राचीन इतिहास खोटा, व ग्रीस देशच्या इतिहासांत प्लेटो व डिमास्थिनीस यांविषयीं व रोमन इतिहासांत केटो व सिसेरो यांविषयीं जें कांहीं लिहिलें आहे तें सर्व खोटें, असें ह्मणणें भाग पडेल. जर जगाचा प्राचीन इतिहास खरा आहे तर नव्या करारांत येशू ख्रीस्त व त्याचे शिष्य यांविषयीं जें लिहिलें आहे तें देखील खरें असें ह्मणणें अवश्य आहे.

ग्रीक किंवा रोमन इतिहासांपेक्षां नव्या करारांतील इतिहासास उत्तम आधार आहे.

ग्रीक व रोमन इतिहासांतील अर्वाचीन व प्रसिद्ध पुरुषांच्या चरित्रांच्या सत्यतेस जितकीं सबळ प्रमाणें आहेत, तितकीं सबळ प्रमाणें नव्या करारांतील इतिहासास मिळतात एवढेंच नाहीं, तर नव्या करारांतील इतिहास खरा आहे यास त्यांहून भक्कम पुरावा आहे. उदाहरणार्थ, थरमापिली येथें झेरक्सीस व लिआनिडस या उभयतांच्या सैन्यांत जें तुमुल युद्ध झालें, किंवा जूलीयस सीझर यानें गाल देशांत जो पराक्रम गाजविला या गोष्टींस जो कांहीं पुरावा आहे त्याहीपेक्षां खंबीर पुरावा ख्रीस्ताच्या चरित्रास आहे. ज्या प्रकारें तीन दिवे लावून त्या तिहींचा प्रकाश एका केंद्रांत आणिला असतां मोठा प्रकाश पडतो त्याप्रमाणें ख्रीस्ताचें चरित्र व ख्रिस्ती धर्माचा आरंभींचा इतिहास यांविषयीं **ग्रीक, रोमन,** व **यहूदी** भाषांतील तत्कालीन प्राचीन ग्रंथसमूहांत उल्लेख असल्यामुळें त्यांच्या सत्यतेविषयीं तिळमात्र संशय राहत नाहीं.

जुन्या तीन भाषांतील प्राचीन ग्रंथांचें प्रमाण.

एखाद्या महत्त्वाच्या प्राचीन ऐतिहासिक गोष्टीविषयीं त्या वेळच्या भाषांपैकीं जरी एकाच भाषेंतील ग्रंथांत उल्लेख असला, तरी ती गोष्ट खरी आहे असें मानिलें जातें. उदाहरणार्थ, झेनोफन याचे आधिपत्याखालीं दहा हजार ग्रीक लोकांनीं शत्रूला पाठ दाखवून पलायन केलें, ह्या महत्त्वाच्या गोष्टीविषयीं त्या वेळच्या एकाच भाषेंतील एकाच ग्रंथांत मात्र वर्णन

आहे; असें असतां जर ती गोष्ट खरी, चित्तवेधक, व महत्त्वाची आहे असें सर्वत्र मानिलें जात आहे, तर मग यावरून नव्या करारांतील इतिहासाची सत्यता मोठ्या विलक्षण प्रकारची आहे हें सिद्ध होतें. त्या इतिहासाच्या सत्यतेकरितां जे पुरावे मिळतात ते असाधारण प्रकारें स्पष्ट, पुष्कळ व बलवत्तर आहेत. एखाद्या पुरातन ग्रंथाविषयीं कदाचित् संशय घेतां येईल, परंतु नव्या कराराविषयीं संशय घेतांच येत नाहीं. याकरितां नव्या करारांतील इतिहासाचे सत्यतेविषयीं मनांत खातरी बाळगून प्रत्येक सत्यशोधकानें नव्या कराराचा अभ्यास करण्यास सुरवात करावी अशी खातरी बाळगून जेव्हां कोणी नवा करार लक्ष्यपूर्वक वाचण्यास आरंभ करितो, तेव्हां त्यांतील अपूर्व गोष्टी पाहून त्यास मोठें नवल वाटतें. ख्रीस्तानें रोग्यांस बरें केलें, अंधळ्यांस दृष्टि दिली, बहिऱ्यांस ऐकावयास लावलें, मेलेल्यांस जीवंत केलें इतकेंच नाहीं तर तो स्वतः मरून पुनः उठला व स्वर्गास जाता झाला, वगैरे अमानुष गोष्टी त्या ग्रंथांत लिहिल्या आहेत असें दिसून येतें. अशा गोष्टी आपल्या समक्ष कधींही झाल्या नाहींत, याकरितां नव्या करारांतील अद्भुत गोष्टी वाचून अचंबा वाटतो. आतां चमत्कार कशास ह्मणावें याविषयीं आपण पहिल्यानें विचार करूं.

नव्या करारांत पुष्कळ गोष्टी अपूर्व आहेत.

ह्या सृष्टींतील पदार्थांकडे आपण विचारपूर्वक अवलोकन करितों तेव्हां ईश्वराचें अस्तित्व व त्याची शक्ति, ज्ञान व दयालुत्व या सर्वांविषयीं आमची खातरी झाल्यावांचून राहत नाहीं; तसेंच सृष्टींतील कृत्यांत क्रम, नियम व सुमेळ आहे हेंही आमच्या लक्ष्यांत येतें. रात्र आणि दिवस, वर्षाचे ऋतु, सूर्यचंद्रांचें परिभ्रमण आणि इतर सहस्रावधि गोष्टी ह्या पाहिल्या असतां जणूं त्यांची मालिकाच गोंविली आहे व त्या नित्य आपला कार्यभाग यथाक्रम उरकीत आहेत असें दिसून येतें. एखादा उंच कडा तुटला ह्मणजे तो खालीं यावयाचाच, तसेंच नदी उंच प्रदेशांत उत्पन्न होऊन सखल प्रदेशांतून वहात जावयाचीच हें अगदीं ठाम ठरलेलें दिसतें. यावरून एखादें कार्य पाहिलें ह्मणजे त्याचें कारण आह्मांस सांगतां येतें, व यासच सृष्टिक्रम ह्मणतात. आणि हें सर्व देवानें आपल्या हातच्या कृत्यांमध्यें आपल्या इच्छेप्रमाणें जे नियम स्थापिले आहेत त्यांप्रमाणें घडतें.[1]

चमत्कार कशास ह्मणावें.

नवा करार पहातां ज्या गोष्टी त्यांत सांगितल्या आहेत त्या साधारण सृष्टिनियमाच्या विरुद्ध आहेत हें उघड आहे. उदाहरणार्थ, ख्रीस्तानें मेलेल्यांस जीवंत केलें असें त्यांत लिहिलें आहे, परंतु कोणी मेलेला मनुष्य जीवंत झाल्याचें आपण कधींही पाहिलें नाहीं, निदान आह्मांला ह्याविषयीं अनुभव नाहीं.

आतां चमत्कारांविषयीं मुख्य तीन गोष्टी या पत्रांत सांगावयाच्या आहेत. त्यापेक्षां

---

[1] सृष्टिनियम या शब्दांत नियम याचा अर्थ ईश्वरस्थापित क्रम असा घेतला पाहिजे हें सांगावयास नको.

अधिक जें सांगणें तें या ग्रंथाचे अखेरीस परिशिष्टांत दिलें आहे तें पहावें. आतां एथें मी हें जें लिहीत आहें तें, बहुतकरून, सर्व अद्भुत चमत्कारांस लागू पडणार आहे. परंतु आपला प्रस्तुत विषय **खीस्ताचे चमत्कार** हा आहे व त्यांत तें विशेषतः लागू पडेल.

अद्भुत गोष्टींची परीक्षा केली पाहिजे.

**१ कोणी अमुक अमुक अद्भुत गोष्टी घडल्या असें आह्मांस सांगितल्यास, त्यांवर आपण अविचारानें लागलाच विश्वास ठेवितां कामा नये, तर अद्भुत गोष्टी घडल्या यास भरपूर व खातरीलायक पुरावा मिळाल्यास त्यांवर विश्वास ठेवावा.**

मनुष्य कानाचा हलका फार.

पुष्कळ देशांत लोक फार भोळे असतात. कोणी अशिक्षित हिंदु मनुष्यास एखादी अद्भुत गोष्ट सांगितली असतां त्याचा लागलीच तीवर विश्वास बसतो, व अलीकडील लोकांच्या अनुभवास कधींही आल्या नाहींत अशा पुष्कळ अलौकिक गोष्टींचा भरणा हिंदु धर्मग्रंथांत आहे. हिंदु धर्माच्या ग्रंथांत देवांच्या ज्या कथा वर्णिल्या आहेत त्यांचा शतांश देखील खरा आहे असें सुशिक्षित हिंदु लोक मानीत नाहींत. त्याच प्रकारें ग्रीक व रोमन ग्रंथकारांनीं आपले ग्रंथांत पुष्कळ अद्भुत गोष्टींचें वर्णन केलें आहे, परंतु त्या गोष्टी खऱ्या आहेत असें आतां कोणीही मानीत नाहीं. लिवी नामक इतिहासकारानें पुष्कळ अद्भुत गोष्टी लिहून ठेविल्या आहेत. सर्व रोमन ग्रंथकारांत सुज्ञ असा जो टासिटस त्याच्या पदरीं देखील हा दोष घालतां येतो. त्यानें एके ठिकाणीं आपले ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं वेसपेशीयन बादशाहानें आलेक्षांद्रिया येथें एका अंधळ्यास व एका लंगड्यास अद्भुत रीतीनें बरें केलें. आतां या त्याच्या लिहिण्यावर त्याचा स्वतः विश्वास होता किंवा नाहीं हें जरी निश्चयात्मक सांगवत नाहीं, तथापि वेसपेशीयन बादशाहाचे कारकीर्दींत कित्येकांचा या गोष्टीवर भरंवसा होता हें खरें. हल्लीं जे टासिटसाचे ग्रंथ वाचतात ते त्या गोष्टीवर मुळींच विश्वास ठेवीत नाहींत. खरा प्रकार ह्मणाल तर ग्रीस व रोमचे ऐतिहासिक ग्रंथ वाचणारे त्यांतील अद्भुत गोष्टी गाळून टाकून बाकीच्या खऱ्या मानून वाचतात.

आतां असें करण्याचें कारण येवढेंच कीं ज्या अद्भुत गोष्टी त्या ग्रंथांमध्यें सांपडतात त्या खरोखर घडल्या याविषयीं कांहींच प्रमाण सांपडत नाहीं. जो कांहीं पुरावा त्या गोष्टींच्या सत्यतेविषयीं मिळतो त्याची न्यायाचे कोर्टांत जशी साक्षीदाराची उलट तपासणी करितात तशी तपासणी केल्यास तो अगदीं रद्द होतो. उदाहरणार्थ, महमदानें स्पष्टपणें लोकांस सांगितलें कीं माझ्याकडे चमत्कार करण्याचें काम नसून मी केवळ शिक्षक आहें. तथापि महमदानें पुष्कळ चमत्कार केले असें मुसलमान लोक मानितात. महमदावर नित्य ढगानें सावली करावी, स्वर्गांतून त्याला खाण्यासाठीं अन्न व फळफळावळ हीं मिळावीं, पशु, पर्वत, झाडें, दगड वगैरे यांनीं त्याला मुजरा करावा व त्याची त्यांनीं स्तुति गावी याप्रमाणें मुसलमान लोक महमदाविषयीं सांगतात.

आतां साहजिक असा प्रश्न निघतो कीं या ज्या गोष्टी महमदाविषयीं सांगितल्या आहेत त्या खरोखर घडल्या याविषयीं सबळ पुरावा आहे काय? शोधांतीं असें समजतें कीं महमदाविषयीं या व अशा प्रकारच्या ज्या अद्भुत गोष्टी वर्णिल्या आहेत त्या सर्वांची गणना दंतकथा या सदराखालीं केली आहे; आणि महमदाला मरून एक शतक पूर्ण होई तोंपर्यंत कोणींही दंतकथा लिहून ठेविल्या नव्हत्या, व ज्या लिहून ठेवलेल्या आढळतात त्याही अलीकडील चारशें वर्षांतील आहेत. परंपरागत चालत आलेल्या दंतकथांत किती व कसकसा फरक होत जातो याविषयीं अनुमान करतां, महमदाविषयीं असलेल्या दंतकथांचें स्वरूप त्याला मरून शंभर वर्षें होत तोंपर्यंत किती पालटलें असेल हें सांगावयास नको. शिवाय, महमदाविषयीं ज्या दंतकथा आहेत त्यांविषयीं मुसलमानांत किती मतभेद आहे तो पहा. कित्येक तर त्यांपैकीं केवळ शंभर कथा खऱ्या आहेत, कित्येक सात हजार दोनशें पंचाहत्तर, कित्येक पांच हजार दोनशें पांसष्ट, कित्येक चार हजार चौऱ्याशी, आणि कित्येक कोणतीही दंतकथा खरी नाहीं असें मानितात. या प्रकारचा अनिवार घोंटाळा असल्यामुळें त्या दंतकथांवर भरंवसा ठेवणारास भोळसर हें नांव शोभतें.

यावरून एखादी अद्भुत गोष्ट खरी आहे यास भक्कम पुरावा असल्यावांचून ती खरी आहे असें सहसा ह्मणूं नये, हें जें मीं वर सांगितलें त्याचें अगत्य तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल. आतां नव्या करारांत ज्या अद्भुत गोष्टी सांगितल्या आहेत त्यांची परीक्षा याच प्रकारें लोकांच्या हातून व्हावी असें आमचे मनांतून फार आहे. चांगला व भरपूर पुरावा मिळाल्यावांचून कोणतीही गोष्ट ग्रहण करूं नये. ख्रिस्ती धर्मशास्त्रांत असें ह्मटलें आहे, कीं "सर्वांची पारख करा, चांगलें तें धरा."

मागील पत्रांत नव्या करारांतील इतिहास खरा व भरंवशालायक आहे हें मीं साधारणतः सिद्ध केलें. या पत्रांत नव्या करारांतील अद्भुत गोष्टी खऱ्या आहेत हें विशेषतः सिद्ध करावयाचें आहे. नव्या करारांतील इतिहासाच्या सिद्धतेकरितां मीं चौथ्या पत्रांत जीं प्रमाणें दाखविलीं आहेत तीं नव्या करारांतील अद्भुत गोष्टींचे सिद्धतेसही लागू पडतात. याजकरितां त्यांची व्यर्थ द्विरुक्ति न व्हावी ह्मणून नव्या करारांतील अद्भुत गोष्टींविषयीं विचार करतांना चौथ्या पत्रांत नव्या करारांतील इतिहासाचे सिद्धतेकरितां दिलेले आधार व प्रमाणें हीं चांगलीं ध्यानीं आणावीं.

खीस्तानें चमत्कार केले याला भरपूर पुरावा आहे.

**२ नव्या करारांत खीस्तानें जे चमत्कार केले ह्मणून ह्मटलें आहे ते चमत्कार खीस्तानें खरोखर केले यास भरपूर व खातरीलायक प्रमाणें आहेत. हें पुढील विचारांवरून स्पष्ट होतें.**

ख्रीस्ताचे चमत्कार लौकिकांत झाले.

( १ ) मला ईश्वरानें पाठविलें आहे याविषयीं माझीं कामें साक्ष देतात, असें ख्रीस्तानें बोलून दाखविलें; व तीं माझीं कामें खरीं आहेत किंवा नाहींत याविषयीं तुह्मी आपली खातरी करून घ्या असें त्यानें मोठ्या निश्चयानें उघडपणें ह्मटलें.[1]

ते इंद्रियगोचर होते.

( २ ) ख्रीस्ताचे चमत्कार इंद्रियगोचर असल्यामुळें त्यांचा खरेखोटेपणा सहज समजण्यासारखा होता. शिवाय ख्रीस्तानें जे चमत्कार केले ते केवळ त्यानें आपल्या मित्रांसच दाखविले असें नाहीं तर त्यानें ते आपले शत्रु व मित्र यांच्या मोठ्या समुदायापुढें केले.

त्यांच्या खरेपणामुळें त्याच्या शिष्यांनीं आपले प्राण दिले.

( ३ ) ख्रीस्तानें खरोखर चमत्कार केले असा त्याच्या शिष्यांचा पूर्ण विश्वास होता, व जेव्हां ख्रीस्ताच्या शत्रूंनीं त्याचें पुनरुत्थान इत्यादि चमत्कार नाकबूल केले, तेव्हां त्यांच्या सत्यार्थ त्यांनीं आपले प्राण दिले.

पुष्कळ यहूदी आणि विदेशी लोकांनीं देखील तसेंच केलें.

( ४ ) पुष्कळ यहूदी आणि विदेशी लोकांची ख्रीस्ताचे चमत्कार खरे आहेत अशाविषयीं खातरी झाली होती, व त्यांच्या सत्यतेच्या प्रतिपादनार्थ प्राणांतिक प्रसंग आला असतांही त्यांनीं मागें घेतलें नाहीं.

( ५ ) ख्रीस्ताचे शत्रूंनीं देखील त्याच्या चमत्कारांची सत्यता कबूल केली.

नव्या करारांतील इतिहास खरा आहे अशाबद्दल शत्रूंची देखील साक्ष आहे, हें जें मीं मागल्या पत्रांत सांगितलें तें ख्रीस्ताच्या चमत्कारांस लागू पडतें, व तत्संबंधानें शत्रूंची साक्ष जर अनुकूल अशी पडली तर ती फारच महत्त्वाची आहे असें तुह्मी सहज कबूल कराल. ख्रीस्त जगांत असतां यहूदी लोकांनीं या प्रकारें कबूल केलें:—"हा मनुष्य बहुत चमत्कार करितो." (योहान्न. ११: ४७). ख्रीस्त मरून उठल्यावर त्यानें जे चमत्कार केले होते ते सर्वांस मशहूर असल्यामुळें ते कोणाच्यानें नाकबूल करवणार नाहींत असें त्याच्या शिष्यांनीं स्पष्टपणें बोलून दाखविलें (प्रे० कृ० २: २२). या प्रकारें ख्रीस्ताचे शिष्यांनीं जी प्रसिद्धपणें लेखी किंवा तोंडी साक्ष दिली ती खोटी आहे असें आजपर्यंत कोणींही ह्मटलें नाहीं.

ख्रीस्ताच्या शत्रूंनीं त्याच्या चमत्कारांच्या सत्यतेबद्दल साक्ष दिली ती.

अर्वाचीन काळांतील यहूदी लोकांच्या धर्ममतांचा **तालमूद** नामक ग्रंथांत संग्रह केला आहे. त्या पुस्तकांत ख्रीस्तानें पुष्कळ अद्भुत कृत्यें केलीं, परंतु तीं जादूच्या योगें केलीं असें लिहिलें आहे. ख्रीस्तामध्यें कुष्ट रोगादि बरे करण्याची व मेलेल्यांस पुन्हा

[1] योहान. ५:३६; १०:२५, ३७.

उठविण्याची देखील शक्ति होती असें ख्रीस्ताचे अत्यंत विरोधी असे जे यहुदी ग्रंथकार त्यांनीं देखील कबूल केलें आहे.[१]

ख्रीस्तानें जीं अद्भुत कृत्यें केलीं त्यांविषयीं **सेलसस** व त्या सारखे इतर ख्रिस्ती धर्मद्वेष्टे यांस मोठा विचार पडला. सेलसस यानें तीं सर्व कृत्यें खोटीं असें मोठ्या आनंदानें ह्मटलें असतें, परंतु त्याचें देखील यहूदी ग्रंथकारांसारखें तीं जादूनें केलीं असें मत पडतें; किंवा जादुगिरांच्या हातचलाखीच्या युक्ति असतात, तशा ख्रीस्तापाशीं असाव्यात असें त्याचें स्पष्टीकरण आहे. यांत एवढें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे कीं कांहीं अमानुष कृत्यें झालीं हें त्यांस कबूल करावें लागलें.

**जूलीअन** नामक एक बादशाहा होऊन गेला, त्यानें ख्रीस्ताचे चमत्कार खरोखर घडले हें कबूल केलें आहे. परंतु ख्रीस्ताचे चमत्कार मान्य केल्यावरून तो ईश्वरी पुरुष होता हें कबूल करावें लागेल, यामुळें त्यानें शेवटीं असें ह्मटलें आहे, कीं "लंगड्यांस व अंधळ्यांस बरें करणें किंवा भूतें काढणें यांत मोठेंसें नवल नाहीं."

सेलसस व जूलीअन व यहूदी लोक यांची ही जी साक्ष ती आम्ही आदरानें स्वीकारतों. ह्या साक्षीवरून जो निर्णय ठरवायाचा त्याचा विचार आपण पुढें करूं.[२]

(६) ख्रीस्ताचे चमत्कारांतून जे विशेष महत्त्वाचे होते त्यांचें स्मरण लोकांमध्यें राहवें याकरितां त्या काळांत कांहीं विधि व संस्कार स्थापन केले, व ते तसेच आजपर्यंत अखंड चालू आहेत. उदाहरणार्थ, आठवड्याचा पहिला दिवस पवित्र मानून त्या दिवशीं ईश्वरभजनाकरितां ख्रिस्ती लोक एकत्र मिळतात, याचें कारण ख्रीस्त त्या दिवशीं मेलेल्यांतून उठला. तसेंच बाप्तिस्मा व प्रभुभोजन ह्मणून जे दोन संस्कार ख्रिस्ती मंडळींत पाळतात त्यांचा संबंध ख्रीस्ताचें मरण व पुनरुत्थान यांशीं आहे. ख्रीस्ताच्या मरणाचें स्मरण नेहमीं रहावें याकरितां प्रभुभोजन हा संस्कार मूलारंभीं ख्रीस्तानें स्थापन केला. आतां यावरून अगदीं उघड आहे, कीं जर हा संस्कार अलीकडे स्थापन झालेला असता तर तो अगदीं नवा आहे असें सर्व लोक म्हणते, व ही त्याची नूतनता त्याच्या सत्यतेस मोठी बाधक झाली असती. इतर विधींस व संस्कारांस देखील हीच गोष्ट लागू आहे.

ख्रीस्ताचे चमत्कारांचें स्मरण रहावें एतदर्थ लक्ष्यांत ठेवण्याजोगे संस्कार स्थापन केले.

---

[१] अशा प्रकारच्या एका ग्रंथाचें नांव "Toledoth Jesu" ह्मणून आहे.

[२] कदाचित् कोणी असें ह्मणेल कीं या साक्षींत फारसा अर्थ नाहीं, कारण त्या काळांतील लोक फार धर्मभोळे असत. परंतु ज्यांनीं ही साक्ष दिली आहे त्यांचीं मनें ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध असल्यामुळें हें ह्मणणें त्यांस लागू पडत नाहीं. ज्यांनीं ख्रीस्ताचे चमत्कार पाहिले, त्यांस तेणेंकरून फारच आश्चर्य वाटलें; व त्यांनीं "जगाच्या आरंभापासून असें कधीं पाहण्यांत आलें नाहीं," व "देव त्यास साह्य असल्यावांचून त्याच्यानें असले चमत्कार कधीं करवणार नाहींत" असें ह्मटलें. योहान. ९: ३२; ३:२.

वर जीं प्रमाणें दिलीं आहेत त्यांतील कोणतेंही एक प्रमाण घेतलें असतां, त्यावरून ख्रीस्ताचे चमत्कार खरे आहेत असें मान्य करितां येतें तर मग सर्व प्रमाणें एकत्र करून पाहिलें असतां तुमचे मनांत शंका राहण्यास तिळमात्र जागा राहणार नाहीं हें उघड आहे. आपण आतां वर सांगितलेल्या प्रमाणांपैकीं तिसरें प्रमाण घेऊं व त्याचा क्षणभर विचार करूं. अशी कल्पना करा, कीं या गांवांत सचोटीचीं व भलीं व माझ्या जुन्या ओळखीचीं अशीं बारा मनुष्यें आहेत. तीं एके दिवशीं येऊन मला त्यांच्या डोळ्यां-देखत झालेल्या एका चमत्काराची सविस्तर हकीकत सांगतात. पुढें ही हकीकत गव्हर्नर साहेबांचे कानावर जाते, व तो ह्या बारा मनुष्यांस बोलावून त्यांस सांगतो कीं हा चमत्कार झाला नाहीं असें ह्मणा, नाहीं तर मी तुह्मांस फांशीं देतों. त्या वेळीं जर तीं बारा मनुष्यें, "आह्मी जें सांगतों तें अक्षरशः खरें आहे" असें म्हणतात, व जर त्यांस पृथक् पृथक् बोलावून ही धमकी दिली असतांही तीं बधत नाहींत, आणि धमकी दिल्याप्रमाणें शिक्षा अमलांत येऊन माझ्यासमक्ष तीं मनुष्यें शिक्षेची यातना खुशीनें भोगण्यास सिद्ध होतात, तर अशा मनुष्यांच्या बोलण्यावर कोणाचा बरें विश्वास बसणार नाहीं? सर्वांचा बसलाच पाहिजे."[१]

खालीं टिपेंत सांगितलेल्या ग्रंथकर्त्यानें आणखी असेंही आपले ग्रंथांत लिहिलें आहे, कीं कोणी मनुष्यानें आपण अशा गोष्टी स्वतां पाहिल्या असें ह्मणत असतां त्यांचा खरेपणा पटविण्याकरितां प्राण दिला असें इतिहासांत दुसरें उदाहरण कोठें आढळत नाहीं.

जीं प्रमाणें वर दिलीं आहेत त्यांवरून ख्रीस्तानें अद्भुत कृत्यें केलीं हें निर्विवाद सिद्ध होतें. आतां ह्याच संबंधानें आणखीही एक दोन विचार आहेत. त्यांचें मी दिग्दर्शन करितों.

(७.) ख्रीस्ताचे चमत्कार साधे व त्यांची प्रौढी.

प्राचीन किंवा अर्वाचीन अन्यधर्मी लोकांच्या धर्मग्रंथांत ज्या अद्भुत गोष्टी वर्णिल्या आहेत त्यांहून ख्रीस्तानें जीं अद्भुत कृत्यें केलीं त्यांचें स्वरूप अगदीं निराळें आहे.

अन्यधर्मी लोकांचे चमत्कार.

जीं अद्भुत कृत्यें हिंदु लोक खरीं मानतात त्यांचें स्वरूप कसें आहे हें तुह्मांस दाखविलें असतां माझें हें बोलणें तुमचे लक्ष्यांत चांगलें येणार आहे. अगस्ती नामक ऋषीनें समुद्रप्राशन केलें, व समुद्राचें पाणी लघ्वीच्या रूपानें सोडलें यामुळें समुद्र खारट झाला. शिवानें आपले पुत्राचें शीर उडविलें व त्याचे ऐवजीं हत्तीचें शीर आणून बसविलें. कृष्णानें वादळामध्यें आपले मित्रांचें रक्षण व्हावें यासाठीं गोवर्धन पर्वत बोटाचे अग्रावर उचलून धरला. अशा चमत्कारिक गोष्टी हिंदु पुराणांत सांपडतात. ग्रीक व रोमन लोकांनीं ज्या कांहीं

---

[१] Paley's Evidences नामक ग्रंथाचा उपोद्घात पहावा.

अद्भुत गोष्टी लिहून ठेविल्या त्या अशाच प्रकारच्या आहेत. महमदानें जे चमत्कार केले ह्मणून मुसलमान लोक सांगतात ते देखील याच प्रतीचे आहेत. उदाहरणार्थ, महमदानें चंद्राचे दोन तुकडे करून, त्याचें एकएक अर्ध आपल्या अंगरख्याचे प्रत्येक अस्तनींतून वर पाठविलें.

या गोष्टी कानीं पडतांच त्या अचाट, कल्पित व भ्रांतिजनक आहेत असें तेव्हांच दिसून येतें. असे अद्भुत चमत्कार करण्यांत जो कांहीं शक्तीचा व्यय झाला तो व्यर्थ झाला असें वाटणें साहजिक आहे. या गोष्टी ऐकून मनुष्य दंग होतो हें खरें. तथापि स्वप्नांत एखादे वेळेस आपण विलक्षण गोष्टी पहातों त्या प्रकारच्या ह्या आहेत यांत संशय नाहीं. शक्तीचे जणूं हे वेडेवांकडे तरंग आहेत असें भासतें. ह्या चमत्कारांविषयीं विचार करूं लागलें असतां ज्या हेतूनें ते केले ते हेतु इतर साध्या व अधिक चांगल्या उद्देशानें सिद्धीस नेतां आले असते असें वाटूं लागतें.

हिंदु दैवतांनीं हे जे चमत्कार केले ते करण्याचा हेतु काय असें विचारिलें असतां ही देवांची लीला आहे असें उत्तर मिळतें. उदाहरणार्थ, एखादें व्रात्य पोर माकडचेष्टा करतें त्याप्रमाणें कृष्णानें चेष्टा करून आपलें मनोरंजन केलें.

ख्रीस्ताचे चमत्कार यांहून किती निराळे आहेत ते पहा. त्यांमध्यें अचाटपणा किंवा छांदिष्टपणा मुळींच दिसत नाहीं. ख्रीस्तानें चमत्कार करतेवेळेस प्रचंड शक्ति प्रगट केली खरी, परंतु त्या शक्तींत केवढें गांभीर्य, साधेपणा व प्रौढी दिसून येते ! हे चमत्कार जरी अमानुष होते तरी ते **सृष्टिविरुद्ध** नव्हते. त्यानें दुखणाइतांस बरें केलें, अंधळ्यांस दृष्टि दिली, बहिऱ्यांस ऐकावयास लाविलें, लंगड्यांस चालावयास लाविलें, जे संकटांत होते त्यांच्या हालअपेष्टा निवारण केल्या व मेलेल्यांस उठविलें.

ख्रीस्ताचें देवपण व त्याचें अधिकारप्रयुक्त लोकांस उपदेश करणें हीं खरीं आहेत यास हे त्याचे चमत्कार प्रमाणभूत होत. कारण त्यांत ईश्वरी शक्ति व वात्सल्य हीं ढळढळीत दृष्टीस पडतात. मला ईश्वरानें पाठविलें आहे ह्या गोष्टीस माझीं कामें साक्ष देतात असें त्यास प्रसिद्धपणें ह्मणतां आलें. त्यानें एक वेळ असें ह्मटलें कीं "जर मी आपल्या बापाचीं कामें करीत नाहीं तर मजवर विश्वास ठेवूं नका."[१] (योहान. ५:३६; १०:२५, ३७, ३८.)

आतां या वरील विचारांवरून ख्रीस्तानें जी कामगिरी बजाविली ती ईश्वरानें योजिलेली होती हें कसें सिद्ध होतें तें आपण आतां पाहूं.

---

[१] ख्रीस्ताचे सर्वच चमत्कार प्रमाणरूप होते असें आमचें ह्मणणें नाहीं. उदाहरणार्थ, त्याचा चमत्कारिक रीतीनें झालेला जन्म व रानांत सैतानाकडून झालेली त्याची परीक्षा प्रमाणरूप होती असें नाहीं.

## ज्याअर्थी ख्रीस्तानें केलेले चमत्कार खरोखर घडून आले त्याअर्थी ईश्वरानें त्याला पाठविलें होतें हें सिद्ध होतें.

ख्रीस्ताचें काम ईश्वराच्या योजनेप्रमाणें होतें असें त्याच्या चमत्कारांवरून ठरतें.

ख्रीस्ताचे चमत्कार अमानुष होते यांत कांहीं संशय नाहीं. कारण कोणाही मनुष्यास मरून चार दिवस झाल्यानंतर त्यास जीवंत करणें, किंवा आपण मरून कांहीं दिवसांनीं पुनः जीवंत होणें, ह्या गोष्टी केवळ मानवी शक्तीच्या बाहेर आहेत. अशा गोष्टी केवळ ईश्वराच्याच शक्तीनें झाल्या यांत संशय नाहीं. ज्याप्रकारें एका यहूदी अधिकाऱ्यानें ख्रीस्ताविषयीं ह्मटलें आहे त्याच प्रकारें आह्मांस देखील ह्मणावें लागतें:—"हे जे चमत्कार तूं करितोस ते देव तुजबरोबर असल्यावांचून तुझ्याच्यानें करवणार नाहींत." (योहान. ३:२)

यहुदी लोकांचा आक्षेप.

ख्रीस्ताचे चमत्कारांवर यहूदी लोकांनीं जो आक्षेप घेतला त्याविषयीं थोडासा विचार करणें योग्य आहे. पुष्कळ यहूदी लोकांनीं ख्रीस्ताचे चमत्कार पाहिले व कबूल केले, तथापि ख्रीस्ताला ईश्वरानें पाठविलें ह्या गोष्टीस त्यानें केलेले चमत्कार पुराव्यादाखल आहेत हें ते कबूल करीनात. "भूतांच्या साह्यानें हा चमत्कार करितो" याप्रकारें अविश्वासी यहूदी लोकांनीं ह्मटलें.[१] ते चमत्कार अमानुष आहेत अशी त्यांची खात्री झाली खरी, तथापि तो ईश्वराच्या सामर्थ्यानें ह्या गोष्टी करितो असें त्यांस कबूल करावयाचें नव्हतें ह्मणूनच त्यांनीं हा या गोष्टी सैतानाच्या साह्यानें करितो असें ह्मटलें. ख्रीस्तानें यहूदी लोकांस सांगितलें, कीं माझीं कामें तर सैतानाच्या राज्याचा नाश करण्यासाठीं आहेत, व तीं पवित्र व परोपकारार्थ असल्यामुळें अपवित्र असा जो दुरात्मा त्याच्या साह्यानें होणें अगदीं अशक्य आहे. ख्रीस्ताचें सर्व बोलणें व कामें हीं ईश्वराच्या गौरवार्थ व मनुष्यमात्राच्या कल्याणार्थ होतीं. सत्य जो परमेश्वर त्याला उचित, परंतु लबाडीचा बाप जो सैतान त्याच्या विरुद्ध अशीं तीं होतीं.

दुष्ट दूतांची शक्ति व ज्ञान हीं किती आहेत हें आमच्यानें सांगवत नाहीं. मनुष्यापेक्षां त्यांची शक्ति व ज्ञान मोठें असेल व त्यांच्या योगानें ते आमच्याकडून होणार नाहीं असें एखादें अमानुष कृत्यही करूं शकतील. यावरून जेव्हां एखादें अमानुष कृत्य आपण पहातों तेव्हां तें ईश्वराचेंच कर्तृत्व आहे असें आमच्यानें सर्वदां खातरीपूर्वक सांगवणार नाहीं. तें अमानुष असल्यामुळें दुष्ट आत्म्यांकडून झालें असेल व कदाचित् त्यांत ईश्वराचा हात मुळींच नसेल, असें संभवतें. तर एखादें अमानुष कृत्य पाहिलें असतां, तें दिव्य दूतांनीं केलें किंवा दुष्ट दूतांनीं केलें हें आह्मांस कसें समजावें? या प्रश्नाचें उत्तर देण्यास प्रयास नकोत. जेव्हां एखादें अमानुष कृत्य आपण पहातों व त्यांत सदाचरणाचें बीज आप-

---

[१] "भूतांच्या अधिकाऱ्याच्या योगानें हा भूतें काढितो," असें परोशी म्हणाले. मात्थी. ९:३४.

णांस दिसतें व तें ईश्वरास योग्य आहे असें आपल्या विचारानें ठरतें तेव्हां तें ईश्वरानेंच स्वतः केलें किंवा त्यानें आपल्या दूताकडून करविलें असें आपणांस कबूल करावें लागतें. जर तें सत्कृत्य दूताकडून घडलें असेल तर तो दिव्यदूतच असला पाहिजे. दुष्ट दूतांकडून सदाचाराचें असें कृत्य होणें अगदीं अशक्य.

खीस्ताचे चमत्कार हा मोठा महत्त्वाचा विषय आहे व त्यासंबंधानें जी कांहीं दुर्ज्ञेयता असेल ती दूर होऊन तो तुमच्या लक्ष्यांत चांगलेपणीं यावा असें मी फार इच्छितों, ह्मणून अविश्वासी यहूदी लोकांचा हा जो आक्षेप वर दर्शविला त्याविषयीं आणखी थोडेंसें लिहून तुमची खातरी करून देणें मला बरें वाटतें. ज्यांला भूतसंचार झाला आहे, किंवा ज्यांस पिशाचादि सहाय आहेत अशा लोकांकडून अपूर्व गोष्टी होतात असा या देशांतील पुष्कळांचा समज आहे. जे भूतांशीं सहवास ठेवितात अथवा ज्यांस भूतसंचार होतो असें मानितात अशीं मनुष्यें मीं पाहिलीं आहेत, व त्यांचें कामही पाहिलें आहे, त्यावरून त्यांमध्यें कांहीं अमानुष ह्मणून नाहीं अशी माझ्या मनाची खातरी झाली. तथापि या २० व्या शतकांत या देशांत कोणाला भूतसंचार होत नाहीं व मागें कधीं कोणास झाला नाहीं व पुढें होणार नाहीं असें म्हणणें फारच अविचाराचें आहे. जीं कांहीं भूतसंचाराचीं उदाहरणें असतील, मग तीं खरीं असोत किंवा खोटीं असोत, तीं सर्व घेऊन त्यांची उत्तम रीतीनें परीक्षा करा, ह्मणजे काळोख व उजेड यांमध्यें जें अंतर तेंच अनुक्रमें त्यांमध्यें व खीस्ताचे चमत्कार यांमध्यें तुह्मांस सहज दिसून येईल. भूतसंचाराकडून जीं कामें झालीं ह्मणून सांगतात तीं अगदीं अयुक्तिक व हास्यास्पद दिसतात. कित्येक तर दुष्ट बुद्धीचीं असतात. त्यांकडून कित्येक वेळां भीति उत्पन्न होते, किंवा मनास चिळस येते. आणि तीं सर्वदा त्रासदायक व ओंगळ वाटतात. खीस्ताचीं कामें किती उत्कृष्ट व कृपायुक्त आहेत! त्यांचा अशा प्रकारचा पवित्र व दिव्य प्रकाश पडतो कीं, ज्यांचीं मनें विपरीत बुद्धीनें अंधकाराशीं जडलेलीं नाहींत त्यांची खातरी होऊन तीं त्याकडे आकर्षिलीं जातात.

आतां या पत्रांत जे विचार मीं प्रगट केले त्यांचा थोडक्यांत गोषवारा देऊन हें पत्र संपवितों. खीस्तामध्यें अमानुष शक्ति वसत होती हें त्याचे कृत्यांवरून अगदीं स्पष्ट होतें; तसेंच, तो मोठा परोपकारी व पवित्र पुरुष होता हें सिद्ध होतें. असा पुरुष ईश्वराकडून आला नाहीं असें म्हणणें हें अगदीं अयुक्तिक. सैतानाच्या सहायानें खीस्तानें चमत्कार केले हा जो यहूदी लोकांचा आक्षेप तो केवळ अविचाराचा आहे; कारण सैतानाला अशीं कामें करितां येतात असें मानिलें तर सैतानही मोठा परोपकारी व पवित्र आहे, ह्मणजे सैतान हा सैतान नव्हे असें ह्मटलें पाहिजे.[१]

**आपला मित्र—.**

---

[१] परिशिष्ट २ पहा.

# पत्र सहावें.

## बायबलांतील भविष्यें.

भविष्यप्रमाण—भविष्य कशास ह्मणावें—ख्रिस्ती धर्मानुसंधानांत भविष्यवादाचें स्थान—भविष्यकथनाचा पहिला उपयोग—दुसरा उपयोग—नव्या करारांतील भविष्यें—ख्रिस्तानें सांगितलेलीं भविष्यें—जुन्या करारांतील भविष्यें.

**प्रिय मित्र—**

ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेस जीं प्रमाणें आहेत त्यांमध्यें बायबलांतील भविष्यें हें प्रमाण अत्यंत महत्त्वाचें आहे. तर प्रथमारंभींच, **भविष्य** ह्या विषयाला बायबलांत जी जागा दिली आहे ती नीट लक्ष्यांत आणणें फार अगत्याचें आहे.

पुरातन काळीं इस्राएल लोकांत कित्येक श्रेष्ठ धर्मगुरु होऊन गेले, त्यांस **भविष्यवादी** अशी संज्ञा दिली आहे. त्यांचें काम म्हटलें म्हणजे ईश्वरेच्छा प्रगट करण्याचें असे, त्यांस भविष्यवादी ह्मटलें आहे यावरून ते नेहमीं भविष्यकथन करीत असत असें समजतां कामा नये. त्यांच्या हातचे जे ग्रंथ आहेत त्यांत भविष्यें ओतप्रोत भरलीं आहेत असें मुळींच नसून, ते ज्या काळांत होऊन गेले त्या काळासंबंधी गोष्टींविषयीं लोकांस उपदेश करीत असून त्यांस प्रसंगोपात्त भविष्यकथनही करीत असत, असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसून येतें. त्यांनीं प्रसंगानुसार लोकांस शिकवावें, त्यांस ताकीद द्यावी, त्यांच्या सत्कृत्यां-बद्दल शाबासकी द्यावी, त्यांस अभिवचन द्यावें, आणि दंडाचा धाकही घालावा. या भविष्यवाद्यांचें काम अशा प्रकारचें असे कीं त्यांस भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही काळांतील गोष्टींविषयीं लोकांस सांगण्याचें अगत्य पडे. परंतु त्यांच्या ग्रंथांतील ज्या केवळ भविष्यगोष्टी त्यांविषयीं मात्र या पत्रांत विचार करण्याचा माझा बेत आहे.

जुना व नवा करार यांजमध्यें पुढें होणाऱ्या गोष्टी त्या घडण्याच्या बहुत वर्षें अगोदर लिहून ठेविल्या आहेत. अशा गोष्टींची संख्या फार मोठी असून त्या निश्चयात्मक व निय-मित काळीं अनुभवास आल्यामुळें बायबलाच्या सत्यतेविषयीं त्यांवरून जें प्रमाण मिळतें तें फारच खातरीलायक आहे; ह्मणजे बायबलांत जीं भविष्यें आहेत तीं जर प्रत्यक्ष घडून आलीं आहेत तर बायबल ईश्वरदत्त शास्त्र आहे असें निश्चयात्मक ठरतें. जर तीं घडून आलीं नसतीं तर अर्थात् तें खोटें ह्मणून एकीकडे सारून द्यावें लागतें.

भविष्य कशास ह्मणावें.

भविष्य ह्मणजे एखादी पुढें होणारी गोष्ट अगोदर सांगणें; ती अशी कीं ती घडेल असें मनुष्याला तर्कानें किंवा अकलेनें सांगतां येत नाहीं. मनुष्यास पुढील काळीं काय होणार हें जाणण्याची शक्ति मुळींच नाहीं. फार-फार आलें तर वर्तमानकाळीं ज्या गोष्टी घडतात व भूतकाळीं ज्या घडल्या त्यांवरून त्यास अनुमान बांधतां येतें; ह्याच्या पलीकडे

त्याच्यानें जाववत नाहीं. याकरितांच या जगांत जे चतुर पुरुष होऊन गेले ते पुढें कित्येक वर्षांनीं एखादी गोष्ट होणार याविषयीं अनुमान बांधण्याचें जोखीम देखील घेण्यास सरसावले नाहींत. असें जरी आहे, तथापि बायबलांत ठळक, निश्चित व सूक्ष्म अशीं शेंकडों भविष्यें, ज्या गोष्टी पुढें पुष्कळ कालांतरानें होणार, त्यांविषयीं दिलेलीं आहेत.

भविष्यकथन हा एक अद्भुत चमत्काराचाच प्रकार आहे, असें जें एकानें ह्मटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. ज्याला आपण साधारणतः अद्भुत चमत्कार ह्मणतों, त्यांत **शक्तीचा** प्रादुर्भाव असतो. भविष्यामध्यें केवळ **ज्ञानाचा** प्रादुर्भाव असतो. ह्या दोहोंमध्यें मोठा फरक आहे. शक्तीचे चमत्कार दृष्टीस पडतांच लागलीच मनाची खातरी होते; परंतु ज्ञानाचे चमत्कार ऐकण्याबरोबर तशी खातरी होत नाहीं. तथापि कथन केलेलें भविष्य प्रचीतीस आल्यावर मनाची खातरी होते.

बायबलांतील भविष्यें आशाविशिष्ट आहेत.

बायबलांतील भविष्यें खरोखरींच फार चमत्कारिक आहेत. जरी भविष्यवाद्यांनीं पापी लोकांस देव खचीत शासन करील असें आपल्या ग्रंथांत स्पष्ट सांगितलें आहे, तथापि बहुत कालानें पुढें घडून येणाऱ्या एके गोष्टीविषयीं त्यांचीं मनें उल्हासानें परिपूरित झालीं होतीं, असें दिसून येतें. कालांतरानें देवाचा कृपायुक्त संकल्प पूर्ण होणार आहे असें त्यांनीं स्पष्ट कळविलें आहे. "शेवटल्या काळांत" आणि "प्रभूच्या दिवशीं" सर्वत्र मोठा ज्ञानमय प्रकाश व आनंद पसरेल, अशा प्रकारें अनेक वेळां त्यांनीं कथन केलें आहे. आतां भविष्यवाद्यांची ही आशा खरोखर विलक्षण आहे, कारण तें राष्ट्र अतिशय मोडकळीस येऊन अगदीं नाश होण्याच्या संधीस त्यांनीं ती प्रगट केली, यावरून मोठें नवल वाटल्यावांचून राहत नाहीं. ज्या काळीं मिसर देशाचें राज्य व बाबेलोन व आसिरिआ आदिकरून राज्यें ऐन भरांत असून आपले ताब्यांत असलेल्या लोकांस मूर्तिपूजेच्या योगानें भ्रष्ट करीत होतीं, व राष्ट्रांचें स्वातंत्र्य पायांखालीं तुडवीत होतीं, व ज्या वेळेस ईश्वराविषयीं मनुष्यें आपलीं कर्तव्यें विसरून जाऊन केवळ धर्मलंड बनलीं होतीं अशा वेळीं इस्राएल लोकांतील भविष्यवाद्यांनीं पुढें सर्व गोष्टी यथास्थित होतील याविषयींचा जो त्यांचा विश्वास, तो त्यांनीं शांतपणानें व मोठ्या धैर्यानें सर्वांस प्रगट केला. त्यांनीं शांतपणें ह्मटलें:—"परमेश्वर राज्य करितो, पृथ्वी उल्हासो," "पृथ्वीच्या सर्व सीमा स्मरून परमेश्वराकडे फिरतील," "दीन पृथ्वीचें वतन पावतील, ते बहुत कल्याणांत आनंदतील." ही अशमनीय आशा आली कोठून? ती ईश्वरानेंच त्यांच्या मनांमध्यें उत्पन्न केली असें ह्मणावें लागतें. ही आशा इस्राएल लोकांच्या धर्मग्रंथांत असल्यामुळें त्या धर्मग्रंथांची कोणत्याही राष्ट्रांच्या धर्मग्रंथांच्यानें खचीतच बरोबरी करवणार नाहीं. ज्यास बायबलांत **"आशेचा देव"** असें उत्तम नामाभिधान आहे, त्याच ईश्वरापासून ही भावना इस्राएल लोकांत उद्भवली असें ह्मटलें पाहिजे.

एकानें असें ह्मटलें आहे, कीं यहूदी लोकांचा संपूर्ण इतिहास ख्रिस्ती धर्माच्या भावी उदयाचें भविष्यच आहे. द्राक्षाच्या वेलीस अंकुर फुटून तीस आलेलीं फुलें, ज्या प्रमाणें द्राक्षें येण्याचीं सूचक आहेत, त्याप्रमाणें यहूदी धर्मरूप पुष्प ख्रिस्ती धर्मरूप मधुर फलाच्या उदयाचें सूचक आहे. तसेंच यहूदी धर्मांतील पुष्कळ विधि व संस्कार हे भविष्यात्मक किंवा ज्याला लाक्षणिक ह्मणतात असे होते, त्यांकडून पुढें येणारा जो ख्रिस्ती धर्म त्याच्या रूपरेखा दर्शविल्या गेल्या; त्यास बायबलांत "ज्या चांगल्या गोष्टी होणार त्यांची छाया" असें ह्मटलें आहे. (इब्री. १०:१) जुन्या करारांत सर्वत्र कोणा एका परमोत्तमाविषयीं लिहिलेलें आढळतें, व तें वर्णन केवळ खीस्तासच लागू आहे असें दिसून येतें. खीस्तानें देखील आपलें प्रगट होण्याचें कारण पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—"मी नेमशास्त्र किंवा भविष्यशास्त्र रद्द करायास आलों असें नाहीं, तर पूर्ण करायास आलों आहें." मात्थी ५:१७. आणि वस्तुतः खीस्तानेंच त्यांची परिपूर्णता केली.

यहूदी धर्म हा ख्रिस्ती धर्माचा मूळ पाया असून त्या धर्माची इमारत पुढें उत्तम उभारली जाणार अशा विषयींचा सूचक होता.

या खेरीज जुन्या करारांत कित्येक व्यक्तींविषयीं व राष्ट्रांविषयीं भविष्यें आहेत, व मुख्यतः काळाची पूर्णता झाल्यावर जो महातारक येणार होता त्याविषयीं भविष्यें आहेत.

भविष्यकथनाचा हा भवितव्य भाग फार महत्त्वाचा आहे व बायबलांत त्याला मोठें वर्चस्व दिलें आहे. ज्या स्थळीं खऱ्या देवाची खोट्या देवांशीं तुलना करून भेद दर्शविला आहे त्यांत खऱ्या देवास भविष्य सांगण्याची शक्ति आहे असें वर्णन केलें आहे:—"मी (परमेश्वर) प्रारंभापासून शेवट व पुरातन कालापासून अजूनपर्यंत जीं वर्तमानें झालीं नाहींत तीं दाखवितों." (यशा० ४६: १०.) विधर्मी लोकांच्या खोट्या दैवतांच्या ठायीं ही शक्ति वसत नाहीं असें बायबलांत मोठ्या निश्चयानें लिहिलेलें आढळतें. जसें:—"जें जें पुढें यायाचें आहे तें दाखवा ह्मणजे तुह्मी देव आहां असें आम्ही जाणूं." (यशाया ४१ : २३.)

जुन्या व नव्या करारांत जें धर्मानुसंधान आहे तें थोडक्यांत सांगतों. मनुष्यप्राणी पतित आहे व त्याचा उद्धार व्हावा एतदर्थ देव येशू खीस्तामध्यें मनुष्यरूपें या भूतलावर प्रगट झाला. येशू खीस्ताच्या निष्पाप जीवनाकडून व प्रायश्चित्तरूप मरणाकडून क्षमेचा व सुखाचा मार्ग मोकळा झाला आहे. मनुष्य पतित झाल्यानंतर चार हजार वर्षांनीं देव मानवदेह धारण करून जगामध्यें प्रगट झाला. तो **काळाचे पूर्णतेस** प्रगट झाला, ह्मणजे मनुष्याचे तारणाविषयींचे देवाचे जे श्रेष्ठ हेतु, ते सिद्धीस नेण्यास जो योग्य काल, त्या समयास प्रगट झाला, असें समजावें. याकरितां जे लोक खीस्ताचे आगमनाचे पूर्वीं होऊन गेले, त्यांस ईश्वराच्या गुणांचें ज्ञान व्हावें, व

ख्रिस्तीधर्मानुसंधानांत भविष्यवादाचें स्थान.

भविष्यकथनाचा पहिला उपयोग.

त्यांस ज्या "पूर्ण सांत्वनाची" गरज होती, तें त्यांस मिळावें, व जो परमसमर्थ तारणारा प्रगट होणार होता त्यावर त्यांचा विश्वास बसावा, यासाठीं भविष्यकथनाचें अगत्य होतें; ह्मणजे हा परमसमर्थ तारणारा केव्हां येईल व काय करील यांविषयीं पूर्वींच जेवढें सांगून ठेवण्यास पाहिजे होतें, तेवढें भविष्यकथनांत सांगितलें असल्यानें, त्यांची आशा तिकडे लागून त्यांचा विश्वास त्यावर बसावा याचें अगत्य होतें. अशी व्यवस्था झाली नसती तर ख्रीस्ताचे पूर्वीं जे लोक होऊन गेले त्यांचा धर्म, व ख्रीस्तानंतरचे जे लोक झाले व हल्लीं आहेत, त्यांचा धर्म यांमध्यें मोठेंच अंतर पडलें असतें, व तारणोपायाचा मार्ग जो वस्तुतः सर्व काळांत एकच आहे, तो तसा राहूं शकला नसता. ख्रीस्ताचे पूर्वीं जीं भविष्यें निवेदन केलीं गेलीं, त्यांचा उपयोग ज्याप्रकारें हल्लीं इतिहास आमचे उपयोगीं पडतो, त्याचप्रकारें झाला; प्राचीन काळचे सद्भक्त उद्धारक **पुढें येणार आहे** असा विश्वास ठेवीत व आह्मी तो **येऊन गेला** असा विश्वास धरितों. ख्रीस्ताचे पूर्वीं होऊन गेलेल्या लोकांपेक्षां आह्मांस अधिक ज्ञान आहे, हें जरी खरें आहे, तथापि ख्रीस्त हा मध्यबिंदु असून मागील पुढील सर्व लोक त्यानें आपल्याकडे आकर्षिले आहेत, ह्मणजे सर्व विश्वासणारांचे डोळे त्याकडे एकसारखे होते व हल्लीं लागलेले आहेत.

या खेरीज यहूदी राष्ट्र व ज्या राष्ट्रांशीं ह्मणजे मिसरी, सिरियन, अदोम, बाबेलोन व टायर इत्यादिकांशीं त्याचें दळणवळण होतें, त्या सर्वांस अनुलक्षून बायबलांत भविष्यें सांगितलीं आहेत. आतां ह्या भविष्यकथनाचें कारण आपले लक्ष्यांत यावें म्हणून एक उदाहरण देतों. अशी कल्पना करा कीं, कोणा एका मनुष्याचा पुत्र मोठा झाल्यावर त्यास आपले बापाचें घर सोडून दूर देशीं जाण्याचा प्रसंग प्राप्त होतो. घराबाहेर पडल्यावर अनेक दुःखें येण्याचा व मोह पडण्याचा संभव असल्यामुळें त्या मुलाचा बाप त्याला प्राप्त होणाऱ्या वाईट गोष्टींबद्दल सावध होण्याकरितां इशारत देऊन ठेवितो, जर त्या बापाला भविष्यज्ञान असतें तर तो त्याला सर्व कांहीं पूर्वींच सांगून ठेवल्यावांचून न राहता. परमेश्वर आपले लोकांशीं अशाच प्रकारें वागतो. तो आपले लोकांस व जगांतील इतर राष्ट्रांस त्यांस पुढें काय होईल हें कळविण्याचें अगत्य दिसल्यास कळविल्यावांचून कधींही राहत नाहीं.

दुसरा उपयोग.

भविष्यकथनाचा हा मूळचा व महत्त्वाचा उद्देश सिद्धीस गेल्यावर त्यापासून दुसरें एक महत्त्वाचें कार्य घडून येतें. जेव्हां एखादें भविष्य पूर्ण होतें तेव्हां ज्यानें तें मूळारंभीं कथिलें त्याचे ठायीं अमानुष ज्ञान आहे यास अबाधित प्रमाण मिळतें. यावरून तुमचे लक्ष्यांत येईल कीं जीं भविष्यें प्राचीनकाळीं यहूदी लोकांकरितां कथन केलीं तीं त्यांस बोध व सूचना देण्याचे कामीं अत्यंत उपयोगीं पडलीं, एवढेंच केवळ नव्हे तर त्यांपासून तेंच कार्य हल्लींही घडत असून तीं ज्या धर्मावर आमचा विश्वास आहे त्याच्या सत्यतेस प्रमाणभूत आहेत. आह्मा-

पालन केल्यास कल्याण होईल व आज्ञाभंग केल्यास शिक्षा मिळेल, अशा अर्थाचीं सर्व भविष्यें यथातथ्य पूर्ण झाल्यावर अर्थातच तीं बायबलाच्या सत्यतेस मोठीं सबळ प्रमाणें आहेत.[१]

याप्रमाणें भविष्यकथनाचें तत्त्व जितकें ख्रिस्तीशास्त्रावरून सिद्ध करवलें तितकें केलें.

भविष्यांचे अनेक प्रकार.

या उपपादनावरून भविष्यें हीं अनेक प्रकारचीं असलीं पाहिजेत हें सहज तुमचे लक्ष्यांत येईल; कारण प्राचीन भक्तजनास आपणांमध्यें पुढें होणाऱ्या मुख्य मुख्य गोष्टींचें व पुढें येणाऱ्या महान् उद्धारकाचें ज्ञान असणें, तसेंच त्या मंडळीच्या आसपास जीं राष्ट्रें होतीं त्यांस घडणाऱ्या मुख्य गोष्टी अगोदर प्रगट करणें यांचेंही अगत्य होतें. ह्मणून भविष्यांवरून जीं प्रमाणें मिळतात त्यांची संख्या फारच मोठी असल्यामुळें त्या सर्वांचें दिग्दर्शन येथें करीन ह्मटलें तर अशक्य आहे. याकरितां त्यांमध्यें अतिशय महत्त्वाचीं जीं आहेत त्यांतून कित्येक निवडून घेऊन त्यांकडे तुमचें लक्ष्य लावावें असा माझा बेत आहे.

पहिल्यानें ख्रीस्तानें स्वतः जीं भविष्यें सांगितलीं त्यांविषयीं आपण विचार करूं. त्या भविष्यांचे चार वर्ग करितां येतात.

ख्रीस्तानें सांगितलेलीं भविष्यें.

१. ख्रीस्तानें आपले मरणाविषयीं व तत्संबंधी ज्या गोष्टी त्यांविषयीं जीं भविष्यें सांगितलीं तीं.

२. त्यानें आपलें पुनरुत्थान व स्वर्गारोहण यांविषयीं जीं भविष्यें सांगितलीं तीं.

३. त्यानें आपले अनुयायांचा वृत्तांत व स्थिति यांविषयीं सांगितलेलीं भविष्यें.

४. यरुशलेमाच्या नाशाविषयींचीं भविष्यें.

ख्रीस्ताचें मरण व त्यासंबंधी होणार गोष्टी यांविषयीं जीं भविष्यें आहेत तीं मी आतां सांगतों. ख्रीस्तानें आपल्या मरणाचें **स्थान**[२] व **काळ**[३] व **अवस्था**[४] म्हणजे आपल्या

---

[१] जीं भविष्यें खरोखर प्रचीतीस आलीं आहेत त्यांविषयीं विचार करतां त्यांपासून नीतिशास्त्राचें कार्य कसें उत्तम प्रकारें साधलें जातें हें विसरतां कामा नये. प्रत्येक ईश्वरी आश्वासन किंवा भयसूचना हीं जरी दुसऱ्याच्या प्रचीतीनें आपणांस कळलीं तथापि त्यांवरून आपणांस पुष्कळ बोध घेतां येतो, हें लक्षांत वागवावें. याकरितां प्रचीतीस आलेल्या भविष्यांस "ईश्वरानें स्वतः विवृत केलेला इतिहास" असें नांव देणें योग्य आहे.

[२] मात्थी १६:२१. तेव्हांपासून येशू आपल्या शिष्यांस दर्शवूं लागला, कीं मीं यरूशलेमास जाऊन वडील व मुख्य याजक व शास्त्री यांकडून बहुत दुःखें सोसावीं, व जीवें मारिला जावा...याचें अगत्य आहे.

[३] मात्थी २०:१८. पाहा, आपण यरूशलेमास जातों, आणि मनुष्याचा पुत्र मुख्य याजकांच्या व शास्त्र्यांच्या हातीं दिल्हा जाईल; आणि ते त्याला मरणदंड ठरवितील.

[४] मार्कस. १४:१८. नंतर ते बसून जेवीत असतां येशू ह्मणाला, मी तुह्मांस खचीत सांगतों कीं; जेवणारा तुह्मांपैकीं एक मजबरोबर मला पराधीन करील,

शिष्यांपैकीं एक आपल्याशीं दगलबाजी करील, व बाकीचे सर्व आपल्यास सोडून पळून[१] जातील; मुख्य याजक व शास्त्री हे आपल्या विरुद्ध कट[२] करितील, व आपल्यास क्रूसावर[३] चढवून मारितील ह्यांविषयीं पूर्वींच भाकीत केलें होतें. यहूदी लोकांत क्रूसावर मारण्याची चाल मुळींच नव्हती. रोमन लोकांत जरी गुलामांस अशा प्रकारें शासन देण्याचा प्रघात होता, तथापि ख्रीस्तानें आपल्यास त्याच प्रकारचा दंड लावितील व मेल्यावर तिसरे दिवशीं आपण पुनः[४] उठूं व स्वर्गास[५] चढून जाऊं व आपल्या शिष्यांचा त्यांचे देशबांधवच केवळ नव्हे पण सर्व जगांतील लोक द्वेष करितील, त्यांस बहिष्कृत करितील व त्यांच्यापैकीं कित्येकांस ठार देखील मारतील, अशा प्रकारें त्यांचा[६] छळ करितील ह्या सर्व गोष्टी पूर्वींच कथन करून ठेवल्या होत्या. ख्रीस्ताचें पुनरुत्थान व्हावयाचें आहे या विषयींचें त्यानें सांगितलेलें भविष्य त्याच्या शत्रूंस पक्कें माहीत असल्यामुळें तें प्रत्ययास येऊं देऊं नये, असा त्यांनीं निश्चय केला होता[७]. कोणा ठकानें मी मरून पुनः उठेन व सदेह स्वर्गास जाईन व तुह्मी माझे अनुयायी झाल्यास तुमची फट फजिती होईल, व तुह्मांस दुःखें व मरण हीं भोगावीं लागतील असें सांगितल्याचें व शिष्य केल्याचें

---

[१] योहान. १६:३२. पाहा, अशी वेळ येते व आली आहे कीं दाणादाण होऊन तुह्मी सर्व आपापल्या घरीं जाल, व मला एकटा सोडाल, तरी मी एकटा नाहीं, कारण बाप मजबरोबर आहे.

[२] मार्कस. १०:३३. पाहा, आपण वर यरूशलेमास जातों आणि मनुष्याचा पुत्र मुख्य याजकांच्या व शास्त्र्यांच्या हातीं दिला जाईल व ते त्याला मरणदंड ठरवितील व विदेश्यांच्या स्वाधीन करितील.

[३] मात्थी. २०:१९. आणि थट्टा करायास व फटके मारायास व वधस्तंभीं द्यायास ते त्याला विदेश्यांच्या स्वाधीन करितील.

[४] मार्कस. १०:३४. आणि ते त्याची थट्टा करितील, व त्याला फटके मारितील, त्यावर थुंकतील आणि त्याला जिवें मारिल, आणि तीन दिवसांनीं तो पुन्हां उठेल.

[५] योहान. ६:६२. मनुष्याचा पुत्र पूर्वीं होता तिकडे जर तुह्मी त्याला चढतांना पाहाल तर—

[६] योहान. १५:१९. तुह्मी जगाचे असता तर जगानें स्वकीयांवर प्रीति केली असती, परंतु तुह्मी जगाचे नाहींत, तर मीं तुह्मांस जगांतून निवडिलें आहे, ह्मणून जग तुमचा द्वेष करितें.

योहान १६: २, ४. ते तुम्हांस सभेंतून घालवितील इतकेंच नाहीं तर अशी वेळ येत आहे कीं जो कोणी तुमचा जीव घेईल त्याला आपण देवाला सेवा अर्पण करितों असें वाटेल. तर मीं तुह्मांस ह्या गोष्टी अशासाठीं सांगितल्या कीं त्यांची वेळ आली ह्मणजे त्या मीं तुह्मांस सांगितल्याची आठवण व्हावी.

[७] मात्थी. २७: ६२, ६३. आणि दुसऱ्या दिवशीं ह्मणजे तयारीच्या नंतरच्या दिवशीं मुख्य याजक व परोशी पिलाताकडे मिळून ह्मणाले, महाराज, तो ठक जीवंत असतां तीन दिवसांनंतर मी उठेन असे ह्मणाला होता याची आह्मांस आठवण आहे.

कधीं कोणी ऐकिलें आहे काय? व जर ख्रीस्तानें अशा प्रकारें स्पष्ट सांगितलें तर त्याच्या सत्य व धार्मिक बुद्धीची जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे.

यरूशलेमाच्या नाशाविषयीं नव्या करारांत जें भविष्य आहे तें पाल्हाळिक असून मोठ्या महत्त्वाचें आहे. लूक अध्याय २१ आणि मात्थी अध्याय २४ पहा. हें भविष्य प्रचीतीस येण्याच्या चाळीस वर्षें अगोदर कथिलें होतें व त्या वेळीं भविष्यांत सांगितलेल्या मुदतीस अशी गोष्ट घडून येईल असें मानवी बुद्धीनें तर कधींही कबूल केलें नसतें. त्या शहराचा व त्यांतील देवळाचा नाश व त्या संबंधी गोष्टी ह्या सर्वांबद्दल ख्रीस्तानें पूर्वींच सांगून ठेविलें होतें. हें भविष्य अक्षरशः प्रचीतीस आलें असें आह्मांस योसिफस म्हणून जो यहूदी इतिहासकार होऊन गेला, त्याच्या ग्रंथावरून समजतें. या ग्रंथकारानें ज्या गोष्टींकडून ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेस प्रमाण मिळेल, अशा गोष्टी लिहून ठेवण्याचें टाळलें असतें यांत संशय नाहीं. यरूशलेमाच्या नाशाविषयीं ख्रीस्तानें जें भविष्यकथन केलें तें येणेंप्रमाणें:—यरूशलेमाचा नाश होण्यापूर्वीं जुन्या करारांत ज्याविषयीं भविष्य सांगितलें होतें त्या ख्रीस्ताचें सोंग घेणारे खोटे तोतया ख्रीस्त उत्पन्न होतील; तसेंच, दुष्काळ, महामाऱ्या, भूमिकंप व आपले शिष्यांचा पाठलाग इत्यादि अनेक अरिष्टांवर अरिष्टें येऊन धडकतील; परंतु त्यांकडून त्याच्या धर्माचा प्रसार होण्यास कांहीं व्यत्यय येणार नाहीं. त्या शहरांतील आपल्या शिष्यांचा इतर लोकांबरोबर नाश न व्हावा म्हणून त्यानें त्यांस त्याच भविष्यांत एक खूण सांगून ठेविली होती, व यरूशलेमास वेढा पडून त्या शहरांतील लोकांस दे माय धरणी ठाय होईल असें सांगितलें. यांहीपेक्षां बारीक गोष्टी ह्या भविष्यांत सांगितलेल्या आहेत त्या अशाः—देवळाची भव्य इमारत जमीनदोस्त होईल; कांहीं थोडक्या जीवांचें रक्षण व्हावें म्हणून शत्रूंचा वेढा फार दिवस राहणार नाहीं. आणि यहूदी लोकांस गुलाम करून सर्व राष्ट्रांत घेऊन जातील. सदहू भविष्यांतील सर्व गोष्टी घडून आल्या. इतिहासावरून कळतें कीं सदहू अरिष्टें यहूदी लोकांस टाळतां आलीं नाहींत, परंतु तींच ख्रिस्ती लोकांस टाळतां आलीं, याचें कारण ख्रिस्ती लोकांचा ख्रीस्ताच्या वचनांवर विश्वास होता, तसा यहूदी लोकांचा नव्हता. हें जें ख्रीस्तानें भविष्यकथन केलें त्याचें व त्याच्या पूर्णतेचें इतकें साम्य आहे कीं यूसिबियस नामक एका पुरातन ख्रिस्ती ग्रंथकारानें योसिफस या नांवाच्या यहूदी इतिहासकाराच्या ग्रंथांतून पुष्कळ वेंचे घेऊन ख्रीस्ताचें सर्व बोलणें सिद्धीस गेलें, असें ठरविलें आहे. आणि त्यानेंच ख्रीस्तामध्यें विलक्षण प्रकारें सत्य ईश्वरीज्ञान होतें व त्यावरून ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त होय यांस हें भविष्य पुराव्यादाखल आहे असें म्हटलें आहे.

ज्याप्रमाणें नव्या करारांत भविष्यें आहेत, त्याप्रमाणेंच जुन्या करारांत देखील आहेत, व त्या भविष्यांच्या पूर्णतेवरून ख्रिस्ती धर्म खरा आहे हें सिद्ध होतें.

**जुन्या करारांतील भविष्यें.** नव्या कराराचा पूर्णपणें शोध केल्यावर जुन्या करारास हात घालायाचा असा ज्यापक्षीं आमचा बेत आहे त्यापक्षीं जुन्या करारांतील भविष्यांविषयीं विस्तारेंकरून या ठिकाणीं लिहितां येत नाहीं.

तथापि हा विषय फारच हितकारक व महत्त्वाचा असल्यामुळें, या ठिकाणीं त्याविषयीं थोडासा उल्लेख करणें मला बरें वाटतें. जुना करार हा ख्रीस्ताच्या पूर्वीं बरींच वर्षें लिहिला गेला. जुन्या कराराचें इब्री भाषेंतून ग्रीक भाषेंत झालेलें भाषांतर[१] ख्रीस्ताच्या अगोदर १५० वर्षें झालें होतें. या भाषांतराचा प्रसार ज्या देशांतून ग्रीक भाषा बोलत असत त्या सर्व देशांतून यहूदी लोकांमध्यें झाला होता. प्रस्तुत जुन्या कराराच्या संबंधानें एवढीच गोष्ट घेऊन आपलें भागणार आहे. आतां शें दोनशें वर्षांमागें कथलेलीं भविष्यें आज जर खरीं होतात तर ज्यांनीं तीं कथन केलीं त्यांस अमानुष ज्ञान होतें असें कोणीही कबूल करील. तसेंच एक हजार वर्षांमागें कथन केलेलें भविष्य आज प्रत्ययास येत आहे तर त्याची देखील योग्यता तितकीच आहे; कारण भविष्य प्रत्ययास येणें ही गोष्ट महत्त्वाची आहे, व दोन्ही भविष्यें प्रचीतीस आल्यावर एकाच योग्यतेचीं असून त्या प्रत्येकांतील भविष्याचें ज्ञान मात्र अमानुष होतें असें कबूल करावें लागेल. जुन्या करारांतील सर्व भविष्यांचा मुख्य विषय म्हटला ह्मणजे येशू ख्रीस्त हा होय.

ख्रीस्ताविषयीं भविष्यें.

ज्या मोठ्या तारकाच्या आगमनाची लोक प्रतीक्षा करीत होते त्याविषयीं जुन्या करारांत जीं भविष्यें आहेत त्यांची इतकी मोठी संख्या आहे कीं ती पाहिल्यानें कोणासही मोठा अचंबा वाटल्याशिवाय राहणार [२]नाहीं. त्यांपैकीं कित्येक मी उदाहरणार्थ येथें सांगतोंः—बायबलाच्या आरंभींच ह्मणजे त्याच्या पहिल्या पुस्तकाच्या तिसऱ्या अध्यायांत असें लिहिलें आहे, कीं "स्त्रीचें बीज सर्पाचें मस्तक फोडील."[३] पुढें पुढें पाहत गेलें असतां जीं भविष्यवचनें आढळतात तीं येणेंप्रमाणेंः—तो (ख्रीस्त) मोशयाच्या तोडीचा भविष्यवादी होईल.[४] तो आब्राहामाच्या वंशाचा होईल.[५] तो नेमलेल्या वेळीं,[६] दुसरें देऊळ उभें असतांना,[७] बेथलहेम गांवीं,[८] दावीदाच्या घराण्यांत,[९] व यहूदाच्या कुळांत[१०] जन्मेल. त्याचा अग्रगामी एलीयाच्या तोडीचा प्रसिद्ध पुरुष[११] होईल. तो कुमारिकेच्या पोटीं जन्मेल.[१२] ज्यांच्यायोगें मोठी विलक्षण शक्ति व प्रीति हीं प्रगट होतील असे अद्भुत[१३] चमत्कार तो करील.

---

[१] या भाषांतरास सप्ट्युजिंट भाषांतर ह्मणतात. हें भाषांतर करण्याचे कामास इ० सनापूर्वीं २८०व्या वर्षीं आरंभ झाला.

[२] मग त्यानें मोशे व सर्व भविष्यवादी यांपासून आरंभ करून सर्व शास्त्रांतील आपल्या विषयींच्या गोष्टी त्यास समजाविल्या. लूक २४: २७.

येशूची साक्ष तर भविष्यवादाचा आत्मा आहे. प्रगटविणें १९: १०.

[३] उत्पत्ति ३: १५ हें गलती० ४:४ व इब्रि० २:१४ यांशीं ताडून पहा.

[४] अनुवाद. १८:१५. [५] उत्पत्ति २२:१८= गल० ३:१६. [६] दानी० ९:२४.

[७] हग्गइ २:७,९. [८] मीखा ५:२= मात्थी २:१. [९] यशाया ११:१०; इर्मया २३:५,६.

[१०] उत्पत्ति ४९:१०= इब्री० ७:१४. [११] मलाखी ४:५. [१२] यशाया ७:१४.

[१३] यशाया ६१-१-३=लूक ४:१७-२१.

तो आपल्या देशबांधवांस अप्रिय[१] होईल. ते त्याला छळ्यांनीं मारतील, त्याची थट्टा करतील, त्याच्या तोंडावर थुंकतील[२] व त्याच्या हातापायांत खिळे ठोकतील.[३] त्याला अघोर मरण प्राप्त होईल,[४] तथापि त्याचें शरीर कुजणार नाहीं व शवगर्तेत पडून न राहतां तो[५] पुनः उठेल.[६]

ज्या तारकाची प्रतीक्षा इस्राएल लोक करीत होते त्याविषयींच्या भविष्यांत जो विसंगतपणा दृष्टीस पडतो, त्यावरून तीं सर्व एकाच व्यक्तीस अनुलक्षून असावींत, याविषयीं मूळारंभीं मनांत संशय उत्पन्न होतो. एके स्थळीं तो महान् पराक्रमी राजा[७] होईल असें म्हटलें आहे, व दुसऱ्या ठिकाणीं तो जाचलेला व[८] पीडलेला असा होऊन मारला[९] जाईल अशा प्रकारें त्याचें वर्णन केलें आहे. ज्यास एका ठिकाणीं शोकाचा पुरुष[१०] म्हटलें आहे, त्यासच दुसऱ्या ठिकाणीं समर्थ देव[११] असें नामाभिधान दिलें आहे. ह्या परस्परविरुद्ध वाक्यांचा ख्रीस्तामध्यें कसा सुमेळ जमतो हें पाहिलें असतां मोठें आश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं.

यशाया भविष्यवाद्याचा ५३वा अध्याय आरंभापासून शेवटपर्यंत लक्ष्यपूर्वक वाचून पाहतां, त्यांतील वर्णन येशू ख्रीस्ताशिवाय दुसऱ्या कोणासही ठाम लागू पडत नाहीं, हें फार आश्चर्य आहे. ज्यांच्या मनांत ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त असल्याविषयीं पुष्कळ दिवस संशय घोळत होता अशा पुष्कळांची खातरी तो एक अध्याय वाचून झाली आहे. इंग्लंडांत दुसरा चार्ल्स राज्य करीत असतांना जान विलमाट या नांवाचा राचेस्टरचा अर्ल होता. तो मोठा थट्टेबाज, दुराचरणी व नास्तिक मतानुसारी असे. त्यानें बहुतकाळ धर्माची निंदा केली; परंतु मरणाचे पूर्वीं प्रभु येशू ख्रीस्त हा मनुष्यांचा तारणारा आहे अशी त्याची खातरी झाली; ही होण्यास जे शास्त्रभाग त्याला साधनभूत झाले त्यांत विशेषेंकरून हा ५३वा अध्याय होता असें त्यानें स्पष्ट सांगितलें.

---

[१]यशाया ५३:२,३=योहान १:११. [२]यशाया ५०:६=मात्थी २६:६७. [३]गीत २२:१६. [४]यशाया ५३:८; दानीयेल ९:२६. [५]गीत १६:१०= प्रे० कृत्यें २:२६,३०,३१.

[६] एखादें भविष्य एकापेक्षां अधिक वेळां पूर्ण होणें हें अगदीं संभाव्य आहे. इतिहासाची केव्हां केव्हां पुनरुक्ति होते असें जें ह्मटलें आहे तें अगदीं बरोबर आहे. उदाहरणार्थ, मात्थी २:१७ या ठिकाणीं, "मी आपल्या पुत्राला मिसर देशांतून बोलाविलें आहे" असें जें वाक्य आढळतें तें प्रथमारंभीं इस्राएल राजास लागू पडतें व दुसऱ्यानें खुद्द ख्रीस्तास लागू आहे. अनुवाद १८:१५ या ठिकाणीं जें भविष्य आहे तें पहिल्यानें खऱ्या भविष्यवाद्यांच्या परंपरेस लागू आहे असें जें कित्येकांचें मत आहे त्यांत कांहींसा तथ्यांश आहे, तथापि तें भविष्यवाक्य प्राधान्येंकरून ख्रीस्तास लागू पडतें.

[७] गीत २:८,९. [८] यशाया ५३:७. [९] दानीएल ९:२६. [१०] यशाया ५३:३. [११] यशाया ९:६.

जुन्या करारांत याखेरीज कित्येक जगत्प्रसिद्ध राष्ट्रांविषयीं भविष्यें आहेत. त्यांची यथार्थता त्या राष्ट्रांच्या इतिहासांशीं तुलना केली असतां स्पष्ट दिसण्यांत येते. यहूदी राष्ट्राची सर्व जगांत फांकाफांक[१] होईल, तथापि ज्याप्रमाणें इतर राष्ट्रें रसातळास गेलीं त्याप्रमाणें तें जाणार[२] नाहीं अशा अर्थाचीं भविष्यें जुन्या करारांत आहेत. यहूदी लोकांच्या ह्या स्थितीशीं बरोबरी करणारी अशी जगाच्या सर्व इतिहासांत दुसरी गोष्ट आढळत नाहीं, व या राष्ट्राचें या प्रकारें मातेरें होईल हें कोणाचे ध्यानीं मनीं देंखील नव्हतें.[३] प्राचीन काळीं मिसरी राष्ट्र हें मोठें वलाढ्य राष्ट्र होतें, तथापि तें "कालेंकरून अति नीच[४] राष्ट्रांच्या पंक्तीस बसेल," असें त्याविषयीं भविष्य कथिलें होतें, व तें प्रत्ययासही आलें आहे. आसिरियन सार्वभौम राजाची निनवे ह्मणून जी शोभिवंत राजधानी होती, तिजविषयीं पुढें सांगितल्याप्रमाणें भविष्य कथिलें होतें:—"निनवे हें शहर केवळ ओसाड जंगलाप्रमाणें होईल[५]." हें भविष्य देखील प्रत्ययास आलें आहे. बाबेलोन ह्मणून प्राचीन काळीं जी अति भव्य नगरी होती "तिजमध्यें पुढें कधींही वस्ती होणार नाहीं" असें भाकीत केलें होतें, व ज्या ज्या प्रवासी लोकांनीं तें ठिकाण पाहिलें आहे ते ते असें सांगतात कीं त्या ठिकाणीं स्मशानवत् एकांत मूर्तिमंत वास करीत आहे. प्राचीनकाळीं व्यापाराविषयीं जें शहर अति विख्यात होतें व ज्याचे "व्यापारी अधिकारी व ज्याचे वाणी पृथ्वींतील संभावित" अशी जगभर कीर्ति होती अशा त्या सोर नगराविषयीं "मी त्या शहरास खडकाच्या माथ्याप्रमाणें बनवून तें समुद्रांतील मासे धरण्याचीं जाळीं पसरण्याचें ठिकाण[६] असें करीन," असें भविष्य केलें होतें. या भविष्यान्वयें सोरचें जें अति सुंदर बंदर त्याचा समूळ नाश झाल्याचें आज आमचे दृष्टीस पडत आहे. त्या बंदरांत केवळ लहान होड्या मात्र मोठ्या प्रयासानें जाऊं शकतात. ब्रूस नामक प्रवाशानें "सोर हें नगर हल्लीं एक खडक असून त्यावर कोळी लोक मासे धरण्याचीं जाळीं वाळत टाकतात" असें वर्णन केलें आहे.[७]

---

[१] अनुवाद ४:२७;२८:६५–६८. [२] इर्मया ४६:२७,२८.

[३] Duke of Argyll's "Reign of Law" नामक पुस्तकाचें २०वें पृष्ठ पहावें. प्रशिआ देशाचा राजा पहिला फ्रेड्रीक विलियम यानें एके दिवशीं आपले पाद्रीस विचारलें कीं बायबलाचे सत्यतेविषयीं अल्प असून निश्चयात्मक असें प्रमाण कोणतें तें सांगावें. पाद्रीनें चटकन उत्तर दिलें, "यहूदी राष्ट्र."

[४] यहेज्केल २९:१५. [५] सफन्या २:१३. [६] यहेज्केल २६:४,५.

[७] नबूखद्नेस्सर राजानें टायर शहराचा विध्वंस केला ह्या गोष्टीकडे यहेज्केल भविष्यवाद्याच्या ग्रंथांतील भविष्याचा संदर्भ आहे असें दिसतें. त्या शहराचा एक वेळेस नाश झाल्यावर पुनः तें चांगल्या भरभराटीस आलें, परंतु शिकंदर बादशाहानें तें पुनः धुळीस मिळविलें. त्यानंतर त्या शहराचा पुनः उदय झाला, तथापि लवकरच तें मोडकळीस येऊन ब्रूस नामक प्रवाशानें जें वर्णन केलें आहे त्या प्रकारें त्याची स्थिति लवकरच झाली.

ज्या काळीं हीं भविष्यें कथिलीं गेलीं त्या काळीं वर सांगितलेलीं राज्यें व शहरें मोठ्या भरभराटींत होतीं. प्रस्तुत काळीं ज्याप्रमाणें लंडन शहर किंवा आमची मुंबापुरी अथवा न्यूयार्क वगैरे शहरें मोठ्या आबादानींत असतां त्यांचा सत्यानाश होऊन तीं रसातळास जातील असें कोणाच्याही मनांत येणार नाहीं, त्याप्रमाणें वर सांगितलेल्या शहरांची भविष्य-कथनाचे वेळेस स्थिति होती, व तीं भविष्यें खरीं होतील असें कोणाचे ध्यानीं मनीं देखील आलें नाहीं.

ख्रिस्ती धर्माचा प्रसार सर्व जगांत होईल अशा अर्थाचीं जीं भविष्यें जुन्या करारांत आहेत तीं फारच चमत्कारिक आहेत. त्यांची संख्या मोठी असल्यामुळें त्यांचें दिग्दर्शन देखील या ठिकाणीं करवत नाहीं. मूर्त्तिपूजेचा लोप होऊन खऱ्या देवाची भक्ति सर्व जगभर चालू राहील अशा अर्थाचीं तीं सर्व आहेत. नव्या करारांत देखील अशा अर्थाचीं स्पष्ट भविष्यवचनें पुष्कळ आहेत. "मला पृथ्वीपासून[1] उंच केलें तर मी आपणाकडे सर्वांस ओढीन" याप्रकारें ख्रीस्तानें म्हटलें. तसेंच "अवघ्या देशांत[2] जाऊन सर्व सृष्टीला शुभवर्तमान गाजवा" असें ख्रीस्तानें स्वर्गास जाण्याअगोदर शिष्यांस आज्ञा देऊन पाठविण्याच्या वेळीं म्हटलें. हीं वचनें ख्रीस्तानें कथिलीं त्या वेळेस सर्व लोकांचीं मनें त्याकडे आकर्षिलीं जातील किंवा सर्व जगांत त्याच्या उपदेशाचा प्रसार होईल ह्या दोन्ही गोष्टी अघटित आहेत, असें सर्वतोपरी दिसत होतें. परंतु आज १९ शतकें मोठमोठीं विघ्नें व अडथळे येत असतांही त्यांच्यामधून ख्रीस्ताचा धर्म जय मिळवीत चालला आहे. आणि जगामध्यें जें अधर्म व अनीतिरूप अरण्य माजलें आहे तें तोडून टाकलें जाऊन ह्या पृथ्वीस सुंदर गुलाबाच्या वनाप्रमाणें करून आनंदित करण्यासाठीं प्रयत्न करायाला ख्रिस्ती लोकांस विशेष विश्वास व शक्ति मात्र पाहिजे. मिशनांकडून विधर्मी लोकांमध्यें जें काम गेल्या शंभर वर्षांत झालें त्यावरून ख्रिस्ती धर्म शेवटीं विजयी होऊन प्राचीन भविष्य-वचनांत प्रगट केलेली उच्च प्रतीची आशा सफळ होईल याविषयीं मनांत संशय राहतच नाहीं.

यांशिवाय दुसरीं लक्ष्यांत वागवायाजोगीं व प्रत्ययास आलेलीं अशीं पुष्कळ भविष्यें बायबलांतून येथें दाखल करितां येतील, परंतु ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे हें सिद्ध करण्यास एवढीं बस्स आहेत असें मला वाटतें. एका ग्रंथकारानें पुढील प्रश्न केला आहेः "जर एखादे ग्रंथाच्या सत्यतेस अशीं प्रमाणें मिळत असतांना त्याच्या सत्यतेविषयीं आम्ही संशय बाळगूं तर मग या अफाट जगतांत खचीत व स्थिर असें काय आहे बरें?" तर अशा खातरीलायक पुराव्यांचा आपण विचार कराल व "भविष्यवाद कधीं माणसाच्या इच्छेनें झाला नाहीं, तर देवाचे पवित्र आत्म्याकडून प्रेरिलेले बोलले," (२ पेत्रस १:२१) हा ख्रिस्ती शास्त्रांतील भविष्यांविषयींचा लेख तुम्हांस ग्राह्य होईल अशी मी आशा बाळगितों.[3]

**आपला मित्र—.**

---

[1] योहान १२:३२. [2] मार्कस १६:१५. [3] परिशिष्ट ३ पहा.

# पत्र सातवें.

## बायबलाचें अंतःप्रमाण.

अंतःप्रमाण—त्याचे दोन भाग—पहिला, ख्रिस्ती धर्म मनुष्यकृत नाहीं—यहूदी लोकांस ख्रिस्ती धर्माची योजना करितां आली नसती—ख्रिस्ती धर्म यहूदी लोकांस आवडेल असा नव्हता—मूर्तिपूजक लोकांस देखील ख्रिस्ती धर्म अप्रिय होता—दुसरा, ख्रिस्ती धर्म ईश्वरकृत आहे—यास प्रमाणः १, ख्रिस्ती शास्त्रांतील अंतर्गत गोष्टींचें ऐक्य—२, सृष्टि व ख्रिस्ती शास्त्र यांचा सुमेळ—३, ख्रिस्ती शास्त्र व ईश्वरी कृति यांतील एकवाक्यता—तिसऱ्या प्रमाणाचें विशेष महत्त्व—ईश्वरी कृति दुर्बोध असल्यामुळें तिचें व ख्रिस्ती धर्माचें वळण एकच आहे.

**प्रिय मित्र—,**

आपण कोठवर येऊन ठेपलों.

मागील पत्रांमध्यें ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेच्या बाह्यप्रमाणांविषयीं आपण विचार केला व तसें करितांना नव्या कराराविषयीं जीं मुख्य प्रमाणें आहेत त्यांचें ठोकळ स्वरूप आपण पाहिलें. जो शांतपणानें व विचारपूर्वक सत्याचा शोध करितो व जो भक्तिपूर्वक ईश्वराला आपला शिकविणारा असें समजून त्याला शरण जातो, त्याची ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे अशी पूर्वींच्या पत्रांवरून देखील खातरी झाल्यावांचून रहाणार नाहीं.

तथापि आपलें कार्य अर्धें सुद्धां अद्याप उरकलें नाहीं. येवढा वेळ केवळ बाह्यप्रमाणांविषयीं आपण विचार केला. आतां अंतःप्रमाणांविषयीं विचार करायाचा आहे, व तीं बाह्यप्रमाणांसारखीं महत्त्वाचीं व खातरीलायक अशीं आहेत.

अंतःप्रमाण व बाह्यप्रमाण यांजमध्यें जें अंतर आहे त्याचें स्पष्टीकरण मी मागेंच पुरतेपणीं केलें आहे. दोन्ही प्रमाणांतील भेद जाणणें हें जरी अत्यंत अगत्याचें आहे, तथापि तो भेद फारच बारकाईनें पहाण्याचें प्रयोजन नाहीं, व तसें करणें हें देखील खरोखरच अशक्य आहे; कारण एकच प्रमाण कांहीं अंशीं धर्माच्या बाह्यस्वरूपास लागू पडेल व कांहीं अंशीं त्याच्या अंतःस्वरूपासही लागू पडेल.

अंतःप्रमाण.

ख्रिस्ती धर्माचीं अंतःप्रमाणें पाहतांना आपण त्या धर्माच्या गुणलक्षणांची तपासणी करितों; ह्मणजे हा धर्म कोणीं व कसा स्थापित केला इत्यादि प्रश्न आपण विचारीत नाहीं, तर हा धर्म आह्मांस काय सांगतो? ईश्वराकडून असाच निरोप येण्याची आपण अपेक्षा करितों काय? व तो निरोप ईश्वराला शोभेल असा आहे काय?

अशा प्रश्नांचें उत्तर देणें फार कठीण आहे, असें कदाचित् तुह्मी ह्मणाल. बिशप बटलर हे आपल्या नामांकित ग्रंथांत असें ह्मणतात, कीं देव अमुक एका प्रकारें वागेल असा पूर्वसिद्धांत करून ठेवणें हें फार कठीण आहे; तसेंच मनुष्याचें अज्ञान किती आहे हें तुह्मी शिकत आलां आहां. वरील प्रश्नांचें उत्तर देणें हें कठीण आहे हें मी कबूल करितों. परंतु एक गोष्ट लक्ष्यांत आणिली असतां अशा प्रश्नांचें गूढत्व बऱ्याच अंशीं दूर होतें. ख्रिस्ती धर्म हा ईश्वरदत्त तरी असला पाहिजे किंवा मनुष्यकृत तरी असला पाहिजे. या दोहोंपैकीं कोणतें तरी एक खरें मानणें भाग आहे. आतां ज्याप्रमाणें अनेक गोष्टींवरून ईश्वराच्या गुणांचें व त्याच्या मार्गाचें आह्मांस ज्ञान होतें त्याप्रमाणेंच मनुष्याचे गुण व त्याचें वर्तन हीं देखील पुष्कळ गोष्टींवरून कळून येतात. याकरितां ख्रिस्ती धर्माची परीक्षा करण्यासाठीं ह्या दोन कसोट्या आह्मांपाशीं आहेत.

आतां पहिल्यानें ख्रिस्ती धर्म हा केवळ मनुष्यकृत आहे काय याविषयीं आपण विचार करूं.

ख्रिस्ती धर्म मनुष्यकृत नाहीं.

ख्रिस्ती धर्माचे मूळ उपदेशक यहूदी होते. यहूदी लोकांस आपले पूर्वज, आपला देश, आपला धर्म, आपलें देऊळ व आपल्यासंबंधीं जें कांहीं होतें त्या सर्वांचा मोठा अभिमान असे. रोमन लोकांनीं त्यांस जिंकून आपल्या हस्तगत केल्यामुळें आपलें राज्य पुनः स्थापित केव्हां होईल याविषयीं ते अगदीं उतावळे झाले होते. रोमन सत्तेखालून निघून स्वतंत्रता मिळविण्याचीच ते केवळ आशा करीत नव्हते, तर जुन्या करारांत भाकीत केलेला मशीहा येऊन त्यांच्या शत्रूंचें पारिपत्य करील व सर्व जगाचें प्रभुत्व त्यास मिळेल याची ते मार्गप्रतीक्षा करीत होते. आपला धर्म खरा व जगांतील इतर सर्व धर्म खोटे व आपल्या धर्मांतील सर्व बारीक सारीक गोष्टी सर्वकाळ प्रचारांत राहतील असें यहूदी लोकांस वाटत होतें.

यहूदी लोकांस ख्रिस्ती धर्माची योजना करितां आली नसती.

जर ख्रिस्ती धर्म मनुष्यकृत असता तर ख्रीस्ताच्या प्रेषितांनीं जीं मतें अंगीकारलीं होतीं व ज्यांविषयीं आपले भाषणांत त्यांनीं वारंवार उल्लेख केला आहे, तीं स्वीकारण्यास त्यांस कोणतें कारण होतें हें समजणें फार कठीण पडतें. कारण ख्रीस्ताचें राज्य या जगांतील नाहीं असें ते स्पष्टपणें सांगत. तसेंच प्रजेनें आपले अधिकाऱ्यांचे सत्तेखालीं राहावें असा त्यांचा नेहमीं उपदेश असे. यहूदी लोकांस सर्व जगाचें आधिपत्य प्राप्त होईल अशाविषयीं त्यांनीं एकवार देखील आपले भाषणांत उल्लेख केलेला नाहीं. याशिवाय परधर्मांतून जे ख्रिस्ती धर्मांत आले होते त्यांच्यावर यहूदी धर्मांतील क्रियाकर्मांचा बोजा लादण्याविषयीं त्यांची सक्त मनाई असे. या गोष्टी यहूदी लोकांस अतिशय खिजविण्याजोग्या होत्या, व मूर्त्तिपूजक

ख्रिस्ती धर्म यहूदी लोकांस आवडेल असा नव्हता.

लोकांपेक्षां यहूदी लोक ख्रिस्ती धर्माचा अत्यंत द्वेष करीत असत हें तर आपणांस ठाऊकच आहे; व धर्मप्रकरणांत प्रेषितांनीं जे कांहीं फेरफार करण्याचें आरंभलें होतें तें केवळ सुधारणा नसून त्यांस "हे जगाची उलटापालट करणारे" आहेत असें यहूदी लोक ह्मणत असत. तर यांत द्विविध वादप्रमाण आहे. पहिलें हें कीं जर ख्रीस्ताच्या शिष्यांनीं या धर्माची स्थापना केली असती तर ते यहूदी असल्यामुळें त्या धर्माच्या लोकांच्या आचारविचारांच्या विरुद्ध असा धर्म त्यांच्यांनीं काढवला नसता; दुसरें हें कीं आपल्या देशबांधवांचा आपल्यावर गहजब होईल अशा धर्मस्थापनेच्या भरीस ते कधींच पडले नसते.

मूर्त्तिपूजक लोकांस देखील ख्रिस्ती धर्म अप्रिय होता.

यहूदी लोकांशिवाय इतर लोकांस ख्रिस्ती धर्म प्रिय होता असेंही नाहीं. त्या काळचे जे तत्त्वज्ञानी व साधारण लोक त्यांचें या धर्माविषयींचें मत कसें होतें हें पाहिल्यानें ही गोष्ट लक्ष्यांत येईल.

मूर्त्तिपूजक लोकांमध्यें जे तत्त्वज्ञानी होऊन गेले त्यांचीं ख्रिस्ती धर्माविषयींचीं मतें प्राचीन ग्रंथांमध्यें अनेक ठिकाणीं सांपडतात. ग्रीस व रोम येथील तत्त्वज्ञान्यांस बहुत कालपर्यंत ख्रिस्ती धर्म नापसंत होता, एवढेंच केवळ नव्हे तर त्यास आडवें येण्यास त्यांनीं पुष्कळ श्रम केले. याचें कारण पाहिलें असतां ख्रिस्ती धर्मानें प्रथम त्यांजवर हल्ला केला हेंच होय.

तत्त्वज्ञान्यांनीं ख्रिस्ती धर्माचा प्रतिरोध केला.

प्रभु ह्मणतो, 'देवाजवळ या जगाचें ज्ञान हें मूर्खपण आहे.' 'तुह्मी इतर लोकांप्रमाणें पापी आहां, व ईश्वराचा क्षोभ तुम्हांवर झाला आहे; ख्रीस्तानें खांबावर मरण सोसून जें प्रायश्चित्त सिद्ध केलें त्याचें अगत्य तुह्मांस आहे;' अशीं ख्रिस्ती लोकांच्या तोंडचीं भाषणें ऐकतांच ग्रीस व रोम येथील तत्त्वज्ञान्यांचें पित्त खवळत असे. लवकरच त्यांनीं ख्रिस्ती धर्माचे विरुद्ध भाषण करण्याचा व त्याच्या विरुद्ध लिहिण्याचा आरंभ केला. त्याच प्रकारें साधारण लोक देखील ख्रिस्ती धर्माचा द्वेष करीत. ज्या दैवतांस ते भजत असत त्यांस धैर्यानें दोष देण्याची ख्रिस्ती लोकांची रीत असल्यामुळें, व ते स्वतः कोणत्याही दृश्य वस्तूची पूजा करीत नसल्यामुळें अज्ञानी लोकांची, त्यांस नास्तिक समजून जीवें मारल्यानें आमचीं दैवतें संतुष्ट होतील, अशी समजूत झाली.

साधारण लोकांनीं देखील तसेंच केलें.

आणखी, जरी रोम शहरांत उंच प्रतीच्या लोकांत नास्तिक मताचा बराच फैलाव झाला होता तरी मूर्त्तिपूजा करणाऱ्यांची संख्या फारच मोठी होती. कोणतेंही सार्वजनिक कार्य करणें झाल्यास प्रथम रोम शहराच्या स्थापनेपासून परंपरागत चालत आलेलें

एखादें धर्मकृत्य करावें लागत असे; तें जर कोणीं न केलें तर तो देवनिंदक व स्वदेश-शत्रु असा मानिला जात असे. तसेंच कुलाचारांत जुना धर्म गुंफलेला होता. आणि जरी शिकलेल्या पुरुष मंडळीची त्यावर श्रद्धा नव्हती तरी स्त्रियांची जुन्या धर्मावर परमनिष्ठा असे.

या खेरीज मूर्त्तिपूजक धर्मांतील पूजाअर्चा मनास चित्तवेधक व दृष्टीस आनंददायक असे ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. बहुतेक मनुष्यांस डामडौल व तमाशे पहाण्याची मोठी आवड असते, व मूर्त्तिपूजक धर्मांत अशा गोष्टींचा मोठा भरणा असल्यामुळें त्या धर्माचें लोकांच्या मनांवर प्राबल्य फार दिवस राहिलें. तशांतून बहुतेक देवस्थानांत फार धनदौलत होती, व त्यांच्या पुजाऱ्यांची व इतर मनुष्यांची संख्या फार मोटी असून त्यांचा उदरनिर्वाह देवळांतील पूजेवर अवलंबून असे.

अशी स्थिति असतांनाही रोमन राज्यांत ख्रिस्ती धर्माचा जो मोठ्या वेगानें प्रसार झाला त्याविषयीं विचार करितां आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं.

जर ख्रीस्ताच्या प्रेषितांच्या मनांतून विधर्मी लोकांस ग्राह्य होईल अशा धर्माची स्थापना करण्याचें असतें तर ख्रिस्ती धर्मासारखा धर्म स्थापण्याच्या भरीस ते कधींच पडले नसते.

यहूदी व मूर्तिपूजक लोकांनीं ख्रिस्ती धर्माचा छळ केला असें जें मीं वर ह्मटलें त्यास इतिहासावरून पुरतेपणीं पुष्टीकरण होतें. मूर्तिपूजक लोकांनीं सतत २०० वर्षांपर्यंत ख्रिस्ती लोकांचा अत्यंत द्वेष केला, त्यांवर अनेक प्रकारचा जुलूम केला व त्यांचा अनेकवार क्रूरपणानें छळ केला. त्यांना आपल्या जीवांविषयीं नेहमीं भीति असे, व लोक त्यांवर उठून त्यांस सिंहांपुढें टाका असें केव्हां ओरडत सुटतील याचा नेमच नसे. यावरून असें निर्विवाद ठरतें कीं ख्रीस्ताच्या प्रेषितांनीं लोकांस अत्यंत अप्रिय असा धर्म शोधून काढल्यामुळें त्यांची चूक त्यांच्या नजरेस येऊन, अप्रतिष्ठा व मरण हीं भोगण्याच्याऐवजीं तो धर्मच बदलून टाकावा असें त्यांस वाटलें असतें; कारण मनुष्यास, मग तो कोणीही असो, दुःखावस्था सहसा आवडत नाहीं. ख्रीस्ताच्या प्रथम शिष्यांची ऐहिक स्थिति ह्मटली ह्मणजे "सर्व मनुष्यांपेक्षां अत्यंत लाचारीची" होती. देवाची आज्ञा आह्मांस शिरसावंद्य आहे व त्याची कृपा आह्मांस जीवनापेक्षांही अधिक आहे असा त्यांचा पूर्ण ग्रह झाल्याशिवाय त्यांनीं या प्रकारें वर्तन केलें नसतें.

यावरून हें उघड आहे कीं अशा संकटावस्थेंत असतां आरंभींचे उपदेशकांस अशा प्रकारचा धर्म बनवितां आला नसता, आणि तशाच स्थितींत काय पण कोणत्याही स्थितीमध्यें असा धर्म बनवितां आला नसता, कारण जगामध्यें हल्लीं प्रचारांत असलेल्या धर्मांत व ख्रिस्ती धर्मांत पुष्कळ गोष्टींचें अंतर आहे. त्यांपैकीं एक मोठी गोष्ट ही कीं मनुष्याच्या अभिमानाच्या विरुद्ध हा धर्म आहे. साधारणतः मनुष्यास आपल्या बुद्धीचा व ज्ञानाचा मोठा गर्व असतो; परंतु ह्या धर्माचें मनुष्यास असें सांगणें आहे कीं ज्याला ज्ञान पाहिजे त्यानें आपलें अज्ञान पदरीं घेऊन, देवापाशीं तें मागावें. मनुष्यास नम्र

ख्रिस्ती धर्माची योजना मनुष्यांकडून कधींच झाली नसती.

करणारें असें बायबलाशिवाय दुसरें पुस्तक नाहीं. तें त्याचा पोकळ अभिमान उतरतें; तें त्याला अगदीं सुनें व उघडें करून सोडतें. तर असा धर्म मनुष्यकल्पित आहे अशी कल्पना करायास तरी जागा राहते काय? तर ख्रिस्ती धर्म मनुष्यकृत नाहीं, हें यावरून सिद्ध होतें. आतां तो ईश्वरापासून आलेला असल्यास त्याविषयीं आमची कोणती अपेक्षा असावी हें आपण पाहूं:—

ख्रिस्ती शास्त्रांतील अंतर्गत गोष्टींचें ऐक्य.

१ ख्रिस्ती शास्त्राचे निरनिराळ्या भागांचें जें पूर्ण ऐक्य दृष्टीस पडतें त्यावरून तें शास्त्र ईश्वरदत्त आहे असें ठरतें.

वर्णनाचें ऐक्य.

ख्रीस्ताचें चरित्र जरी चार निरनिराळ्या पुरुषांनीं लिहिलेलें आहे, तथापि त्यांच्या लेखांत विपर्यास नाहीं. त्यांनीं एकमेकांचें पाहून लिहिलें नाहीं हें त्यांच्या लिहिण्याच्या निरनिराळ्या पद्धतींवरून दिसून येतें, तथापि ज्या घडलेल्या गोष्टींची ते हकीकत सांगतात त्यांत मोठा चमत्कारिक सुमेळ व सत्यता दिसून येते. याशिवाय ज्यांत प्रेषितांचीं कृत्यें वर्णिलीं आहेत असें पुस्तक व पांच प्रेषितांनीं लिहिलेलीं पुष्कळ पत्रें यांमध्यें ख्रिस्ताच्या व मूळच्या ख्रिस्ती लोकांच्या चरित्रांत आलेल्या गोष्टींचा उल्लेख आहे. ज्याप्रमाणें न्यायाच्या कोर्टांत साक्षीदारांच्या जबान्या एकमेकांच्या जबान्यांशीं मिळतात किंवा नाहीं हें पाहण्याकरितां त्यांची उलट सुलट तपासणी करितात त्याप्रमाणें शत्रूंनीं व मित्रांनीं या सर्व ग्रंथांची फार बारीक व कडक रीतीनें परीक्षा केली, व त्या सर्वांचा त्यांविषयीं एकसारखाच निर्णय झाला. त्यांस कोठें ह्मणून विरोध सांपडला नाहीं. येवढेंच केवळ नव्हे तर अति सूक्ष्म व आश्चर्यकारक असा मेळ आकस्मिक त्यांचे दृष्टोत्पत्तीस आला. इंग्रेजी भाषेंत "होरे पालिनी" या नांवाचा फारच मनोरंजक ग्रंथ डाक्टर पेली नामक विद्वानानें लिहिला आहे, त्यांत प्रेषितांच्या कृत्यांत लिहिलेल्या गोष्टींची प्रेषितांच्या पत्रांतील मजकुराशीं तुलना करून त्या दोहोंची उत्तम रीतीनें एकवाक्यता होते हें दर्शविलें आहे.

सिद्धांतांची एकवाक्यता.

धर्मसिद्धांतांमध्येंही अशाच प्रकारचा सुमेळ सर्वत्र आढळतो. संपूर्ण ख्रिस्ती शास्त्राचे ग्रंथ रचण्यास दीड हजार वर्षें लागलीं; त्यांचे कर्ते एक दोघे नसून सुमारें चाळीस होते; ते सर्व एकाच प्रतीचे नसून कोणी राजे, कोणी याजक, कोणी योद्धे, प्रधान, वैद्य, मेंढपाळ, जकातदार, कोळी असे असून कित्येक विद्वान् व कित्येक अशिक्षित असे असल्यामुळें वरील प्रमाणांची भारदस्ती तेव्हांच लक्ष्यांत येण्यासारखी आहे.

जगातील इतर धर्मांची अशी गोष्ट नाहीं. उदाहरणार्थ, हिंदु धर्मग्रंथांत पुष्कळ विसंगत गोष्टी आहेत. कुराण जरी एका मनुष्याच्या हातचें आहे, तथापि परस्परविरुद्ध अशा पुष्कळ गोष्टी त्यांत आहेत. मक्केस कुराणाचा जो भाग लिहिला गेला त्याहून मदिनेस

लिहिलेला भाग पुष्कळ प्रकारें वेगळा आहे. पारशी धर्मग्रंथांत तरी अशाच प्रकारचा घोटाळा आढळतो: याहीपेक्षां विसंगतपणा बौद्धधर्मग्रंथांत तर फारच आहे.

२ ख्रिस्ती शास्त्र व सृष्टींतील कृत्यें यांचा मिलाफ असल्यामुळें ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त आहे असें ठरतें.

सृष्टीचा कर्ता ईश्वर आहे. जर ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे, तर ज्या प्रकारें सृष्टीमध्यें ईश्वराचें कर्तृत्व दिसून येतें त्या प्रकारें त्या धर्मामध्यें देखील तें दिसून आलें पाहिजे; म्हणजे सृष्टि व हा ईश्वरोक्त धर्म या दोहोंचा कर्ता एकच असावा अशी आपण अपेक्षा करितों.

सृष्टि व ख्रिस्ती शास्त्र यांचा सुमेळ.

हा विषय फार गहन आहे व अशा गहन विषयाचा विचार करण्याचा कदाचित् तुह्मांस अभ्यास नसेल याकरितां त्याच्या संबंधानें थोडेंच लिहितों.

प्राचीन काळीं, इतर धर्मग्रंथांत सृष्टीविषयीं ज्या कल्पना केलेल्या आहेत त्या फारच अज्ञानमूलक व अयुक्तिक दिसतात. त्या काळच्या विद्वानांच्या यासंबंधी कल्पना देखील तशाच आहेत. उदाहरणार्थ, पारशी लोकांच्या धर्माप्रमाणें जगाचा अर्धा भाग अहरीमान नामक दुष्टात्म्यानें उत्पन्न केला व त्यावर त्याची सत्ता चालू आहे, असें समजत असत. महातत्त्वज्ञानी जो प्लेटो त्याचें देखील असें मत होतें कीं दृश्य आणि स्पर्श्य वस्तु अनिवार्य असल्यामुळें ईश्वराच्यानें त्यांस आपल्या अधीन ठेववत नाहीं, व मनुष्याचा देह पंचमहाभूतात्मक असल्यामुळें तो आत्म्याची खांच व कैदखाना असा आहे. सर्व पाप या देहापासून होतें असेंही त्याचें मत असे. प्लेटोचे अलीकडील जे शिष्य होऊन गेले त्यांनीं यांहीपेक्षां मोठ्या चुका केल्या आहेत.

प्रकृतीविषयीं प्लेटोचें हें मत नोसटिक्स व मानकीयन्स यांस व त्या काळीं प्रबळ असलेल्या इतर पंथांतील लोकांस मान्य असे, व याच समजुतीमुळें शकुन व जादूटोणा यांचें मोठें बंड माजलें. हिंदु धर्मांत व बौद्ध धर्मांत व इतर धर्मांत देहदंडन करण्याचें व विरक्त रहाण्याचें जें मोठें बंड माजलें होतें, व हल्लीं देखील आहे त्यास कारण हेंच मत होय. अशा भोळ्या पण अज्ञानमूलक समजुती अद्याप अर्वाचीन काळांत व सुधारलेल्या देशांत देखील आहेत, व त्या समूळ उपटून टाकणें हें मोठें कठीण काम आहे.

सृष्टीविषयींची ही पोरकट कल्पना जी इतर धर्मांत दिसते तिचा लवलेश देखील बायबलांत नाहीं. पापाचें स्थान देह नव्हे तर आत्मा होय; सृष्टि अनिवार्य नाहीं, ती ईश्वराच्या पूर्ण सत्तेंत आहे; तसेंच ग्रहणें वगैरे सृष्टींतील चमत्कारिक गोष्टी व उत्पात, ज्यांमुळें मूर्तिपूजक भयचकित होतात, त्या पाहून ईश्वरभक्तांस भिण्याचें मुळींच कारण नाहीं, असें बायबलांत स्पष्ट सांगितलें आहे. (इर्मे० १०:२)

सृष्टीसंबंधीं परम विस्मयजनक शास्त्रीय शोध, व सृष्टिरूप ग्रंथाचें कवींचें साहजिक वाचन, ह्मणजे सृष्टीच्या गूढ विषयांचें कवि जें वर्णन करितात तें, हीं सर्व बायबलांत जें

सृष्टिवर्णन केलें आहे त्याशीं परिपूर्ण रीतीनें जुळतात; यांत आश्चर्य नाहीं काय? मला असें वाटतें कीं बायबल हें ईश्वरदत्त शास्त्र आहे हें सिद्ध करण्यास हें एकच प्रमाण पुरे होईल.

३. ईश्वराची पालनकृति (ह्मणजे ज्या रीतीनें तो आपल्या सृष्टीचें पालन करितो) व ख्रिस्ती शास्त्र यांत परस्पर एकवाक्यता असल्यामुळें ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त आहे असें ठरतें.

ख्रिस्ती शास्त्र व ईश्वरी कृति यांतील एकवाक्यता.

हें प्रमाण देखील वरील प्रमाणासारखेंच फार महत्त्वाचें व हांशीलाचें आहे, व कालेंकरून जसजसें तुमचें ज्ञान वाढत जाईल, तसतसें ईश्वरी पालनकृति व ख्रिस्ती शास्त्र यांमध्यें जी परस्पर एकवाक्यता आहे ती तुमच्या अधिक उत्तम प्रकारें लक्ष्यांत येईल. तथापि खालीं लिहिलेल्या विचारांवरून या प्रमाणाचें साधारण स्वरूप तुमचे लक्ष्यांत येण्यासारखें आहे.

तरुण हिंदु लोक ख्रिस्ती धर्माविषयीं अशी एक शंका घेतात कीं जर तो धर्म देवानें सर्व लोकांकरितां योजिला असता तर तो त्यानें प्राचीन कालापासून सर्व लोकांस स्वतः प्रगट केला असता; ह्मणजे ज्याअर्थी धर्माचें ज्ञान दुसऱ्याचे तोंडून ऐकिल्यानें होतें व पुष्कळांस तें ज्ञान नुक्तेंच झालें आहे, त्याअर्थी तो धर्म सार्वत्रिक व्हावा असा देवाचा हेतु मुळींच दिसत नाहीं.

आतां ईश्वरी पालनकृतीवरून या प्रश्नाचा उलगडा कसा होतो तें पहा. आपण एक साधारण उदाहरण घेऊं. लोखंड ही अति उपयोगी धातु सृष्टीमध्यें उत्पन्न केल्यानें देवानें या जगावर मोठे उपकार केले आहेत; परंतु या जगांत असे कित्येक देश आहेत कीं त्यांमध्यें लोखंडाच्या खाणी मुळींच नाहींत. याकरितां त्या देशांतील लोकांनीं इतर देशांतून लोखंड आणून आपला निर्वाह करूं नये काय? क्लोरोफार्म इत्यादि मोलवान् औषधांचा शोध अगदीं अलीकडे लागला; यावरून तीं औषधें पुरातन कालापासून लोकांस माहीत नव्हतीं ह्मणून त्यांचा उपयोग मनुष्यांनीं हल्लीं करावा अशी देवाची इच्छा नाहीं, असें बोलणें शोभेल काय? विद्युल्लतेपासून कोणकोणतीं कामें आश्चर्यकारक रीतीनें करून घेतां येतात हें नुक्तेंच आह्मांस समजलें, याकरितां ह्या गोष्टी नुक्त्याच आह्मांस समजल्या ह्मणून त्यांचा उपयोग आह्मीं करूं नये असें आपण कधीं ह्मणतों काय? किंवा असें ह्मणावें असें मनांत तरी येतें काय? यावरून हें उघड आहे कीं ईश्वराविषयीं जें कांहीं आह्मांस ज्ञान करून घेण्याचें आहे तें तो नेहमीं कोणाच्या हातून न देतां स्वतः देईल हें बोलणें ईश्वरी पालनकृतीला बाध आणितें. मनुष्यांनीं ईश्वराच्या आज्ञा समजून घेऊन तदनुसार वर्तन ठेवावें असें तो इच्छितो, परंतु जर लेंकरांचे आईबाप किंवा पालक त्यांस ईश्वराच्या आज्ञा शिकविणार नाहींत व नीतीचा मार्ग दाखविणार नाहींत तर अर्थात्च लेंकरें अज्ञानी, निष्काळजी, व अधार्मिक अशीं निपजतील. त्याचप्रमाणें सर्व राष्ट्रांस धर्म शिकविण्याचें काम देवानें ख्रिस्ती लोकांकडे सोंपविलें आहे, व जर ते हें काम बजावणार नाहींत तर जगांतील राष्ट्रें अज्ञानी, दुष्ट व नादान अवस्थेंत राहतील. या

देशांत मनुष्याच्या तरणोपायाचें ज्ञान प्रत्यक्ष ईश्वरापासून न होतां तुह्मांस ख्रिस्ती उपदेशकांकडून होत आहे, हें जसें लहानपणीं तुह्मांस खोटें बोलूं नये, चोरी करूं नये याविषयीं ज्ञान प्रत्यक्ष ईश्वरापासून न होतां तुमच्या आईबापांनीं शिकविलें त्यासारखेंच आहे. "मीं चोरी करूं नये असें जर ईश्वराचे मनांतून असतें तर त्यानें प्रत्यक्ष आकाशवाणीनें मला कळविलें असतें" या बोलण्यांत जितका अर्थ आहे तितकाच अर्थ "ख्रीस्तावर विश्वास ठेवण्याचें जर मला अगत्य आहे तर ईश्वरानें प्रत्यक्ष स्वर्गांतून आकाशवाणीनें कळविलें असतें" या बोलण्यांत आहे.

वरील उदाहरणांवरून ईश्वरी पालनकृति व ख्रिस्ती धर्म यांमध्यें कसें साम्य आहे हें तुह्मांस कळून आलेंच असेल. ईश्वरी पालनकृतीचें पुस्तक व ईश्वरदत्त शास्त्र या दोहोंचें वळण एक असल्यामुळें तीं एकाच हातानें लिहिलेलीं दिसतात. आतां ह्या दोहोंमध्यें जें साम्य तें प्रत्येकांतील दुर्बोध गोष्टींमध्यें देखील आहे. उदाहरणार्थ, बापाच्या अन्यायामुळें लेंकरांस या जगांत वारंवार शासन होतें; सृष्टिव्यवहारांत हीच गोष्ट दिसून येते. इतकेंच नाहीं तर आईबापांचे दुर्गुण लेंकरांस लागून त्यांचीही बिघडणूक होते. जर एखादा बाप दुर्व्यसनी असला तर त्याचीं लेंकरें सशक्त निपजत नाहींत; अशा गोष्टींचा उलगडा आमच्यानें पुरतेपणीं करवत नाहीं; परंतु असें आहे खरें व त्यांस ख्रिस्ती शास्त्राचें संमत आहे, येवढें मात्र खातरीनें सांगतां येईल.

दुर्बोध गोष्टींमध्यें देखील साम्य.

ज्या शेवटल्या प्रमाणाची वर फोड केली आहे त्याचा सारांश येणेंप्रमाणें आहे.—ईश्वरी पालनकृति व ख्रिस्ती धर्म यांतील पुष्कळ गोष्टींत विलक्षण प्रकारचें साम्य आहे; व हें साम्य ईश्वराच्या अति गूढ व मनुष्याची मति कुंठित करणाऱ्या अशा गोष्टींत देखील आहे. यामुळें ख्रिस्ती धर्मांतील गूढ गोष्टी त्याच्या सत्यतेस आधारभूत होतात. मनुष्यकृत धर्मांमध्यें मनुष्यानें अशा गोष्टी मुळींच येऊं दिल्या नसत्या. मनुष्याच्या समजुतीस एखादी गोष्ट येत नाहीं ह्मणून ईश्वर आपल्या सत्यास कधीं बाध येऊं देणार नाहीं. तर ज्याप्रमाणें ईश्वरी कृतींतील कित्येक गोष्टी आमच्या बुद्धीच्या पलीकडे असतात, त्याप्रमाणें धर्मांत देखील गहन गोष्टी आढळतील असें पक्कें समजावें. ज्या शास्त्रांत गूढ गोष्टी नाहींत त्यास ईश्वरदत्त शास्त्र असें ह्मणतांच येणार नाहीं.[१]

गूढ गोष्टी ख्रिस्ती शास्त्रांत असल्यामुळें तें खरें आहे असें ठरतें.

आपला मित्र—.

१. परिशिष्ट ४ पहा.

# पत्र आठवें.

## ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म यांची तुलना.

ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म यांची तुलना—स्वभावसिद्ध धर्म कशास ह्मणावें—या संबंधानें जे भ्रामक विचार आहेत त्यांचे निरसनार्थ दोन सूचना—मूळारंभीं ईश्वरानें जें ज्ञान मनुष्यास प्रगट केलें त्यांतून कित्येक गोष्टी घेऊन स्वभावसिद्ध धर्मांच्या घटना झाल्या—स्वभावसिद्ध धर्मांतील सर्व गोष्टी ख्रिस्ती धर्मास कबूल आहेत—ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म या दोहोंत पूर्ण मेळ असून ख्रिस्ती धर्माचें पाऊल फार पुढें सरसावलेलें आहे—याचीं उदाहरणें.

**प्रिय मित्र—,**

ख्रिस्ती धर्माची सत्यता सिद्ध करण्यास जीं अंतर्गत प्रमाणें आहेत त्यांची परीक्षा करण्याचें आपलें काम अजून संपलें नाहीं. या प्रसंगीं त्या धर्माची व स्वभावसिद्ध धर्माची तुलना करण्याचा माझा विचार आहे. स्वभावसिद्ध धर्म कशास ह्मणतात हें पहिल्यानें तुह्मांस सांगितलें पाहिजे. मनुष्यास त्याच्या मनोव्यापारांपासून ईश्वराविषयीं ज्या सत्य गोष्टी कळून येतात त्यांस स्वभावसिद्ध धर्म अशी संज्ञा दिली आहे. मागल्या पत्रांत जें कांहीं मीं लिहिलें त्याचा व याचा मोठा निकट संबंध आहे, तथापि स्वभावसिद्ध धर्म हा विषय अति महत्त्वाचा असल्यामुळें त्यावर एक स्वतंत्र पत्र लिहिणें अगत्याचें आहे असें मला वाटल्यामुळें मीं हें पत्र लिहिलें आहे.

स्वभावसिद्ध धर्म कशास ह्मणावें.

ईश्वरी प्रगटीकरणावांचून मनुष्यास ईश्वराविषयीं बरेंच ज्ञान होऊं शकतें, हें मी कबूल करितों. ज्याला सृष्टिज्ञान ह्मणून ह्मणतात त्यामध्यें जी सृष्टि आपण पहातों तीवरून, ईश्वरीसूत्रावरून, व आपल्या मनाच्या घटनेवरून जें कांहीं ईश्वराविषयीं ज्ञान होतें त्या सर्वांचा समावेश होतो. या तीन साधनांवरून, ईश्वराविषयीं जें कांहीं आह्मांस समजतें त्या सर्वांची जी व्यवस्थित रचना केलेली असते तीस स्वभावसिद्ध धर्म[१] ही संज्ञा दिली आहे.

या संबंधानें साधारण चूक.

या संबंधानें लोकांच्या हातून जी एक मोठी चूक होते, ती तुमच्या हातून होऊं नये ह्मणून मी तिजविषयीं तुह्मांस थोडेंसें सुचवितों. कित्येकांस असें वाटतें कीं सृष्ट पदार्थांच्या अवलोकनापासून ईश्वराविषयीं वहुत सत्यें समजतात व तीं मनुष्यें कबूलही करितात. परंतु हें ह्मणणें सर्वदा खरें नसतें. कारण हत्या करूं नये असें सृष्टिशास्त्रावरून आपणांस कळतें, तथापि लढाया व रक्तपात यांमध्यें खरें सुख मानून घेणारीं अशीं राष्ट्रें पुष्कळ आहेत. एवढेंच केवळ नव्हे तर नरभक्षण करणारींही कांहीं राष्ट्रें आहेत. सृष्टिज्ञानाकडे मनुष्य वारंवार कानाडोळा करून त्या ज्ञानाचा उपयोग करून न घेतां, विरुद्ध रीतीनें वागतो. तर यावरून असें सिद्ध होतें कीं ज्याला आपण स्वभावसिद्ध धर्म

---

[१] या धर्मास इंग्रजी भाषेंत Natural Religion असें म्हणतात. यास सृष्टिजन्य धर्म असेंही कित्येक ह्मणतात.

अशी संज्ञा देतों, त्या धर्मापासून ज्या गोष्टी कळून येतात त्या सर्वांवर विश्वास ठेवणारें व त्याप्रमाणें आचरण करणारें असें एक राष्ट्र होतें असें मानण्यास आपलेजवळ प्रमाण नाहीं. प्राचीनकाळीं जे महातत्त्वज्ञानी होऊन गेले त्यांस, ज्याला आपण स्वभावसिद्ध धर्म अशी संज्ञा देतों त्या धर्माचे सर्व सिद्धांत मुळींच मान्य नव्हते;[१] आणि साधारण लोकांचें मत तर बहुशः त्याहूनही अगदीं वेगळेंच होतें.

आणखी एका गोष्टीकडे आह्मांस लक्ष्य दिलें पाहिजे. ती ही कीं सर्व ख्रिस्ती लोक व ख्रिस्ताला न मानणारे असे कित्येक ग्रंथकार देखील असें मानितात कीं मनुष्याची उत्पत्ति झाल्यावर लवकरच ईश्वरानें त्यास आपले विषयींचें ज्ञान प्रगट केलें, व त्याच ज्ञानाचा कांहीं अंश मूर्त्तिपूजक धर्मांत आढळतो. यावरून असें दिसून येतें कीं मूर्त्तिपूजक राष्ट्रांमध्यें देवाविषयीं जीं कित्येक सत्यें माहीत आहेत तीं त्यांनीं शोधून काढलीं नसून केवळ कोणाच्या सांगण्यावरून किंवा दंतकथांवरून त्यांनीं घेतलीं असावीं.

मूळारंभीं प्रगट केलेलें ईश्वरीज्ञान याकडून स्वभावसिद्धधर्माला कित्येक गोष्टी समजल्या.

या सर्व गोष्टी ध्यानीं आणितां स्वभावसिद्ध धर्म या सदराखालीं सकल सृष्टीच्या व्यवस्थेवरून जें ईश्वरीज्ञान होतें तें गणतां येईल असें दिसून येतें. तथापि हें ज्ञान मनुष्याला साहजिकपणें होईलच असें खातरीनें सांगतां येत नाहीं. जर ईश्वरदत्त धर्माच्या साहाय्यानें स्वभावसिद्ध धर्माचा खुलासा झाला नसता, तर हल्लीं स्वभावसिद्ध धर्माचें जें ज्ञान आह्मांस आहे त्याचा फारच थोडा भाग आमच्या समजण्यांत आला असता. याकरितां स्वभावसिद्धधर्मावर बोलण्याचें मनांत आणिल्यास ज्या सर्व साधनांपासून त्या धर्माचें ज्ञान मनुष्यास झालें आहे त्या सर्वांचा समावेश करावा लागतो. ह्मणजे ख्रिस्ती धर्म व इतर धर्मांपासून माहिती मिळवून स्वभावसिद्धधर्मरूप इमारत बांधण्यास आरंभ करावा लागतो.

या विषयाचे संबंधानें विशेष स्पष्टीकरण करावें असें माझे मनांत आहे, व तें हें कीं स्वभावसिद्धधर्मावर जे ग्रंथ झाले आहेत, त्यांतील सर्व गोष्टी ख्रिस्ती धर्माच्या साहाय्याशिवाय समजण्यांत आल्या आहेत असें हिंदुस्थानांतील पुष्कळ लोकांस वाटतें. खरोखर पहातां अशी गोष्ट मुळींच नाहीं. उदाहरणार्थ, अशी कल्पना करा कीं कोणी मनुष्याला एका अंधारकोठडींत पुष्कळ वेळपर्यंत कोंडून ठेविलें आहे व त्या कोठडींतून पळून जाण्यासाठीं दार कोठें आहे हें त्याला कांहीं माहीत नाहीं. पुढें क्षणभर कोणी त्या खोलींत दिवा घेऊन येतो, व त्याच्या साहाय्यानें खोलीचें दार

हिंदुस्थानांत ह्या संबंधानें होणारी साधारण चूक.

१ सिसरो नामक तत्त्ववेत्ता ह्मणतो : "जे सर्व तत्त्वज्ञानी होऊन गेले त्यांपैकीं बहुतकरून सर्वांनीं ज्या मूर्खपणाच्या गोष्टी लिहून ठेविल्या आहेत त्यांबद्दल मला फार आश्चर्य वाटतें."

कोठें आहे हें त्यास समजतें. दिवा येण्याचे अगोदर जी त्याची स्थिति होती तीहून दिवा आणिल्यावरची त्याची स्थिति अगदीं भिन्न झाली. आतां ह्या वेळेस जर तो ह्मणूं लागला कीं दिवा घेऊन जा, मला त्यापासून तादृश कांहीं उपयोग झाला नाहीं व होणारही नाहीं तर हें त्याचें ह्मणणें केवळ लबाडीचें आहे, असें तुह्मी कबूल कराल. ह्याचप्रमाणें इतर धर्मांतील पुष्कळ लोक ख्रिस्ती धर्माशीं वागतात.

या गोष्टी मनांत वागवून आपण आतां ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्धधर्म या दोहोंची तुलना करूं.

स्वभावसिद्ध धर्मांतील सर्व गोष्टी ख्रिस्ती धर्मास कबूल आहेत.

१. स्वभावसिद्ध धर्मांतील कोणचेंही सत्य किंवा त्या धर्मानें विहित असें कोणचेंही कर्तव्यकर्म असें नाहीं, कीं जें ख्रिस्ती धर्माला मान्य नाहीं.

स्वभावसिद्ध धर्मावर ज्यांनीं ग्रंथ केले आहेत त्यांनीं लिहिलेल्या ईश्वराविषयींच्या मतांपैकीं तुह्मांस जें वाटेल तें मत काढाः मी तुह्मांस असें दाखवितों कीं त्याच मताविषयीं बायबलांत इतक्या उत्तम रीतीनें वर्णन केलें आहे कीं तशा प्रकारचें वर्णन इतर कोणासही करितांच येणार नाहीं. अथवा एखाद्या नीतिशास्त्रवेत्त्यानें मनुष्याच्या कर्तव्यकर्माच्या संबंधानें एखादी लिहिलेली गोष्ट काढाः मी तीच गोष्ट ख्रिस्ती शास्त्रांत स्पष्टपणें लिहिलेली आहे असें दाखविण्यास अगदीं सिद्ध आहें.

आतां जो सिद्धांत मी तुमच्या पुढें मांडला त्या संबंधानें आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्ष्यांत वागविणें जरूर दिसतें, व तीवरून जरी माझ्या सिद्धांताचें कांहींसें रूपांतर झाल्यासारखें दिसेल तथापि कोणत्याही प्रकारचा विरोध येणार नाहीं. ती गोष्ट येणेंप्रमाणेः—ज्यापक्षीं ख्रिस्ती धर्मांत (तो ईश्वरदत्त आहे ह्मणून) सत्य व कर्तव्य यांविषयींची पूर्ण व्यवस्था आहे व इतर सर्व धर्म मनुष्यकृत असल्यामुळें अपुरे आहेत, त्यापक्षीं स्वभावसिद्ध धर्मापेक्षां त्याचें पाऊल पुढें असलेंच पाहिजे. ख्रिस्ती धर्माचे कित्येक सिद्धांत पूर्वीं लोक मान्य करीत नव्हते, तेच सिद्धांत हल्लींचे लोक जे पूर्वींच्या लोकांपेक्षां सुधारले आहेत ते सत्य मानितात असें दाखवितां आल्यास फारच मनोरंजक होईल यांत संशय नाहीं. बायबल जें आहे तेंच आहे व तें तसेंच अनंत कालपर्यंत राहणार, परंतु मानवी ज्ञान वृद्धि पावत आहे व लोक उत्तरोत्तर शहाणे होत चालले आहेत. तर मग ख्रिस्ती धर्मांतील ज्या गोष्टी लोक कांहीं काळापूर्वीं मान्य करीत नसत त्याच आतां हल्लींच्या लोकांस मान्य झाल्याचें आपण पहातों, हें आश्चर्य नव्हे काय? उदाहरणार्थ, स्त्रीविषयीं ख्रिस्ती धर्मांत सांगितलें आहे कीं ती पुरुषाची बटीक नसून त्याची सोबतीण आहे, व ह्मणूनच पुरुषानें अनेक बायका करूं नयेत. ज्या वेळेस ख्रिस्ती धर्माचा पहिल्यानेंच प्रसार झाला त्या वेळेस हें मत लोकांस रास्त

मनुष्यकृत धर्मापेक्षां ख्रिस्ती धर्माचें पाऊल पुढें आहे.

दिसलें नाहीं; परंतु आतां तेंच मत सर्वत्र मान्य आहे. तसेंच मनुष्यानें नम्रता धारण करावी असा बोध बायबलांत केलेला आहे. परंतु प्राचीन कालचे मूर्त्तिपूजक ज्ञानी लोक त्या गुणाचा उपहास करून नम्र मनुष्य नीच व अधम समजून तुच्छ मानीत असत. तथापि अर्वाचीन काळांत सुधारलेल्या राष्ट्रांत नम्र मनुष्याची किती चहा आहे बरें! त्याचप्रमाणें बहुतकरून सर्व बायबलभर लीनता, सहनशीलता, क्षमाशीलता वगैरे गुण मनुष्यांनीं धारण करावेत असें वारंवार उपदेशिलें आहे. प्राचीनकाळच्या मनुष्यांनीं जर हें वर्णन ऐकिलें असतें, तर त्यांनीं हे गुण दासांस शोभतात, परंतु स्वतंत्र मनुष्यांमध्यें ते नसावेत असें लागलेंच ह्मटलें असतें. परंतु आतां त्याच गुणांचें महत्त्व व सर्वोत्कृष्टता सर्व जगांत कबूल केली जात आहे. तर केवळ मानवी बुद्धीपेक्षां ईश्वरदत्त शास्त्राचें पाऊल पुढें आहे हें कोणीही कबूल करील, व त्याबद्दल जीं मनुष्यें शंका घेतात तीं अज्ञान आहेत ह्मणूनच घेतात, हें स्थापण्यास वरील उदाहरणें बस्स आहेत असें मला वाटतें. पुढल्यास ठेंच तर मागला शहाणा या न्यायानें आह्मांस फार सावधगिरीनें वर्त्तलें पाहिजे, नाहींतर ख्रिस्ती धर्माचें ईश्वरी माहात्म्य लक्ष्यांत न आल्यामुळें आह्मी घसरलों असा निर्णय आमचीं लेंकरें आह्मांविषयीं करतील.

अज्ञान हें शंकांचे उत्पत्तीस वारंवार कारण होतें.

ख्रिस्ती धर्मांतील कित्येक सिद्धांत थोडक्यांत सांगून ते मनुष्याच्या बुद्धीनें खरे ठरतात किंवा नाहीं हें आतां आपण पाहूं.

ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म यांतील एकवाक्यतेची सीमा.

१. स्वभावसिद्ध धर्मावर जे जगन्मान्य ग्रंथ झाले आहेत त्यांमध्यें खालीं लिहिलेले गुण ईश्वराचे ठायीं आहेत असें प्रतिपादन केलेलें आढळतें:—

अनाद्यंतत्व, स्वयंजातत्व, अनधीनता, एकता, अपरिमितता, निर्विकार, निराकार, सर्वशक्ति, विश्वव्यापकता, सर्वज्ञता, पवित्रता, वात्सल्य, आणि सत्यता.

स्वभावसिद्ध धर्मांत पुढें लिहिलेल्या सिद्धांतांचेंही प्रतिपादन केलें आहे:—

२. परमेश्वरानें सर्व वस्तु उत्पन्न केल्या. तो सर्व वस्तूंचा संरक्षक आहे. त्याचा अधिकार सर्वांवर चालतो.

३. जगांत पाप आहे, तथापि देव त्याचा उत्पन्नकर्त्ता नाहीं. तो पापाचा द्वेष करितो. तो पापाबद्दल शासन करितो.

४. मनुष्य हा देवानें उत्पन्न केलेला प्राणी असून सर्व कल्याणाच्या वस्तूंसाठीं तो त्यावरच अवलंबून आहे. ईश्वराची सेवा करणें हा त्याचा परम धर्म आहे. मनुष्य सदाचारसंपन्न असा प्राणी आहे. तो देवाच्या न्यायाधिकारांतील एक रयत आहे. त्याची योजना दुसऱ्या

एका अस्तित्वासाठीं केली आहे. त्या अस्तित्वामध्यें त्यास त्याच्या कर्मानुसार सुख किंवा दुःख प्राप्त होईल. मनुष्य पापी आहे ह्मणून तो पुष्कळ कारणांनीं दुःखी आहे व ह्याच कारणानें मनुष्य आणि देव ह्यांच्यांमध्यें महदंतर राहिलें आहे.

स्वभावसिद्ध धर्माचे हे सिद्धांत बायबलास पूर्ण रीतीनें मान्य आहेत. वरील चार मुख्य सिद्धांतांविषयीं ख्रिस्ती शास्त्रांत येणेंप्रमाणें लिहिलेलें आहेः—

१ देवाचे गुणांविषयींः

पर्वत उत्पन्न झाल्यापूर्वीं आणि त्वां पृथ्वी व भूमि रचिल्यापूर्वीं अनादिकालापासून अनंतकालपर्यंत तूं देव आहेस. (गीत ९०:२.)

देव मोश्याला बोलला, **मी जो आहें तोच आहें;** आणखी त्यानें सांगितलें, तूं इस्त्राएलाच्या संतानांस असें सांग कीं, **मी आहें** असें ज्याचें नाम त्यानें मला तुह्मांकडे पाठविलें आहे. (निर्गम ३:१४.) [**यहोवा** ह्मणून जें नांव ख्रिस्ती शास्त्रांत परमेश्वरास दिलें आहे, त्याचा अर्थ परमेश्वर सर्व अस्तित्वाचा उगम आहे असा आहे.]

देवाला कांहीं उणें आहे ह्मणून मनुष्यांच्या हातांनीं त्याची पूजा घडती असें नाहीं, कांकीं, जीवन व प्राण व अवघें तोच सर्वांस देतो. (प्रे०कृ० १७:२५.) त्यापासून, त्याकडून, आणि त्याकरितां सर्व आहेत. (रोम. ११:३६.)

हे इस्त्राएला, ऐक, आमचा देव परमेश्वर एकच परमेश्वर आहे. (अनुवाद ६:४.)

आकाशें व आकाशांचीं आकाशें तुला पुरत नाहींत. (१ राजे ८:२७.) तुझ्यानें शोध करून देवाला जाणवेल काय? (ईयोब ११:७.)

मी परमेश्वर आहें, माझें मन फिरत नाहीं. (मलाखी ३:६.) प्रकाशांच्या बापाला पालट नाहीं व फिरण्याची छाया नाहीं. (याकोब १:१७.)

देव आत्मा आहे, आणि जे त्याला भजतात त्यांनीं आत्म्यानें व खरेपणानें त्याचें भजन केलें पाहिजे. (योहान ४:२४.)

कोणतीही गोष्ट परमेश्वराला असाध्य आहे काय? (उत्पत्ति १८:१४.) देवाच्यानें सर्व होतें. (मात्थी १९:२६.)

मी आकाशांत व पृथ्वींत व्याप्त नाहीं काय? असें परमेश्वर ह्मणतो. (इर्मया २३:२४.) पहा आकाशें व आकाशांचीं आकाशें तुला पुरत नाहींत. (१ राजे ८:२७.)

त्याची (देवाची) बुद्धि अपरिमित आहे. (गीत १४७:५.) देवाचें ज्ञान व विद्या यांची संपत्ति किती अगाध! (रोम. ११:३३.)

पवित्र, पवित्र, पवित्र, सैन्यांचा परमेश्वर आहे. (यशाया ६:३.)

मी परमेश्वर आहें, मी पृथ्वीवर दया, नीति व न्याय करितों; कांकीं यांत मी संतोषतों, असें परमेश्वर ह्मणतो. (इर्मया ९:२४.)

परमेश्वर सर्वांस चांगला आहे, त्याची करुणा त्याच्या सर्व कृत्यांवर आहे. (गीत १४५.)

तुझे (देवाचे) पुरातन संकल्प विश्वासू व सत्य आहेत. (यशाया २५:१.)

२. देव जगाचा उत्पन्नकर्ता, रक्षक, व शास्ता आहे:

प्रारंभीं देवानें आकाश व पृथ्वी हीं उत्पन्न केलीं. (उत्पत्ति १:१.)

सर्वांचीं नेत्रें तुजकडे (देवाकडे) लागतात, आणि सुसमयीं त्यांस त्यांचें भक्ष्य देतोस. (गीत १४५.१५.)

तूं (देव) आपला हात उघडून सर्व जीवजंतूंची इच्छा तृप्त करितोस. (गीत १४५:१६.)

त्याचें (देवाचें) राज्य सर्वांवर चालतें. (गीत १०३:१९.)

३. मनुष्य पापी आहे:

सगळें जग दुष्टाईत पडलें आहे. (१ योहान ५:१९.)

कोणी परीक्षेंत पडला असतां, मी देवाकडून परीक्षेंत पडलों असें त्यानें ह्मणूं नये; कां तर वाईट गोष्टींनीं देवाची परीक्षा होत नाहीं, आणि तो कोणालाही परीक्षेंत पाडीत नाहीं. (याकोब १:१३.)

दुष्टांचा मार्ग परमेश्वराला वीट असा आहे. (नीति १५:९.)

युगानुयुग दुष्कर्मी दंडावांचून असणार नाहीं. (नीति ११:२१.)

४ मनुष्याचा देवाशीं संबंध :

आह्मी त्याजमध्यें (देवामध्यें) जगतों व वागतों व आहों. (प्रे० कृ० १७:२८.)

तुह्मी खातां किंवा पितां किंवा कांहीं करितां, तर सर्व गोष्टी देवाच्या गौरवासाठीं करा. (१ करिंथ. १०:३१.)

आपणांतील प्रत्येक आपला हिशोब देवाला देईल. (रोम. १४:१२.)

ते (दुष्ट) सर्व काळच्या शासनांत जातील, पण नीतिमान् सर्वकाळच्या जीवनांत जातील. (मात्थी २५:४६.)

सर्वांनीं पाप केलें आहे आणि ते देवाच्या महिम्याविषयीं उणे आहेत. (रोम. ३:२३.)

जशा ठिणग्या सहज वर उडतात तसा मनुष्य कष्टासाठीं जन्मतो. (ईयोब ५:७.)

आह्मीही जन्मस्वभावानें दुसऱ्यांसारखींच क्रोधाचीं लेंकरें होतों. (एफ. २:३.)

याप्रमाणें ज्या मतांविषयीं ख्रिस्ती धर्माचें व स्वभावसिद्ध धर्माचें ऐक्य आहे त्यांचा उपसंहार केला.

या मतांच्या पुष्टीकरणार्थ निरनिराळ्या राष्ट्रांतल्या व धर्मांतल्या लोकांचीं अनुकूल मतें सांपडतात. वर दर्शविलेल्या गोष्टींशीं ख्रिस्ती धर्मांतील गोष्टींचें जितकें (सर्वांशीं) साम्य आहे, तितकें कोणत्याही अन्य धर्मांतील गोष्टींशीं नाहीं; व बहुतेक राष्ट्रांच्या मतांगीकारमालिकेंत त्यांस बाधक अशा गोष्टी मिसळलेल्या सांपडतात; तथापि वर लिहिलेल्या गोष्टी स्वभावसिद्ध धर्माच्या आहेत असें ह्मणण्यास कांहीं बाध नाहीं. कारण जरी त्या स्वभावसिद्ध धर्मानें शोधून काढिल्या नसल्या तथापि मनुष्याच्या बुद्धीस त्या मान्य करणें प्राप्त होतें.

ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म यांमध्यें जें ऐक्य आहे तें आतांपर्यंत आपण पाहिलें. त्यांमध्यें फरक ह्मणून इतकाच कीं स्वभावसिद्ध धर्मांतल्या गोष्टी ख्रिस्ती धर्मांत इतक्या कांहीं उत्तम रीतीनें व्यक्त केल्या आहेत कीं कोणाही तत्त्वज्ञान्याकडून त्यांस इतकें गांभीर्य व अधिकार आणवला नसता.

वर जे विचार प्रगट केले त्यांवरून दुसरा एक महत्त्वाचा विचार पुढें येतो. तो असा :

२. ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म यांमध्यें विपर्यास नाहीं एवढेंच केवळ नव्हे, तर स्वभावसिद्ध धर्माला मुळींच अवगत नाहीं असें मोठें सत्याचें भांडार ख्रिस्ती धर्मांत आहे.

असें भांडार मिळण्याची पहिल्यापासून अपेक्षा होती; कारण ज्याला आपण ईश्वरी प्रगटीकरण ह्मणतों त्यांत मनुष्याला ज्या सत्यांचा स्वबुद्धीनें शोध लागत नाहीं तीं सत्यें असलींच पाहिजेत. अशीं सत्यें ख्रिस्ती धर्मांत नसतीं तर मग त्या धर्माचें मुळींच अगत्य नसतें.

ईश्वरदत्त शास्त्रांत स्वभावसिद्ध धर्मास ज्या गोष्टी मुळींच माहीत नाहींत, अशांचा समावेश असलाच पाहिजे.

आतां ही एक विशेष गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं ज्या विशेष गोष्टी ख्रिस्ती धर्माकडून उघडकीस आल्या आहेत त्यांचें व स्वभावसिद्ध धर्माचें साम्य असलेंच पाहिजे. हें चांगलेंसें लक्ष्यांत येण्यास आपण एक दृष्टांत घेऊं. एखादी इमारत बांधण्यास आरंभ करून ती मध्येंच अपुरी अशी सोडून द्यावी तशी स्वभावसिद्ध धर्माची अवस्था आहे. त्या इमारतीकडे पहातां तिचा पाया फार खोल व विस्तीर्ण घातलेला दृष्टीस पडतो. तसेंच, तिच्या भिंती फार जाड असून कित्येक ठिकाणीं बऱ्याच उंच गेलेल्या नजरेस येतात. जें कांहीं पहावें तें मोठ्या विस्तीर्ण परिमाणानें आरंभिलें आहे असें दृष्टीस पडतें. परंतु त्या इमारतीचा नकाशा आपल्यापाशीं नाहीं, व तिचे कित्येक भाग कोणत्या कारणास्तव रचिले आहेत हेंही आपणांस समजत नाहीं. ही अपुरी इमारत एक मोठें कूटच आहे, व जरी तिचा नकाशा आपल्या हातीं लागला तथापि ज्या अवाढव्य परिमाणानें ती बांधण्यास आरंभ केला आहे त्या परिमाणानें ती पुरी करण्यास आह्मांमध्यें शक्ति नाहीं. तथापि अशी ही स्वभाव सिद्धधर्माची अपुरी इमारत ख्रिस्ती धर्माकडून फारच उत्तम प्रकारें पूर्ण केली जाते. तिच्या अवजड पायावर ख्रिस्ती धर्माकडून अत्युत्कृष्ट इमारत उभारली जाते. ख्रिस्ती धर्म स्वभावसिद्ध धर्माच्या इमारतींतील प्रत्येक अपुरी भिंत व दगड या सर्वांचा त्या इमारतींत समावेश करून मूळारंभीं जे भाग आपले मुळींच लक्ष्यांत येत नव्हते त्यांचे परस्पर संबंध दाखवून ते कोणत्या कारणामुळें योजिले या सर्वांची फोड उत्तम रीतीनें करितो. आतां हा दृष्टांत सोडून देऊन आपण विचार केला असतां असें कळतें कीं सृष्टीमध्यें पुष्कळ गोष्टी आमच्या समजण्यांत येत नाहींत अशा आहेत, व ज्या बहुत गोष्टी स्वभावसिद्ध धर्माकडून सुचविल्या जातात परंतु ज्यांचा उलगडा त्याकडून होत नाहीं त्यांचें स्पष्टीकरण ख्रिस्ती धर्माकडून होतें हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल. ईश्वर पापाचा द्वेष करितो व मनुष्य पापी आहे या गोष्टी खऱ्या आहेत असें स्वभावसिद्ध धर्मांत सांगितलें आहे. शिवाय, त्यामध्यें असा एक प्रश्न आहे कीं "पवित्र जो देव तो पापाची क्षमा करूं शकेल काय? आणि जर करूं शकतो तर कोणत्या रीतीनें करितो?" हा प्रश्न पाहतांच तो फारच अगत्याचा आहे असें आपणांस वाटतें. स्वभावसिद्ध धर्मावरून हा प्रश्न सुचला हें खरें, परंतु त्याचा उलगडा स्वभावसिद्ध धर्मा-

या नवीन गोष्टी स्वभावसिद्ध धर्माच्या विरुद्ध नसाव्या.

कडून होत नसून तो ख्रिस्ती धर्माकडूनच झालेला आहे. तेव्हां दोन्ही धर्मांच्या तत्त्वांस कोणत्याही प्रकारें बाध येत नसून, तें उत्तर अगदीं योग्य आहे अशी साक्ष ज्यांनीं त्या धर्मांत सांगितलेल्या उपायाचें अवलंबन केलें आहे त्यांपासून मिळते. ख्रीस्ताकडून तारण आहे हें ख्रिस्ती धर्माचें मुख्य तत्त्व आहे. ख्रिस्ती धर्म हा प्राधान्येंकरून निश्चयात्मक असें "शुभवर्त्तमान" होय, ह्मणजे देवापासून आलेला दयेचा संदेश होय. "देव ख्रीस्ताकडून आपणाशीं जगाचा समेट करीत आहे." (२ करिंथ. ५:१९.) ख्रिस्ती धर्माचें मुख्य सांगणें हेंच आहे कीं देव पापाचा द्वेष करीत असून तो पाप्यांस पापाच्या दंडापासून व भ्रष्टतेपासून मुक्त करावें असें इच्छितो. पाप्याचें तारण कोणत्या रीतीनें होतें हें बायबलावरून समजण्यांत येतें. अनंतकालिक नाशापासून आमचा बचाव होण्यासाठीं देवाचा पुत्र अवतरला असें त्या ग्रंथांत स्पष्ट सांगितलें आहे.[१] देवाच्या पवित्र न्यायित्वाविषयीं तो धर्म मेघनादाप्रमाणें गर्जून सांगत असतां देवाच्या प्रीतीविषयीं तो करुण शब्दानें बोलतो. आह्मांस बोधामृत पाजावें, आमच्या पापांकरितां मरावें, आमच्या आत्म्यांस पापांपासून धुऊन स्वच्छ करावें व आह्मीं अमरत्व पावून सर्वकाल धन्य व्हावें ह्मणून देवाचा पुत्र स्वर्गांतून भूलोकीं आला असें तो सांगतो. मानवासाठीं ह्या भूतलावर त्या दिव्य पुरुषानें आपला जन्म दुःखांत घालविला व अवाच्य यातना सोसून आपला प्राण दिला. आतां तारण सर्वांस देऊं केलें आहे व "विश्वास ठेवा व तारण पावा" असें सर्वांस ईश्वराचें आमंत्रण व आज्ञा आहे. पापांची क्षमा व पवित्रता या दोन गोष्टी मनुष्यास प्राप्त झाल्यानें तो ईश्वराची सेवा आनंदानें करूं शकतो, व ह्या अमोल गोष्टी मिळण्याचा मार्ग ख्रिस्ती धर्मांतच सांपडतो.

ह्या सिद्धांतांविषयीं पहिली आश्चर्याची गोष्ट हीच आहे कीं त्यांकडून सृष्टिजन्य धर्मांतील कोणत्याही सत्यास विरोध येत नाहीं. हे सिद्धांत त्याच्या विरुद्ध नाहींत तर त्याच्या पलीकडे आहेत. स्वभावसिद्ध धर्माच्या पायावर त्यांची उभारणी केली असतां तेणेंकरून त्या धर्माच्या इमारतीस कोणत्याही प्रकारें विरूपता तर येत नाहींच, उलटें त्या इमारतीच्या भक्कम पायाची खोली व रुंदी हीं ज्या परिमाणानें आहेत त्याच परिमाणानें वरील इमारत उभारली जाऊन ती कळसापर्यंत पोंचविली आहे.

ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्मांत असे सिद्धांत मुळींच नाहींत ही दुसरी विशेष गोष्ट होय. दुसऱ्या कोणत्याही धर्मांत अशा प्रकारचे सिद्धांत तर नाहींतच. इतर धर्मांनीं आपला पाया स्वभावसिद्ध धर्मावरच रचिला आहे हें जरी खरें आहे तथापि त्यांनीं जें कांहीं त्याला नवें जोडलें आहे त्याकडून त्या इमारतीची शोभा सर्व जाऊन ती आतां ढांसळून पडेल असें वाटतें. उदाहरणार्थ, सर्व धर्मांत ईश्वराचें अस्तित्व कबूल केलें आहे; परंतु याच सिद्धांतावरून कित्येकांनीं बहुदेवमत प्रतिपादन केलें, कित्येकांनीं अद्वैतमत

१ येशूनें स्वतः ह्मटलें आहे कीं "मनुष्याचा पुत्र हरपलेलें त्यास शोधायास व तारायास आला आहे."

व किल्येकांनीं मूर्तिपूजा स्थापन केली; किल्येक ईश्वराचे ठायीं नीतिविशिष्ट गुण नाहींत असें ह्मणतात; किल्येकांस ईश्वराची सत्ता व पालनकृति मान्य नाहीं; व किल्येक जरी पापक्षमेची आवश्यकता कबूल करितात, तथापि मानवी स्वभावाची शुद्धि व्हावी याचें मोठेंसें अगत्य नाहीं असें दर्शवितात.

स्वभावसिद्ध धर्म व ख्रिस्ती धर्म या दोहोंतील नीतिविषयक सिद्धांतांविषयींचें साम्य.

ज्या प्रकारें आपण स्वभावसिद्ध धर्म व ख्रिस्ती धर्म यांतील सिद्धांतांची तुलना करून त्यांचें साम्य असल्याबद्दलची खातरी करून घेतली त्याच प्रकारें त्या दोहोंतील नीतिविषयींचें साम्य आहे किंवा नाहीं ह्याजबद्दलची खातरी करून घेतां येते किंवा नाहीं हें पाहूं.

नीतिशास्त्राचीं पुष्कळ महत्त्वाचीं तत्त्वें स्वभावसिद्ध धर्मावरून उपलब्ध होतात. जसें—परमेश्वर आमचा उत्पन्नकर्ता, रक्षणकर्ता, व कल्याणकर्ता, असें जाणून त्यास आपण मान द्यावा. तसेंच, आपण मनुष्यमात्राशीं न्यायानें व ममतेनें वागावें, अंतःकरणाची शुद्धता व सत्यता बाळगणें हें आमचें कर्तव्य आहे, एवढेंच केवळ नव्हे, तर तसें केल्यानें आपणांस सुखप्राप्ति होईल. आतां ह्याच गोष्टी ख्रिस्ती धर्मांत अधिक निश्चयात्मक व इतक्या स्पष्ट व सोप्या रीतीनें सांगितल्या आहेत कीं त्या मनुष्याच्या लक्ष्यांत तेव्हांच भरतात व त्यास उत्तम रीतीनें समजतात. ख्रिस्ती धर्मांत मनुष्यमात्राचें कर्तव्य एका शब्दांत आणून ठेविलें आहे. तो शब्द "प्रीति" ह्मणजे देवावर व मनुष्यावर प्रीति करणें. त्या धर्माची आह्मांस अशी आज्ञा आहे कीं "प्रभु जो देव त्यावर आपल्या सर्व अंतःकरणानें, व आपल्या सर्व जीवानें, व आपल्या सर्व मनानें, प्रीति कर, व जशी आपणावर तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर."[१] आपण सर्व मनुष्यमात्रावर प्रीति करावी व प्रसंगोपात्त सर्वांचें कल्याण करीत असावें, असें ख्रिस्ती धर्माचें सांगणें आहे. ख्रिस्ती धर्म आपल्या अंतःकरणांतील विचार व त्या विचारान्वयें घडलेलें कृत्य ह्यांची विचक्षणा करून असें ठरवितो, कीं अंतःकरणांतील दुष्ट इच्छा किंवा विचार हीं त्यापासून घडलेल्या कृत्याइतकींच वाईट आहेत. ह्मणजे अंतःकरणांत आलेले दुष्ट विचार किंवा इच्छा तदनुरूप दुष्ट कृत्य जरी घडून आलें नाहीं तथापि दुष्ट कृत्य घडून आलें असतां जितके ते विचार किंवा इच्छा वाईट होत्या तितक्याच दुष्ट कृत्य न घडतां आहेत. ख्रिस्ती धर्माप्रमाणें "जो आपल्या भावाचा द्वेष करितो तो खुनी मनुष्य आहे." बाहेरून धर्माचा मोठा आव घालून जर अंतर्यामीं पवित्रता नाहीं तर तें सर्व ढोंग आहे असें ख्रिस्ती धर्माचें सांगणें आहे.

ग्रीस व रोम येथील तत्त्वज्ञान्यांनीं मनुष्याचे सात्विक गुण मुळींच जमेस धरले नाहींत,

---

[१] मात्थी २२ : ३७–३९.

तथापि बायबलांत ते अति महत्त्वाचे असे गणिले गेले आहेत. मनुष्यांनीं सौम्यतेनें, शांतीनें, आत्मसंयमन करून, लीन भावानें, गरिबीनें, चांगुलपणानें, व सत्यतेनें वर्तावें ह्मणून त्या धर्मग्रंथांत त्रिवार सांगितलें आहे.[१] आमचे शत्रूंवर आह्मीं प्रीति करावी व त्यांच्या हितार्थ प्रार्थना करावी असें त्या धर्माचें सांगणें आहे.[२]

ख्रिस्ती धर्मांत सांगितलेली नीति सर्वशः पूर्ण आहे. त्या धर्मांत अति लहानसें पाप-कर्म करण्यास सूट मुळींच दिलेली नाहीं. चांगला हेतु साधण्याकरितां पाप केल्यास कांहीं हरकत नाहीं असें पुष्कळांस वाटतें. उदाहरणार्थ, कित्येक प्रसंगीं लबाडी केल्यास चिंता नाहीं असा पुष्कळांचा समज असतो. तथापि चांगल्या हेतूस्तव जरी पापकर्म केलें तरी आह्मी ईश्वरासमक्ष दोषी ठरतों, असें ख्रिस्ती धर्माचें सांगणें आहे. तर ख्रिस्ती धर्म पूर्ण पवित्र नाहीं असा आक्षेप कोणाच्यानेंही त्यावर करववत नाहीं; उलट हा धर्म पराकाष्ठेचा पवित्र असल्यामुळें मनुष्याच्या उपयोगाचा नाहीं असा आक्षेप ज्यांची या धर्मावर श्रद्धा नाहीं ते घेत असतात. तथापि या धर्माच्या पराकाष्ठेच्या पवित्रतेवरून तो मनुष्यकृत नाहीं, तर ईश्वरदत्त आहे असें ठरतें. पूर्ण पवित्र जो ईश्वर तो अंशतः पवित्र असा धर्म मानवांस लावून देईल हें मुळींच संभवत नाहीं. कारण मनुष्यानें जरी पुष्कळ शोधांतीं एखादें तत्त्व शोधून काढिलें तरी तें अपूर्ण किंवा सदोष असेंच असणार; कारण तोच मुळीं अपूर्ण व सदोष आहे.

याप्रमाणें ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म या दोहोंमध्यें पूर्ण मेळ असून ख्रिस्ती धर्माचें पाऊल किती पुढें सरसावलेलें आहे हें आपण आतां पाहिलें. जशा दोन समान्तर रेषा असतात व त्यांतील एक दुसरीपेक्षां लांबीनें अधिक असावी त्या प्रकारें हे दोन धर्म आहेत; किंवा वर निर्दिष्ट केलेल्या उदाहरणाप्रमाणें जो पाया स्वभावसिद्ध धर्मानें घातलेला आहे त्याच्या भव्यपणास अनुसरून त्यावर सुंदर व शोभायमान रचिलेली इमारत ख्रिस्ती धर्म आहे. कळावें.

आपला मित्र—.

---

१ "आरिस्टाटल् नामक तत्त्ववेत्त्यानें जो सद्गुणांचा पट ह्मणून केला आहे त्यामध्यें त्यानें नम्रता, प्रीति, पातिव्रत्य, आत्मार्पण, वगैरे ज्या गुणांस ख्रिस्ती धर्मांत वर्चस्व मिळालें आहे त्यांस मुळींच जमेस धरिलें नाहीं." "नीतिशास्त्र व धर्म यांस त्यानें (आरिस्टाटल्नें) विभक्त केल्यामुळें पवित्रता ह्या गुणाविषयीं विचार करण्याचें त्यानें अजीबात गाळून टाकिलें असें सर अलेक्झांडर ग्रांट् साहेब ह्मणतात."

प्लेटो नामक तत्त्ववेत्त्यानें केवळ चार मुख्य सद्गुण सांगितले आहेत—धैर्य, परिमितपणा, न्याय, आणि शहाणपण.

२ मात्थी ५ : ४४.

# पत्र नववें.

## ख्रिस्ती धर्मांतील विशेष गोष्टी.

ख्रिस्ती धर्मांतील विशेष गोष्टी—देवत्रयैकत्व—पाप व पापविमोचन—मरणोत्तर स्थिति व पुनरुत्थान—कल्पना व भाषा यांची अपूर्वता—ख्रिस्ती धर्ममतांचा सुमेळ—ख्रिस्ती धर्मनीति अपूर्व आहे—ख्रिस्तवर्तन—बायूबलांत धर्ममतें फार अपूर्व रीतीनें विदित केलीं असून तो प्रकार पूर्ण सुयुक्तिक आहे—ख्रिस्ती धर्म व्यवहाराला धरून असल्यामुळें त्यावर त्याचा दाब.

**प्रिय मित्र—,**

ख्रिस्ती धर्मांतील विशेष गोष्टी.

ज्या गोष्टीचें मीं मागल्या पत्रांत विवेचन केलें ती फार महत्त्वाची असल्यामुळें, तिचा पुनः विचार केल्याशिवाय ती इतक्यांतच माझ्यानें सोडून देववत नाहीं. या पत्रांत, ज्या गोष्टींमुळें ख्रिस्ती धर्मास स्वभावसिद्ध धर्माहून मुख्यत्वेंकरून प्राधान्य आलें आहे, त्यांविषयीं विचार करावयाचा आहे. ख्रिस्ती धर्मावर ज्यांचा विश्वास नाहीं ते जरी सामान्यतः त्या धर्मांतील अशाच गोष्टींवर हल्ला करीत असतात, तथापि त्यांमुळेंच ख्रिस्ती धर्मास विशेष प्रकारें महत्त्व आलें आहे असें ख्रिस्ती लोक समजतात. या पत्रांत ख्रिस्ती धर्मांतील ज्या मुद्यांवर ख्रिस्ती धर्मावर विश्वास न ठेवणारे हल्ला करितात त्या मुद्यांच्या समर्थनार्थच केवळ विवेचन करण्याचा माझा हेतु नाहीं, तर ते मुद्दे ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेसही पुराव्यादाखल मी आपल्या पुढें मांडणार आहें. या असाधारण गोष्टी ख्रिस्ती धर्मास प्रतिकूल आहेत असें नास्तिकांचें मत आहे. तथापि त्या तशा नसून त्या धर्माची सत्यता व्यक्त करण्याचे कामीं फार उपयुक्त आहेत हें दाखविण्याची माझी उमेद आहे.

ख्रिस्ती धर्मांतील कित्येक महत्त्वाचीं तत्त्वें स्वभावसिद्ध धर्मास आजपर्यंत माहीत नाहींत तीं येणेंप्रमाणें:—

देवत्रयैकत्वाविषयींचें मत.

१. देवत्रयैकत्व ह्मणजे देवपणांत तीन व्यक्ति आहेत. हा सिद्धांत ख्रिस्ती शास्त्रांत केवळ काल्पनिक रीतीनें दिलेला नाहीं, तर या सिद्धांताचा मनुष्यमात्राचें सुख व कर्तव्य यांशीं अति निकट संबंध आहे, या प्रकारें तो वर्णिलेला आहे. कारण बायूबल ह्मणतें कीं प्रतापशाली असें जें देवत्रयैकत्व त्यांतील मुख्य ईश्वरी व्यक्ति जिला **पिता** अशी संज्ञा दिलेली आहे तिनें जगावर एवढी मोठी दया केली, कीं तिनें आपला प्रिय पुत्र आह्मांमध्यें राहून आह्मांस सन्मार्गास लावण्यास व आमच्या पापाबद्दल आमच्याऐवजीं बळी पडण्यास दिला.

प्रतापशाली असें जें देवत्रयैकत्व त्यांतील द्वितीय ईश्वरी व्यक्ति जिला **देवाचा पुत्र** अथवा **देवाचा शब्द** अशी संज्ञा दिलेली आहे तिनें आह्मांवर प्रीति करून आपलें सर्वस्व आह्मांकरितां अर्पण केलें. शेवटीं, देवपुत्र मानवदेह धारण करून आमच्या पापांच्या क्षालनार्थ आपण बळी पडला; आणि "त्याचें रक्त आह्मांस सर्व पापापासून शुद्ध करितें." तसेंच प्रतापशाली असें जें देवत्रयैकत्व त्यांतील तृतीय ईश्वरी व्यक्ति जिला **पवित्र आत्मा** अशी संज्ञा दिलेली आहे ती भक्तांचीं अंतःकरणें शुद्ध करून त्यांस नीतिविशिष्ट असें जें ईश्वरी रूप त्याशीं सदृश करिते.

वरील सिद्धांत जरी ख्रिस्ती शास्त्रांत स्पष्टीकरण न करितां सांगितला आहे तथापि तें शास्त्र निवळ एकेश्वरवादी असून त्यास बहुदेवमत हें अतिशय त्याज्य आहे, असें स्पष्ट दिसून येतें. कुराणांत जी कांहीं ईश्वराचे ठायीं उदासीनता आरोपित केलेली आहे तिचा गंधही बायबलांत नसून "आह्मी ईश्वरामध्यें जगतों, वागतों व आहों" असें त्याविषयीं लिहिलेलें आढळतें. तसेंच, अद्वैतवाद बायबलांत मुळींच नसून सृष्टीला तिच्या उत्पन्नकर्त्यापेक्षां प्रमुखत्व देण्याचा प्रयत्न त्या शास्त्रांत बिलकुल केलेला नाहीं.

पाप.

२. ख्रिस्ती शास्त्रांतील दुसरा मोठा सिद्धांत पापांविषयींचा होय. मानवजाति ह्मटली ह्मणजे पतित, ईश्वरपराङ्मुख, पापिष्ठ, दुःखी, व पापांमुळें परमेश्वराच्या कोपास यथान्याय पात्र झालेली अशी आहे. मनुष्याचे प्रकृतीस अपाय झालेला असून त्याची बुद्धि, त्याची इच्छा व मनोविकार हीं सर्व अत्यंत बिघडलेलीं आहेत. पाप हें अत्यंत भयंकर अरिष्ट असून तें अति ओंगळ, निरंतर द्वेष्य, व अत्यंत घातुक असें आहे.

ईश्वर.

३. ईश्वर अत्यंत पवित्र असून "प्रकाश"[१] आहे. त्याला पाप खपत नसून "तो भस्म करणारा अग्नि आहे." तो पापाचा निरंतर द्वेष करितो, व पापाबद्दल शासन करणें हें त्यास अवश्यमेव आहे.

उद्धारमार्ग.

असें असूनही पापी मनुष्याचा नाश व्हावा अशी परमेश्वराची इच्छा नाहीं; कारण तो "प्रीति"[२] आहे. मनुष्याचें तारण व्हावें ह्मणजे त्यास त्याचे पापांची क्षमा होऊन त्याची अंतःशुद्धि व्हावी व त्यानें सुखी व्हावें अशी परमेश्वराची इच्छा आहे.

पण देव जर न्यायी आहे तर त्यानें पाप्याचा उद्धार काय ह्मणून करावा? हा एक मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे; बरें, त्यानें पापी मनुष्यावर जर दया केली तर पाप्यास शासन न होतां त्याच्या न्यायास कलंक लागतो. या प्रश्नाचा उलगडा करण्यास इतर सर्व धर्मांनीं हात टेंकले आहेत असें दिसतें. परंतु "देवपुत्रानें मनुष्य देह धारण करून पाप्यांकरितां प्रायश्चित्त केलें" ही अद्भुत गोष्ट ख्रिस्ती धर्मानें सांगून वरील प्रश्नाचा

---

[१] योहान १:५; [२] योहान ४:८.

उत्तम रीतीनें खुलासा केला आहे. "त्यानें (ख्रीस्तानें) मरणापर्यंत मान्य होऊन आपणाला नीच केलें."[१] हेंच ख्रिस्ती धर्मांतील अत्यंत महत्त्वाचें तत्त्व होय. पाप हें महाघातक असून त्याबद्दल जबर शासन पाहिजे ही एक गोष्ट व देव परम दयाळू व कृपावंत आहे ही दुसरी गोष्ट; या दोन अति महत्त्वाच्या गोष्टी या वरील तत्त्वापासून इतक्या उत्कृष्ट रीतीनें निष्पन्न झाल्या आहेत कीं असें तत्त्व अन्यत्र सांपडणेंच कठीण. पापाचें स्वरूप व त्याचें फल हीं देवाच्या पुत्राच्या प्राणान्त यातनांपासून जशीं कळून आलीं तशीं सकल जगाच्या पापामुळें संहार जरी झाला असता तरी देखील तीं इतक्या उत्तम प्रकारें कळलीं नसतीं. तसेंच, ज्यांचीं अंतःकरणें कोमल आहेत अशांस तर या अपार प्रीतीमुळें पाझर फुटून देवाच्या परम प्रीतीचा त्यांच्या मनावर चांगला संस्कार होतो. जीं दुःखें प्रभु येशू ख्रीस्तानें सहन केलीं तीं वास्तविक असून ज्या वेदना त्यास झाल्या त्या अवर्णनीय होत्या; व अशीं अत्यंत भयंकर दुःखें देवपुत्रानें तुह्मां आह्मांकरतां सोसिलीं हें आपण विसरतां कामा नये. इतका अद्भुत चमत्कार मनुष्यानें यापूर्वीं ऐकला तरी होता काय? या सत्य गोष्टीवर जर कोणी मनापासून विश्वास ठेवील तर त्याचें यावत् वर्तन पालटलेंच पाहिजे हें उघड आहे.

४. मरणोत्तर स्थितीविषयीं ख्रिस्ती धर्मांत अगदीं स्पष्ट व ठामपणें सांगितलें आहे.

**मरणोत्तर स्थिति. पुनरुत्थान.**

प्राणोत्क्रमणानें मनुष्याचा शेवट होतो असें नाहीं. आपला आत्मा मरणोत्तर निरंतर असतो. एवढेंच केवळ नव्हे तर हीं आमचीं मृत शरीरें पुनः उठवून त्यांचा व आमच्या आत्म्यांचा संयोग होईल या गोष्टी ख्रिस्ती धर्मानें कळतात. स्वभावसिद्ध धर्मामध्यें आत्म्याच्या मरणोत्तर अस्तित्वाविषयीं जें कांहीं सांगितलेलें आढळतें तें डळमळीत असून मानवी देहाचे पुनरुत्थानाविषयीं सर्व शंका निवारण करण्याचें श्रेय केवळ ख्रिस्ती शास्त्रासच मिळतें.[२]

५. ख्रिस्ती धर्मामुळें नवीन कल्पना प्रचारांत आल्या एवढेंच केवळ नव्हे तर ईश्वर व

---

[१] फिलिप्पैकरांस पत्र २:८.

[२] हें मत पारशी लोकांस मान्य आहे, तथापि त्यांच्या अति पुरातन ग्रंथांत हें मत आहे किंवा नाहीं याविषयीं संशय आहे. तर्कशास्त्राच्या धोरणानें पाहतां होर्मज ह्मणून जो सदात्मा त्यांच्या मतें आहे त्यानें उत्पन्न केलेले प्राणी जे मरण पावले—त्यांचें पुनर्जीवन होईल हें पारशी लोकांस कबूल केलें पाहिजे. कारण दुरात्मा जो अहिरमन त्याजकडे मृत्यूचें काम असून सरते शेवटीं त्याचा व त्याच्या अनुचरांचा व त्याचे सृष्टीचा संहार होणार आहे अशी त्यांची समजूत आहे.

आर्. एस्. मूल साहेब ह्मणतात कीं प्राचीन काळचे मिसरी लोक मानवी देहाचे पुनरुत्थानाविषयीं विश्वास ठेवीत होते किंवा नाहीं याजबद्दल आज मित्तीला संशय आहे.

ख्रिस्ती धर्मांतील भाषेची अपूर्वता.

मनुष्याचा त्याशीं संबंध यांविषयीं बोलण्याचा अपूर्व प्रघात पडला आहे. शुभवर्तमान (इंग्रजींत गॉस्पेल) या शब्दावरून धर्माच्या अर्थाचा बोध होतो. तसेंच मंडळी (चर्च) ही संज्ञा फक्त ख्रिस्ती शास्त्रांतच आढळते. तसेंच, **कृपा, तारण, न्यायीपण, विश्वास, न्यायीकरण, वैभव, आत्मा, देह** वगैरे शब्दांत जो कांहीं सांकेतिक अर्थ आहे तो इतका कांहीं नवीन व अपूर्व आहे, कीं ज्या वेळेस ख्रिस्ती धर्माचा प्रसार नव्यानेंच होऊं लागला त्या वेळेस त्या धर्मांतील लोकांचा भाषणसंप्रदाय लोकांच्या समजण्यांत येण्यास बरेच आयास पडले असतील.

याप्रमाणें ख्रिस्ती धर्मांत नवीन अर्थाचे शब्द व अगदीं नवीन कल्पना पाहून फार आश्चर्य वाटतें. विचारांत अपूर्व प्रकार असणें ही कांहीं साधारण गोष्ट नाहीं. महान् महान् पंडितांनीं जे विचार जगापुढें मांडले आहेत ते सर्वच नवीन आहेत असें क्वचित् असतें. त्यांचा सूक्ष्म विचार केल्यावर ते जुनेच आहेत असें सहज दिसून येईल. त्यांत विशेष इतकाच कीं एक दोन जुन्या कल्पना घेऊन त्यास त्यांनीं नवीन स्वरूप मात्र दिलेलें असतें. तथापि ज्या मतांचा उल्लेख वर केलेला आहे त्यांचा तसा प्रकार नसून ते अगदीं अपूर्व आहेत असें मी निश्चयात्मक तुह्मांस सांगतों व ज्या अर्थीं त्यांचा समावेश फक्त ख्रिस्ती धर्मांतच केलेला आहे, त्या अर्थीं ते इतर धर्मांतून घेतलेले आहेत असें म्हणतांच येत नाहीं.

ख्रिस्ती धर्मांतील मतांचा सुमेळ.

६. ख्रिस्ती धर्ममतें अपूर्व आहेत एवढेंच केवळ नव्हे तर त्यांमध्यें परस्पर संबंध व मिलाफ फारच उत्कृष्ट आहे. पहा कीं एखाद्या रोगी मनुष्याचे स्वप्नांतील कल्पनातरंग फार विलक्षण असतात, परंतु ते सर्व मूर्खपणानें भरलेले असून त्यांमध्यें कोणत्याही प्रकारचा मेळ ह्मणून नसतो. ख्रिस्ती धर्ममतें अशा प्रकारचीं मुळींच नसून तीं एका व्यवस्थित क्रमाचीं अंगें आहेत व त्यांमध्यें परस्पर मिलाफही आहे असें दृष्टोत्पत्तीस येतें.

आतां हा नवा प्रकार व तत्संबंधी मेळ त्या धर्माच्या सत्यतेस बलवत्तर प्रमाण आहे. जर हीं मतें मनुष्यकृत असें ह्मणावें तर कविवर्य मिल्टन यानें आपलें महाकाव्य रचण्यास जी कांहीं बुद्धि खर्चली तीपेक्षां शतपट अधिक बुद्धि हीं मतें शोधून काढून त्यांचा व्यवस्थित क्रम लावण्यास खर्चावी लागली असें ह्मटलें पाहिजे.

ख्रिस्ती धर्मांतील नीतिशास्त्राचा बराच भाग अपूर्व आहे.

७. वरील विचारावरून ख्रिस्ती धर्मांतील पुष्कळ मतें अपूर्व आहेत अशी तुमची खातरी झालीच असेल. तसेंच, त्या धर्मांतील पुष्कळ वचनांची अपूर्वताही दिसून येईल. उदाहरणार्थ, "तुह्मी आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा," "जे तुह्मांस शाप देतात त्यांस आशीर्वाद द्या," "सर्वांचा सन्मान करा," "घ्यावें यापेक्षां द्यावें हें चांगलें आहे," "माणसांनीं ज्या रीतीनें तुह्मांशीं वर्तावें ह्मणून तुमची इच्छा

आहे त्याच रीतीनें तुह्मीही त्यांशीं वर्ता" हीं वचनें अंतःकरणास किती चकित करणारीं आहेत पहा बरें! आतां अशा अर्थाचीं वचनें प्रसंगानुसार इतर धर्मग्रंथांत कोठें कोठें मिळतात हें जरी खरें आहे, तथापि मूर्तिपूजक धर्मग्रंथांतील अज्ञानांधकारांत तीं काजव्याप्रमाणें मधून मधून चमकतात, परंतु बायबल चिरकालीन प्रकाशमय अशा वचनांनीं भरलेलें आहे.

ख्रिस्तवर्तन.

८. ख्रिस्तवर्तनाकडे लक्ष्य देतां असें दिसून येतें कीं त्याची बरोबरी करील असें दुसरें उदाहरण जगतामध्यें मिळणें अगदीं अशक्य आहे. त्यास शोभा आणणारें त्याचें नीतिवर्तन व त्याच्या इतर गोष्टी या इतक्या अलौकिक होत्या कीं त्याच्या तोडीचें दुसरें उदाहरण पाहूं गेलें असतां दुर्मिळ. ह्मणूनच अशा प्रकारचा कल्पनापुरुष कोणी बुद्धिमान् मनुष्याला दाखवितां येईल हें शक्य नाहीं. त्याच्या शिष्यवर्गानें त्याजविषयीं जें काय ऐकिलें व पाहिलें तेंच केवळ निवेदन केलेलें आहे.[१] होमर, शेक्सपियर, मिल्टन आदिकरून जे महाकवि होऊन गेले त्यांच्या काव्यांत मानवी गुणावगुणांचें जें वर्णन आहे तें वाचून मनुष्यांस लावून पहातां अगदीं हुबेहूब आहे असें आपण ह्मणतों. परंतु याहून विशेष स्तुतीस ते पात्र नाहींत. होमर कवीनें आपल्या काव्यांत जें देवांचें वर्णन केलें आहे तें पाहातां त्यावरून तीं मनुष्यें तर खरींच, तथापि तीं राईचा पर्वत केल्याप्रमाणें दाखविलेलीं आहेत. त्यांचे आचार, विचार, भावना, मनोविकार, सद्गुण व दुर्गुण हीं सर्व मनुष्याचींच आपण पहातों. कविश्रेष्ठ मिल्टनची तीच अवस्था. ईश्वराचें वर्णन करण्यासाठीं जेव्हां जेव्हां त्यानें प्रयत्न केला आहे तेव्हां त्याची कल्पनाशक्ति कुंठित झालेली दिसून बायबलांत केलेल्या वर्णनापलीकडे जाण्याच्या भरीस पडल्यानें त्याविषयींची जी आमची पूज्यबुद्धि ती नष्ट होऊन तें वर्णन खरें नाहीं असा आह्मांस लागलाच भास होतो. पण येशू ख्रिस्ताची गोष्ट तशी नाहीं. त्याकडे पहातां तो एकाच काळीं देव असून मनुष्यही आहे असें दिसून येतें व त्याच्या अति दुर्बोध अशा प्रकृतीस शोभतील असे त्याचे आचारविचार दिसून येतात. पहा कीं परमेश्वराचें वैभव व मनुष्याची दुर्बलता या दोहोंचा एका व्यक्तीमध्यें संयोग होणें हें किती आश्चर्याचें आहे! अशा व्यक्तीची कल्पना करणें हीच मुळीं मानवी शक्तीबाहेरची गोष्ट आहे; व नव्या करारांत जें त्याच्या चरित्राचें सुंदर वर्णन आहे तेंच ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेस काय कमी आहे? बिलकुल कमी नाहीं. याकरितां आपण मनापासून ख्रीस्तचरित्राचें अध्ययन करावें अशी माझी आपणांस विनंती आहे.

त्याच्या बुद्धीकडे पहातां ती तरी किती विशाल! जगाच्या संपूर्ण इतिहासांत जेवढे

---

[१] "जें आह्मीं पाहिलें व ऐकिलें आहे, तें आह्मी तुह्मांस सांगतों." १ योहान १ : ३.

त्याची विशाल बुद्धि.

म्हणून थोर पुरुष वर्णिले आहेत त्या सर्वांत ख्रीस्तासारखा मुळींच आढळून येत नाहीं. त्याचें तें शांत चित्त, उपदेशाची सुबोध शैली, उदात्त विचार व ग्राहक शक्ति हीं शुभवर्तमानांतील डोंगरावरील उपदेश व त्यांतीलच दुसरे अनेक उपदेश यांवरून व्यक्त होत आहेत. अशा तोडीचा दुसरा मनुष्य कोणी दाखवूं शकेल काय ? कोणीही समर्थ होणार नाहीं. विशाल बुद्धीचा पुरुष केवळ ख्रिस्तच एकटा होय. अलीकडे असे उद्गार आपण नेहमीं ऐकतों कीं सत्य आणि प्रिय यांचा संयोग काय तो ख्रिस्ताच्याच ठायीं दिसून येतो[१]. ख्रीस्ताचे विचार कोणत्या एका राष्ट्रास किंवा देशास अनुलक्षून आहेत असें नाहीं; तो परोशी किंवा सदोकी नाहीं, यहूदी किंवा ग्रीक यांच्यासारखाही तो नाहीं. एशिआ व यूरोप या खंडांतील मनुष्याप्रमाणें त्याचे विचार असावे असें ह्मणावें तर तसेंही नाहीं. उत्तम मनुष्याचें प्रतिबिंब ख्रिस्त होय. त्याच्या पलीकडे मनुष्याची कल्पना जाणेंच शक्य नाहीं असें दिसून येतें.

त्याचें नीतिवर्तन.

आतां ख्रिस्तवर्तनाचे नीतिस्वरूपाविषयीं विचार करतां असें दिसून येतें कीं तें सर्वांशीं पूर्ण असून त्यांत तिळमात्र व्यंग नाहीं. हें धर्मद्वेष्टे देखील कबूल करितात. दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीच्या ठायीं जो गुणसमूह आढळावयाचा नाहीं तो ख्रिस्ताचे ठायीं आपण पहातों. कधीं पहावें तों तो महाशक्तिमान् आहे, पण कधीं कधीं तो फारच नम्रही आहे. कधीं कधीं त्याचे ठायीं मोठ्या वीराचें धैर्य असून कधीं कधीं मातृप्रेमाचा कळवळाही दिसतो. कधीं पहावें तों तो पापाचा कडक निषेध करून ज्याची चूक त्याच्या पदरीं बांधीत आहे. दुसऱ्या वेळीं पहावें तों पाप्यामुळें त्याचें अंतःकरण तिळतिळ तुटत आहे. या प्रमाणें परस्परविरोधी गुणांचें संमेलन एका ख्रिस्ताचेच ठायीं मात्र दिसून येत असून तदनुरूप क्रियाही त्याजकडून होत असे. पूर्ण आत्मनिवेदन, मनुष्यमात्रावर अमर्याद प्रीति, पूर्ण अस्वार्थदृष्टि व अतिशय स्वदेहपरित्याग हीं मूर्तिमंत त्याचे ठायीं दिसून येतात. “ तो बरें करीत फिरला ” ह्मणजे मनुष्यमात्राचे आत्मे व शरीर यांचें हित करणें ह्राच व्यवसाय त्यानें पत्करिला होता. ईश्वराच्या गौरवार्थ व मनुष्यमात्राच्या कल्याणार्थ त्यानें आपलें सर्व आयुष्य वेंचिलें. पापविमोचनार्थ ख्रिस्तानें जें प्रायश्चित्त केलें त्याचें विशेष अगत्य ज्यांस वाटत नाहीं त्यांस निदान इतकें तरी कबूल करावें लागेल कीं त्यानें होऊन या कामीं जीं अनेक संकटें भोगलीं त्यांवरून त्याचें मनुष्यावरील प्रेम विशेष

---

[१] ही उक्ति माथ्यू आरनाल्ड नामक ग्रंथकाराची असून त्याच ग्रंथकारानें मरणापूर्वी ख्रीस्ताचे मनाविषयीं आणखी ह्मटलें आहे तें असें:— “ ख्रिस्ताचें मन तें पूर्ण समतोल असून खरें सुखदायक होतें. ” ( पहा Nineteenth Century नामक मासिक पुस्तकाचा एप्रिल १८८७ चा अंक. )

असल्याचें व्यक्त होत नाहीं काय? या अद्वितीय पुरुषाचें अति प्रेमभरित चरित्र वाचून ज्याचें मन द्रवत नाहीं तो खरोखरीच अधम व पाषाणहृदयी आहे असें ह्मणावें लागेल.[१]

खिस्ताशीं सहवास.

ख्रिस्ताचे खरे अनुयायी यांचा विद्यमान काळींही त्याशीं सहवास आहे हें जें ख्रिस्ती धर्माचें मुख्य बीज तें कोणींही विसरतां कामा नये. ह्मणजे ख्रीस्त मरण पावला खरा, तथापि तो पुनः उठून पुढेंही चिरस्थाई झाला आहे. जो पूर्व काळीं होऊन गेला अशा ख्रिस्ताचें आह्मी गौरव करतों असें नव्हे, तर जो विद्यमान काळींही आहे, त्याचे सन्निध आम्ही जाऊन त्याचें भजन करतों. प्राचीन काळीं ख्रिस्तानें जें जें कांहीं केलें त्याचा इतिहास बायबलांत नमूद केला आहे इतकेंच नाहीं तर प्रस्तुत कालींही तो जें कांहीं आपणाकरितां करीत आहे त्याचेंही त्यांत कथन करून ठेविलें आहे. पूर्वकालचीं त्याचीं कामें जशीं वैभवयुक्त आहेत तशीं प्रस्तुतचींही असून दोन्हीही आपल्याला सारखींच उपयोगाचीं आहेत. ज्या विश्वासाविषयीं बायबलांत अनेकवार उल्लेख केलेला आहे तो केवळ अमुक धर्ममतांच्या संबंधानें विशेषेंकरून आहे असें समजतां कामा नये. धर्ममतांवर तर विश्वास असणें अगत्याचें आहे; परंतु इतकेंच नाहीं तर स्वतः ख्रीस्तावर विश्वास असला पाहिजे ह्मणजे त्याशीं लगट केली पाहिजे, व त्याशीं निरंतर सख्य असलें पाहिजे, तरच तो विश्वास. ख्रिस्त व त्याचे भक्त यांचा एकमेकांशीं जो संयोग आहे त्याची योग्यता अवर्णनीय असून तो कांहीं लहानसहान नाहीं. कारण त्याशिवाय कोणास ख्रिस्ताचा खरा भक्त होणें शक्य नाहीं. पहा कीं प्लेटोनामक ग्रीस देशांतील पंडिताच्या अनुयायांस त्याच्याविषयीं अभिमान आहे, तसाच मुसलमान लोकांस महमदाचा, आणि हिंदु लोकांस समजा कीं कृष्णाचा अभिमान आहे. पण याच्या पलीकडे काय आहे? प्लेटोच्या शिष्यवर्गास अभिमान बाळगण्यास काय तीं त्याचीं मतें व त्यानें घालून दिलेलें वळण. परंतु प्लेटोचे विचार अमुक प्रकारचे होते असें त्यांस म्हणतां येईल, याच्या पलीकडे कांहीं नाहीं. खुद्द प्लेटोशीं त्यांचा संबंध बिलकुल नाहीं. त्याचप्रमाणें हिंदु व मुसलमान यांचीही तशीच गोष्ट आहे. परंतु पुनरुत्थानापन्न ख्रीस्त व त्याचा भक्तपरिवार यांमध्यें जें संघट्टन आहे तें किती वेगळें व जिव्हाळ्याचें आहे बरें? त्याचीं वचनें व त्याचा कित्ता यांवरच आह्मांस बसून रहावें लागत नाहीं; कारण तो प्रत्यक्ष आह्मांमध्यें आहे. आतां असा एक प्रश्न उद्भवतो कीं ज्या ख्रिस्ताचें एक वेळ स्वर्गारोहण झालें आहे तो पुनश्च खालीं येऊन आपल्या भक्तमंडळींत या भूलोकीं कसा संचार करूं शकेल? ही शंका वेळोवेळीं या देशांतील कित्येक लोकांनीं घेतली आहे. त्यांस उत्तर इतकेंच कीं जसा सूर्य आकाशमार्गानें भ्रमण करीत असतां फार दूर असूनही

---

[१] परिशिष्ट ५ पहा.

त्याच्या तापानें आपणास उजेड, उष्णता वगैरे मिळून आपलीं अनेक कार्यें होतात तद्वत्‌च ख्रिस्ताची गोष्ट आहे.[१]

खिस्ती धर्मांतील मतप्रकरणें व नीति यांचा प्रसार.

९. ख्रिस्ती धर्म हा शाब्दिक विवेचनाचा नाहीं तर त्यांत वचनानुरूप कृतिही आहे. ही एक तत्संबंधीं विशेष गोष्ट आहे. प्रत्यक्ष पहाणें व एकाद्या गोष्टीविषयीं कांहीं ऐकणें यांत फरक असावयाचाच. पहा कीं एखाद्या व्यक्तीविषयीं कोणीं कसेंही वर्णन करून आपल्यास सांगितलें किंवा त्याची तसबीर आपल्यापुढें ठेविली तर तीपासून आपल्यास त्या व्यक्तीविषयीं जी कल्पना होईल, ती त्या व्यक्तीस प्रत्यक्ष पाहिल्यानें जी होईल तीसारखी असूं शकेल काय? नाहीं. तशीच गोष्ट धर्मोपदेशाची व कर्तव्याची आहे. कारण उपदेश व कृति ह्यांशीं मेळ असल्याशिवाय तदनुरूप आचरण करण्यास लोकांस स्फूर्ति होणार नाहीं. मी पापाचा तिरस्कार करतों असें जरी देवानें प्रत्यक्ष येऊन सांगितलें, तरी त्यापासून आपले मनावर चांगलासा ग्रह होणार नाहीं; पण तसें सांगून तदनुरूप कांहीं क्रिया दाखविली ह्मणजे पाप्यास त्याच्या पापकर्माबद्दल कडक शासन केलेलें आपण पाहिलें ह्मणजे आपले मनावर विशेष चांगला परिणाम घडतो. त्याचप्रमाणें परमेश्वर मनुष्यमात्रावर दया करतो हें वचन ऐकून आपले मनावर जो संस्कार घडतो त्यालाच विशेष बळकटी त्याच गोष्टीच्या प्रतिपादनार्थ अनेक घडून आलेल्या गोष्टी आपल्या पहाण्यांत आल्यानें येते. कर्तव्याचीही अशीच गोष्ट आहे. शत्रूंस क्षमा करा, सर्व मनुष्यमात्रावर प्रेम ठेवा अशा प्रकारचा उपदेश नुस्ता ऐकून जो कांहीं ठसा मनावर उमटतो तो अगदीं अल्प असतो; परंतु जर करतां त्याच उपदेशानुरूप कोणीं कृति करून दाखविली व विशेषतः जो उपदेशक तोच जर त्या उपदेशाप्रमाणें चालून कित्ता घालतो तर तेणेंकरून जो कांहीं ठसा मनावर वठतो तो सहसा जात नाहीं. आतां ख्रीस्ताकडे पहातां त्यानें बोध करून तदनुरूप कित्ताही घालून दिला आहे. या तत्त्वांची थोरवी किती सांगावी!

एक ख्रिस्ती धर्म मात्र या तत्त्वांपासून बनलेला आहे, इतर तसे नाहींत. ह्मणूनच ख्रिस्ती धर्माचें व त्या तत्त्वांचें उत्तम प्रकारचें ऐक्य आहे, हें पाहून फार आश्चर्य वाटतें. सृष्टिजन्य ईश्वरी ज्ञान या विषयावर ज्ञात्यांनीं अनेक ग्रंथ करून त्यांमध्यें ईश्वरी लीलेचें वर्णन केलें आहे खरें; परंतु तें दुर्बोध असून त्यापासून वाचकाचे मनावर दृढ संस्कार होत नाहीं. शत्रूंवर प्रीति करावी असें जर ह्या ज्ञात्यांस उपपादन करावयाचें असलें तर श्रोत्यांच्या नजरेपुढें इतकें मनोहर चित्र ते दाखवितील कीं त्यापासून त्यांचें अंतःकरण सद्गदित होईल खरें, पण हें चित्र मूर्तिमंत नसल्यामुळें स्वप्नासारिखें भासतें, आणि श्रोत्यांस

---

[१] पुष्कळ हिंदु लोक ख्रिस्ताचा उपदेश व त्याचें वर्तन यांविषयीं फार वाखाणणी करितात. हें तर ठीकच आहे, परंतु इतक्यानें त्यांची गणना ख्रिस्ताच्या शिष्यवर्गांत होणार नाहीं ही मोठी दुःखाची गोष्ट आहे.

अशा पांडित्यापासून कांहींच घेतां येत नाहीं. ज्यास आपण ज्ञाते ह्मणतों ते केवळ शब्दाच्या योगानें परमेश्वराविषयीं आपली समजूत घालतात; परंतु शब्दज्ञान जर विद्वानांच्याही उपयोगीं पडत नाहीं, तर जे बोलून चालून अज्ञान आहेत त्यांस त्यापासून तादृश उपयोग होत नाहीं यांत नवल तें काय?

ख्रिस्ती शास्त्रांत हा प्रकार नाहीं. त्या ग्रंथांत ऐतिहासिक गोष्टींची एक मोठी परंपरा आहे. तीवरून ईश्वराचें स्वरूप ह्मणजे त्याची पवित्रता व प्रेम, तसेंच पापाचे अनिष्ट परिणाम व मानवी गुणदोष वगैरे महत्त्वाच्या गोष्टी कळून येतात. दुसऱ्या पत्रांत याविषयीं उल्लेख आलाच आहे. ईश्वरी शास्त्र लेखी नसणें हें संभवतें, तथापि मानवाप्रीत्यर्थ झालेल्या ईश्वरी कृतीचे लेख असणें हें अत्यंत इष्ट आहे.[१] ख्रिस्ती शास्त्रांत आमचें कर्तव्य देखील उदाहरणानें दाखविलें आहे. पवित्रता व प्रेम हे गुण कसे असावेत हें येशू ख्रीस्तानें इतक्या कांहीं स्पष्ट व मोहक रीतीनें प्रगट केलें आहे कीं ते ज्ञात्यांस व गांवढळांस सहज समजतात व त्याचें रहस्यही दोघांस सारखेंच कळतें. बायबलाचा बराच मोठा भाग ऐतिहासिक असल्यामुळें, त्यावरून अति गहन व महत्त्वाच्या गोष्टींचें ज्ञान आह्मांस होतें.

यावरून असें दिसून येतें कीं बायबलांतील ईश्वरदत्त धर्म प्रगट करण्याचा प्रकार अगदीं अपूर्व असून खऱ्या तत्त्वज्ञानाशीं तो जुळतो. माझा यथार्थ हेतु तुमच्या लक्ष्यांत आलाच असेल. मागील पत्रांत ख्रिस्ती धर्माचे सिद्धांत अपूर्व व खरे आहेत हें सांगितलें; आतां माझें असें ह्मणणें आहे कीं हे सिद्धांत मनुष्यास प्रगट करण्याचा प्रकार हा देखील अपूर्व व सयुक्तिक आहे.

ख्रिस्ती धर्म व्यवहाराला धरून आहे.

१०. ख्रिस्ती धर्म व्यवहाराला धरून आहे हें एक त्या धर्माचें विशेष लक्षण आहे असें म्हटलें पाहिजे.

ख्रिस्ती धर्मापासून केवळ बुद्धीचीच उन्नति होते असें नाहीं, तर त्यापासून मनुष्यास सहृदयता प्राप्त होऊन त्याचें वर्तनही सुधारतें मनुष्याचें मन व वर्तन तशीच त्याची वाणी यांचें आकलन व्हावें ह्मणून ख्रिस्ती धर्मांत नियम देखील घालून दिले आहेत.

---

[१] Butler's Analogy नामक ग्रंथाचा २ भाग प्रकरण ३ पहाणें. इस्राएल लोकांच्या इतिहासांतील अपूर्व गोष्टींची छाप त्या लोकांच्या मनावर किती उत्तम प्रकारें वठली हें त्यांच्या अलीकडील ग्रंथांतील लेखांवरून दिसून येतें. उदाहरणार्थ, "परमेश्वराचीं पराक्रमी कर्में कथांयास कोण समर्थ आहे?" (गीत १०६:२). "जो आपल्या प्रतापी भुजानें मोशाच्या उजव्या हातास वागवीत असे, ज्यानें **आपणासाठीं सनातन नाम करायाला** त्यांपुढें समुद्र विभागला." (यशाया ६३:१२.) ईश्वराचे प्रत्येक थोर कृत्यापासून त्याचें थोर वैभव प्रगट होतें.

आपण सर्वांनीं ख्रिस्तास अनुसरून चालावें ह्मणून बायबलांत ख्रिस्ताचें उत्तम उदाहरण आपल्यापुढें मांडलें आहे. या उदाहरणास आह्मीं अनुसरावें अशी बायबलांत नुस्ती आज्ञा आहे असें नाहीं तर "प्रिय लेंकरांसारिखें देवाचें अनुकरण करणारे व्हा"[१] अशी विनवणीही केली आहे, व जर आह्मीं भाविक मनानें तसें होण्याविषयीं देवाचें साह्य मागितलें तर तें देण्याविषयीं त्याचें अभिवचन आहे. आणि याप्रमाणें आपण वागलों असतां देवाच्या कामास आपण हातभार लाविला असें होईल. या धर्माचा मुख्य हेतु ह्मटला ह्मणजे मनुष्याची अंतर्बाह्य शुद्धि व्हावी हा आहे. व्यवहारदृष्टीनें पहातां ख्रिस्ती धर्म म्हणजे काय असें जर कोणी विचारील तर त्यास हेंच उत्तर कीं ख्रिस्तासारखें वागणें ह्मणजे ख्रिस्ती धर्म. कारण जगाच्या विस्ताराप्रमाणें त्या धर्माचे उद्देश देखील विस्तृत आहेत. ह्मणूनच जे नीच आहेत त्यांचा ख्रिस्ती धर्म धिक्कार करीत नसून, मनुष्यजातीमध्यें जे दुष्टपणामुळें अगदीं हातांतून गेलेले त्यांचाही उद्धार करण्यास त्यास पूर्ण उमेद आहे. सर्व मनुष्यमात्राचा उद्धार करावा ह्मणजे त्यांस पवित्र व सुखी करावें हा त्या धर्माचा मुख्य उद्देश होय. व्यक्तीची सतत प्रगति करून त्याच योगानें अखेरीस सकल समाजाची सुधारणा करावी हाच कायतो या धर्माचा रोंख. "ज्या प्रकारें स्वर्गांत त्या प्रकारें पृथ्वीवर परमेश्वराच्या इच्छेप्रमाणें होवो," या प्रार्थनानुरूप ख्रिस्ती धर्माचा परिश्रम चालला आहे: आतां हे प्रयत्न कितपत सफळ झाले आहेत हें पुढें दाखविण्यांत येईल. प्रस्तुत मी इतकेंच ह्मणतों कीं अशा प्रकारची थोर उमेद बाळगणें हेंच त्या धर्माचें थोर लक्षण आहे.

ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्मांचा व्यवहाराशीं संबंध मुळींच नाहीं. कित्येकांत तर धर्मतत्त्वें व नियम यांचा थोडा बहुत उल्लेख केलेला आहे, आणि त्यांत मुख्यत्वेंकरून निरुपयोगी, निरर्थक व लांबच लांब अशीं बाह्य कर्मे सांगितलेलीं आहेत. बहुतेक बऱ्याच धर्मांतून पापाच्या क्षमेविषयीं जरी सांगितलेलें आहे, तथापि ख्रिस्ती धर्माप्रमाणें मनुष्यमात्रास पवित्र करण्याचें अगत्य त्यांत आढळत नाहीं. सत्याचें ज्ञान करून देऊन त्यावर त्यांची निष्ठा बसावी असे कित्येक ज्ञात्यांनीं यत्न केले आहेत खरे, तथापि त्यापासून फायदा असा थोड्यांचाच झाला आहे; कारण ह्या ज्ञात्यांनीं जें प्रतिपादन केलें आहे तें फारच असंगतवार व संदिग्ध असें आहे. यावत् मनुष्यजात अज्ञानांत व दुराचारांत बुडाली असून तीस सुधारणें हें मुळींच दुरापास्त असा या ज्ञात्यांचा सिद्धांत[२]

---

[१] एफ़ु:५:१.

[२] असें मत प्राचीन काळच्या झाडून सर्व तत्त्वज्ञान्यांचें आहे. आरिस्टाटल नामक तत्त्ववेत्त्यानें ही गोष्ट फार दुःखानें कबूल केली आहे. पहा Ethics 10. अर्वाचीन काळांतील नास्तिक लोक इतके निराश झाले नाहींत, कारण नीच पदाप्रत पोहोंचलेल्या लोकांची ख्रिस्ती धर्माकडून बरीच उन्नति झालेली ते प्रत्यक्ष पहात आहेत. समाजाची उत्तरोत्तर उन्नति होत जाणें याची कल्पना देखील प्राचीन काळच्या ग्रीक तत्त्ववेत्त्यांस

असल्यामुळें त्यांच्या ज्ञानाचा सर्व लोकांस फायदा होत नसून उलटें त्यांस निराश मात्र केलें आहे.

ख्रिस्ती धर्माचा व्यवहारावर दाब.

११. ख्रिस्ती धर्मामध्यें जी व्यावहारिक शक्ति दृष्टोत्पत्तीस येते ती फारच अलौकिक आहे.[1]

ख्रिस्ती धर्मातील आज्ञा शुद्ध असून त्यांतून मनुष्यानें पवित्र व्हावें एतदर्थ त्यास मोठ्या आस्थेनें निरंतर बोध केलेला आहे. तसेंच, मनुष्याचें कल्याण व्हावें एतदर्थ देव त्याचा शोध करून मोठ्या कळवळ्यानें व आस्थेनें त्याची समजूत घालीत आहे हें ख्रिस्ती धर्मातच मात्र समजतें. त्या धर्मातील सत्यवचनें फार हृदयभेदक असून त्यांचा संस्कार आमच्या मनांवर अशा प्रकारें होतो कीं आह्मी जागृत होऊन आह्मांस पवित्र आचरण व आज्ञापालन करण्याची सहज प्रवृत्ति होते. ज्यांचा म्हणून ख्रिस्ती धर्मावर विश्वास आहे त्यांच्या मनांवर त्या धर्माचें प्राबल्य आहे असें समजलें पाहिजे. उदाहरणार्थ, एखाद्या फांशीं जाणाऱ्या अपराध्यास राजानें अकस्मात् जीवदान दिलें तर तो किती तरी हृदयचकित होईल बरें? ख्रिस्ती धर्माकडून ज्या गोष्टी प्रगट होतात त्या याहूनही अधिक हृदयद्रावक आहेत. देव नुसती पापांची क्षमा करतो इतकेंच नाहीं, तर मनुष्यांशीं सख्य व पुत्रवात्सल्यही जोडतो. या सर्व गोष्टी ख्रिस्ती धर्मानें प्रगट होतात आणि त्यावर विश्वास बसल्यावांचून रहातच नाहीं. फार काय सांगावें, हें सारें त्या धर्माचें जीवन आहे.

एखादी सत्य गोष्ट केवळ ऐकून तिजपासून सुधारणा होते, इतका जोम तिच्यांत नसतो हें लक्ष्यांत वागविलें पाहिजे. कारण मनानें ग्रहण केलेल्या गोष्टीचा अंतःकरणाशीं संबंध असतो. जो बुद्ध्या डोळे झांकून घेतो त्याला दिसावें कसें! ही गोष्ट अंतर्बाह्य दृष्टीची सारखीच आहे. उदाहरणार्थ, पहा कीं एकाद्या वस्तूकडे पाहूं नये असें वाटल्यास आपण आपले डोळे मिटतों किंवा तोंड फिरवितों. पण कित्येक तर आपले डोळे मिटतात एवढेंच नव्हे तर आपले डोळे बांधून टाकतात. आतां कित्येक हें बुद्धिपुरस्सर करीत असतील व कित्येक न जाणून करीत असतील असें संभवतें. नीतीच्या व पारमार्थिक

---

नव्हती. त्यांस असें वाटत होतें कीं सुधारणेचाही एक सांचा आहे व हिरा जसा कोळशापासून आपल्या सध्याच्या स्थितींत भूगर्भरचनेंत पूर्णता पावतो तशीच मनुष्याचीही गोष्ट आहे. त्यांतले सर्वच उत्तम स्थिति न पावून कित्येकांस तो लाभ कधीं काळीं होतो, परंतु ज्या कोणास तो होतो तो तितकाच मात्र, त्याहून त्यास जास्त होणें अशक्य.

[1] हें प्रकरण **अनुभविक प्रमाण** या सदराखालीं जोडलें असतां चालेल, तथापि ख्रिस्ती धर्मांत अशी शक्ति आहे याचे पुराव्यादाखल हें प्रकरण येथें जोडलें आहे. **अनुभविक प्रमाण** या सदराखालीं ही गोष्ट खरोखरींच प्रत्ययास आली आहे हें सिद्ध केलें जाईल.

गोष्टी समजून घ्यायाच्या नाहींत असा जर कोणीं संकल्प केला तर त्याला त्या समजूं नयेत हें साहजिकच आहे.

बायबलांत या संबंधानें दोन गोष्टी मोठ्या कळकळीनें सांगितल्या आहेत. पहिली ही कीं मनुष्यास त्याच्या स्वतांच्या ज्ञानानें पारमार्थिक गोष्टींचा समज होऊं शकत नाहीं किंवा त्यांची अभिरुचिही त्यास लागत नाहीं; आणि मनुष्य जर मोठ्या आस्थेनें ईशकृपेचें सहाय मागेल तर तें त्याला प्राप्त होईल, ही दुसरी. ही गोष्ट साध्य होण्याकरितां मनुष्यानें आपला उद्योग तर चालवावाच, पण सर्व भार देवावर टाकावा ह्मणजे त्यास यशप्राप्ति होईल. आणि यासाठीं देव जें सांगतो तें आह्मीं कृतज्ञभावानें शिकून हृदयांत वागवावें व तदनुरूप आचरण ठेवावें. ईश्वराचा धांवा केला तर तो साह्य केल्यावांचून कदापि राहणार नाहीं हें वर आलेंच आहे.

ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्मांमध्यें या व्यवहारोपयोगी शक्तीचा अभाव दिसून येतो. पहा कीं एखाद्या मनुष्यास तूं चांगल्या प्रकारें वाग असें पोकळ शब्दपांडित्य केल्यानें त्यास कांहीं उपयोग होणार नाहीं; तर त्यास तसें वागण्यासारखी शक्ति मिळाली पाहिजे. यदाकदाचित् इतर धर्मांस हा वर निर्दिष्ट केलेला व्यवहारमार्ग जरी अवगत असला तरी त्या मार्गास कसें पोंहचावें हें मात्र त्यांच्यांनीं सांगवत नाहीं. साक्रेटीस व प्लेटो यां-सारख्या ज्ञात्यांनीं म्हटलें आहे कीं मनुष्यांस जर सत्याची ओळख झाली असती तर त्यांनीं तदनुसार वर्तनही केलें असतें. परंतु हा त्या तत्त्ववेत्त्यांचा सिद्धांत खरा नाहीं. कारण मनुष्यानें आपल्या बुद्धीला व विवेकाला गुंडाळून ठेवून आपल्या अनिवार इच्छे-प्रमाणें वर्तन केल्याचीं शेंकडों उदाहरणें इतिहासावरून देतां येतील. ही गोष्ट जेव्हां ज्ञात्यांच्या लक्ष्यांत आली तेव्हां संवयीचें प्राबल्य मनुष्यावर असल्यावांचून त्याचें वर्तन सुधारणार नाहीं असें ते प्रतिपादन करूं लागले. परंतु भ्रष्ट असा जो मनुष्यप्राणी त्याला चांगली संवय लागावी कशी ही मोठी अडचण आहे. ह्मणून जेणेंकडून मनुष्याच्या मनांतील सर्व भावना शुद्ध होतील अशी शक्ति त्यास पाहिजे आहे, किंवा बायबलांत सांगि-तल्याप्रमाणें त्याचा पुनर्जन्म झाला पाहिजे ह्मणजे त्याचे हातून सद्वर्तन घडेल[१].

ख्रिस्ती व इतर धर्म यांमध्यें या संबंधानें जो एक मुख्य भेद आहे तो असा:—इतर धर्मांप्रमाणें ईश्वर व मनुष्य यांचा सेव्यसेवकभाव आहे. पण ख्रिस्ती धर्मांत हा संबंध पितापुत्र या नात्याचा आहे. म्हणजे अमूक काम केलें तर अमूक वेतन मिळेल हा इतर धर्मांचा भाव व ख्रिस्ती धर्मांत प्रथम ख्रिस्ताच्या द्वारें क्षमा प्राप्त होऊन तदनंतर

१ अलीकडे बराच प्रसिद्धीस आलेला मि० काटर मारिसन नामें नास्तिक ग्रंथकार ह्मणतो कीं "भ्रष्ट अंतःकरण सुधारण्यास मुळींच उपाय नाहीं." यास तर ख्रिस्ती शास्त्राप्रमाणें हटकून उपाय आहे. ईश्वराच्या कृपेनें पाषाणहृदयास पाझर फुटल्याचीं व अंधकारमय हृदयांत ईश्वरी प्रकाश पडल्याचीं एक दोन नाहींत तर शेंकडों उदाहरणें सांपडतील. या संबंधानें १ करिंथ. ६:११ या ठिकाणीं पौलसाचें जयोत्सवाचें बोलणें सांपडतें तें वाचून पहावें.

ईश्वर जो आपला पिता त्याची सेवा करणें असा संबंध आहे. सारांश, इतर धर्मांचें सांगणें ह्मटलें ह्मणजे पहिल्यानें सेवा, नंतर क्षमा, परंतु ख्रिस्ती धर्माचा क्रम त्यांच्या उलट आहे; ह्मणजे पहिल्यानें क्षमा, नंतर सेवा. **या, घ्या, प्रीति करा, आज्ञा पाळा** या क्रमानें ईश्वराचें सांगणें आहे, आणि तो क्रम आह्मांस बदलतां कामा नये. ख्रिस्ती धर्म या व इतर वर सांगितलेल्या गोष्टींमुळें अगदीं अपूर्व आहे. सकृद्दर्शनीं तर ख्रिस्ती धर्म सर्व गोष्टींची उलटापालट करणारा आहे असा भासतो; परंतु नीट विचार केला असतां मानवी स्वभावानुरूप ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें आहेत असें दिसून येईल. "मनुष्याच्या व्याधिग्रस्त आत्म्याला उत्तम गुणकारी औषध ह्मटलें ह्मणजे परमेश्वराची दया" असें जें एकानें ह्मटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. तर देवानें ख्रीस्ताच्या द्वारें जी दया प्रगट केली आहे तिच्या योगानें मनुष्याचें अंतःकरण लीन होऊन त्याची प्रवृत्ति ईश्वराच्या आज्ञापालनाकडे होते. "त्यानें आह्मांवर पहिल्यानें प्रीति केली म्हणून आह्मी त्यावर प्रीति करितों," कारण आपल्या जीवनाचें मुख्य तत्त्व ह्मटलें ह्मणजे प्रीति होय. "देव प्रीति आहे" या ईश्वरी वचनांत मनुष्याच्या आत्म्याला वळविण्याची किती तरी मोठी शक्ति आहे बरें!

आतां या पत्रांतील विषयाकडे सिंहावलोकन करून हें पत्र संपवितों. ख्रिस्ती धर्मांत जो अपूर्व प्रकार दिसून येतो तो कोठून आला व विशेषेंकरून त्याच्या ठायीं जी अगाध ज्ञानशक्ति व मनुष्यस्वभावाशीं जें ऐक्य दिसून येतें तेंही कोठून आलें? ख्रिस्ती धर्माचे मूळचे प्रसारक तर अमानुष ज्ञानसंपन्न होते असें मुळींच नसून ते बिचारे साधेभोळे, गरीब, अक्षरशत्रु असे होते. मिल्टन किंवा न्यूटन अशा जाड्या विद्वानांस जें शक्य नव्हतें, तेथें पेत्रस व योहान यांचा काय पाड? या गोष्टीचें उत्तर हेंच कीं मनुष्यानें हा धर्म शोधून काढलाच नाहीं. जो सर्वज्ञ भगवान्, ज्याला मनुष्याचें अंतःकरण, त्याच्या वांच्छा व मनोधर्म हीं पूर्णपणें ज्ञात आहेत व ज्याच्या ठायीं अपार शक्ति व प्रेम आहे त्यानें मनुष्यस्वभावानुरूप हा धर्म प्रगट केला आहे. कळावें.

**आपला मित्र—.**



## पत्र दहावें.

### ख्रिस्ती धर्माची इतर धर्मांशीं तुलना.

ख्रिस्ती धर्माची इतर धर्मांशीं तुलना—ख्रिस्ती धर्मांत देवाचा गौरव केलेला आहे—मनुष्याचा गर्व जरी हरण केला आहे तरी त्याची निर्भर्त्सना केलेली नाहीं—पाप अतिशयित त्याज्य आहे—त्यामुळें प्रायश्चित्ताचें व अंतःशुद्धीचें अगत्य—ख्रिस्ती धर्मांत कर्मकांड नसून तो फारच नीतिविशिष्ट व आध्यात्मिक आहे—त्या धर्मांत कित्येक गोष्टींचा खुलासा केलेला नाहीं—शास्त्रीय शोध व ख्रिस्ती धर्म यांचा परस्पर विरोध नसून तो धर्म सार्वत्रिक होण्यास पात्र आहे, कारण त्याविषयींचीं प्रमाणें सुबोध आहेत—प्राचीन ग्रीस, रोम, मिसर इ० देशांतले धर्म.

**प्रिय मित्र—,**

मागील पत्रीं ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म या दोहोंची तुलना करून त्या दोहोंमध्यें पूर्ण सादृश्य आहे, आणि ख्रिस्ती धर्म तर कित्येक विशेष गोष्टींत बराच पुढें सरसावलेला आहे हें आपणांस दिसून आलें. आतां जे इतर धर्म ईश्वरदत्त ह्मणून मानिले जातात त्यांच्यांशीं ख्रिस्ती धर्माची तुलना करण्याचें योजिलें आहे.

मूर्तिपूजक धर्मग्रंथांतही सत्यांश आहे.

बहुतेक मूर्तिपूजक धर्मांविषयीं एक गोष्ट प्रस्तावनारूपानें सांगणें अवश्य दिसतें. ती ही कीं मूर्तिपूजक धर्मांत अनेक दोष व व्यंगें आहेत, यामुळें मूर्तिपूजक धर्म म्हटले ह्मणजे येथूनतेथून लबाडीनें भरलेले आहेत असें मात्र समजतां कामा नये, हें मी आरंभींच सांगून ठेवतों. या दोषांचें स्पष्टीकरण प्रसंगोपात्त करितां येईल. मूर्तिपूजक लोकांकडे प्रथम उपदेश करण्याकरितां गेलेला पौलस यानें आपल्या लेखांत एके ठिकाणीं या प्रकारें ह्मटलें आहेः—"देवानें आपल्यास असाक्षिक ठेविलें नाहीं तर त्याची अनाद्यनंत शक्ति व देवपणा हीं सृष्टीच्या उत्पत्तीच्या कृत्यांवरून स्पष्ट दिसून येतात;" याकरितां जे मूर्तिपूजक त्यांकडे दुर्लक्ष्य करितात "ते निरुत्तर आहेत." मूर्तिपूजक लोकांचा अंतर्दीप अगदींच मालवून गेला आहे असें नाहीं. कारण त्यांच्या ग्रंथांतून जीं सत्यवचनें प्रसंगानुसार आढळतात तीं कांहीं थोडींथोडकीं आहेत असें नाहीं, मात्र तीं लिहिणारांनीं आपल्या मनास वाटलीं तशीं हवीं तिकडे ढकलून दिलीं आहेत. अशीं सत्यवचनें मूर्तिपूजक धर्मांत व ख्रिस्ती धर्मांतही आहेत; त्यांत अंतर ह्मणून एवढेंच कीं ख्रिस्ती धर्मांत तीं स्पष्टपणें व आवेशानें सांगितलेलीं आहेत.

मनुष्यजातीच्या मूळ पुरुषास ईश्वरानें धर्माचें तत्त्व प्रगट केलें, हा समज जसा ख्रिस्ती लोकांचा आहे त्याप्रमाणेंच जे ख्रिस्ती नाहींत त्यांचाही आहे. तर मग ह्या तत्त्वाचा भाग थोडा फार सर्व मूर्तिपूजक राष्ट्रांतून मिळाल्यास नवल नाहीं. अशा ज्या अवशिष्ट गोष्टी

आढळून येतात त्या खरोखरींच पूज्य व योग्यतेच्या आहेत हें सांगणें नको.[१] असें जरी आहे तरी मूर्तिपूजक धर्मांचीं विश्वासप्रकरणें व ग्रंथ यांचें अवलोकन केलें असतां मोठीच निराशा होते, मग तो ग्रंथ प्राचीन असो किंवा अर्वाचीन असो; त्यांतलें मुख्य लक्षण ह्मटलें म्हणजे विसंगतपणा. ह्या ग्रंथसमूहांत एके ठिकाणीं पहावें तों खरा अभिप्राय अत्युत्तम रीतीनें प्रगट केलेला असतो आणि दुसऱ्या पानावर किंवा फार लांब कशास पाहिजे, दुसऱ्याच ओळींत पाहावें तों इतकी हलकी कल्पना दृष्टीस पडते कीं तिच्या योगें आंगावर कांटाच उभा रहातो. मोक्ष मुल्लर साहेब, विशेषतः हिंदु धर्मग्रंथांविषयीं लिहितांना, ह्मणतात कीं या ग्रंथांत बऱ्यावाईट गोष्टींचें मिश्रण झालें कसें ही गोष्ट मोठ्या अचंब्याची आहे.

हिंदु धर्मग्रंथांत पुष्कळ भयंकर व तिरस्कार्य गोष्टी आहेत हेंही ते कबूल करितात.[२] मागील दोन पत्रांत जे विचार प्रगट केले त्यांतील कित्येक गोष्टींची पुनरुक्ति येथें केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

ख्रिस्ती धर्मांत देवाचा गौरव केलेला आहे.

१. ख्रिस्ती धर्मांत ईश्वराचा गौरव व बहुमान करण्याचीं लक्षणें असल्यामुळें तो इतर ईश्वरदत्त मानलेल्या धर्मांहून लोकोत्तर आहे. देवाचा महिमा, पवित्रता, व चांगुलपण, तसेंच, त्याची व्यवस्था, दूरदृष्टि व शिरसावंद्य असा त्याचा अधिकार, (व ह्मणूनच त्याच्या इच्छेचें उल्लंघन हेंच पाप असा ख्रिस्ती शास्त्राचा अभिप्राय आहे) या सर्व गोष्टींचें विवेचन त्या ग्रंथांत स्पष्टपणें केलें आहे.

ख्रिस्ती धर्मानें मनुष्याला विनय प्राप्त होतो.

२. मनुष्याचा गर्व हरण करावा, असा ख्रिस्ती धर्माचा रोंख असल्यामुळें तो इतर धर्मांहून वेगळा आहे. मनुष्य पतित, मूढ, भ्रष्ट, दुःखी, असा प्राणी असून तो ईश्वरेच्छेविरुद्ध वागत असल्यामुळें ईश्वरी कोपास पात्र झाला आहे, असें ख्रिस्ती धर्माचें सांगणें आहे.

ख्रिस्ती धर्म मनुष्याची उन्नति करूं पहातो.

३. कित्येक पंडितांनीं तर मनुष्यप्राणी नीच व निंद्य मात्र मानिला आहे, इतकेंच काय तें. परंतु ख्रिस्ती धर्मांत मनुष्याच्या पतितावस्थेबद्दल दुःख प्रदर्शित केलें असून त्याबद्दल त्याचा तिरस्कार मुळींच केलेला नाहीं. मनुष्य हा "पदभ्रष्ट झालेला[३]" तर खरा, पण पदच्युत झालेला राजा आहे, अशा प्रकारें त्याचें वर्णन बायबलांत केलेलें आहे. तसेंच, मनुष्याची पतितावस्था तशीच न रहातां उत्तरोत्तर

---

[१] प्रसिद्ध ग्रंथकार कार्डिनल न्यूमन ह्मणतो कीं पृथ्वीवरील अवघ्या धर्मांत कांहीं तरी अमानुष प्रकार असून ईश्वरानें प्रगट केलेल्या अशा गोष्टीही आहेत. हें त्याचें ह्मणणें वरील अर्थाप्रमाणें बरोबर आहे. उजेड तो उजेडच; तथापि इतर धर्मांचा उजेड ताऱ्याच्या उजेडाप्रमाणें असून ख्रिस्ती धर्माचा उजेड हा सूर्यप्रकाशासारखा आहे.

[२] Sacred Books of the East नामक ग्रंथमालेंतील पहिला ग्रंथ पृष्ठ १२वें पहावें.

[३] ही संज्ञा पास्कल नामक ग्रंथकारानें दिलेली आहे.

सुधारण्याची आशा आहे, हें आमच्या लक्ष्यांत यावें, ह्मणून त्या शास्त्रांत आणखी असें सांगितलें आहे कीं जशी एखादी भव्य इमारत मोडकळीस येऊन वाईट दिसते, परंतु तिचा जीर्णोद्धार झाल्यावर ती पुनः जशी सुंदर दिसूं लागते तद्वत् मनुष्याची स्थिति आहे; म्हणजे मनुष्याची पूर्वस्थिति सर्व पालटून जाऊन त्या इमारतीप्रमाणें तोही पहिल्यापेक्षां विशेष सौंदर्य पावेल, आणि हें नवल करण्यासारखें रूपांतर जो कोणी त्या धर्माप्रमाणें वागण्यास सिद्ध होईल त्यास निश्चयेंकरून मिळेल असें त्या शास्त्रांत अभयवचन आहे.[१] प्रत्येक मनुष्याचा आत्मा अजब वस्तु आहे. यास अनुलक्षून हें आश्वासन आहे. याप्रमाणें मनुष्याची थोरवी कोणत्याही प्राचीन ज्ञात्यांनीं मान्य केल्याचें दिसून येत नाहीं.

खिस्ती धर्माप्रमाणें पाप ह्मणजे काय ?

४. पापाचे अनर्थकारक परिणाम खिस्ती शास्त्रांत सांगून ते अनर्थ टाळण्यास जो बोध केला आहे त्यावरून त्या धर्माची थोरवी दिसून येते. पाप ह्मणजे देवाचा उपमर्द. पाप ह्मणजे न्यायाच्या नियमनाचें उल्लंघन. पापामुळें मनुष्याचा आत्मा भ्रष्ट व नीच पदाप्रत जातो आणि जालीम विषाचा परिणाम ज्याप्रमाणें शरीरावर होतो त्याप्रमाणें पापाचा परिणाम आत्म्यावर झाला आहे,असें खिस्ती शास्त्रांत सांगितलें आहे.

प्रायश्चित्त.

५. पापाकरितां प्रायश्चित्त झाल्याशिवाय गत्यंतर नसून प्रायश्चित्त देखील पापानुरूप असलें पाहिजे असें खिस्ती धर्माचें सांगणें असल्यामुळें तो धर्म अपूर्व आहे.

पवित्रीकरण.

६. अंतःशुद्धीची विशेष योग्यता खिस्ती धर्मानें प्रतिपादन केल्यामुळें त्या धर्माचें श्रेष्ठत्व इतर धर्मांवर आहे हें वेगळें सांगणें नको.

खिस्ती धर्मांत कर्मकांड नसून तो नीतिविशिष्ट आहे.

७. खिस्ती धर्मांत कर्ममार्ग फारच थोडा असून तो नीतिविशिष्ट असल्यामुळें तो इतर धर्मांहून लोकोत्तर आहे. पुष्कळशीं क्रियाकर्में व बाह्यविधि हीं आचरल्यानें पुण्यप्राप्ति होते व ईश्वरी प्रसन्नतेचा त्याशिवाय अन्य मार्गच नाहीं असें ज्या धर्मांत सांगितलें आहे त्यांस कर्ममार्गविशिष्टधर्म असें म्हणावें. मूर्तिपूजक धर्मांतून किती तरी क्रियाकर्में सांगितलीं आहेत! मुक्तिप्राप्त्यर्थ प्रार्थना, स्नान, उपवास, इत्यादि

---

[१] मनुष्य पशु आहे असें माप त्याच्या पदरीं नुसतें घालून कांहीं फायदा नाहीं, तर त्याबरोबर त्यास त्याची मोठी योग्यताही प्रत्ययास आणून दिली पाहिजे. तसेंच, त्याची मोठी योग्यता त्यास केवळ दाखवून उपयोगाचें नाहीं तर त्याबरोबर त्याचा अधमपणाही त्यास कळविला पाहिजे. पण इतक्यानें पुरें पडणार नाहीं. त्यास दोन्ही गोष्टींविषयीं अजाण ठेवावें तर त्याचें मोठेंच नुकसान होईल. यास्तव त्यास या उभय गोष्टींचा खुलासा करून देणें अगदीं अवश्य आहे.

Pascal's Thoughts (Faugeré's Edition) भाग २ पृष्ठ ८५.

गोष्टी अत्यावश्यक ह्मणून सांगितल्या आहेत. हा प्रकार ख्रिस्ती धर्मांत फारच थोडा आहे. धर्माचें खरें तत्त्व आध्यात्मिक आहे, ह्मणजे "देवाची दृष्टि मनुष्याच्या अंतःकरणाकडे आहे."[१] हें ख्रिस्ती धर्माचें सांगणें मोठ्या कळवळ्याचें असून त्या धर्मांत असेंही ह्मटलें आहे कीं जर देवाकडे चित्त नाहीं तर बाह्य लोटांगण वगैरे क्रिया काय उपयोगाच्या? त्यांचा देवाला फार तिरस्कार आहे.

**ख्रिस्ती धर्मांत कित्येक गोष्टींचा खुलासा केलेला नाहीं.**

८. ख्रिस्ती धर्मांत कित्येक गोष्टींविषयीं खुलासा केलेला नाहीं असें आपण पाहतों. परंतु त्याबद्दल नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं. उलट या गोष्टीनें ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेस बळकटी येते; कारण कित्येक गोष्टींचा इतर धर्मांहून ख्रिस्ती धर्मांत विशेष परिस्फोट केलेला आहे. कित्येक गोष्टी ख्रिस्ती धर्मांत इतक्या खुलाशानें सांगितल्या आहेत कीं त्यांविषयीं संशय म्हणून बिलकुल रहात नाहीं. तथापि कित्येक गोष्टींविषयीं त्या धर्मानें जें मौन धारण केलेलें आहे तें त्याच्या सत्यतेस प्रमाणभूत असल्यानें त्याविषयीं विचार करणें हें किती महत्त्वाचें आहे! ख्रिस्ती धर्मांत ज्या गोष्टींचा खुलासा केलेला नाहीं त्या कोणत्या हें पाहणें फारच चित्तवेधक आहे.

**ख्रिस्ती धर्मांत कांहीं विषयांचें शिक्षण मिळत नाहीं.**

आह्मांस तत्त्वज्ञानी बनविणें, विद्या शिकविणें, तसेंच भूगोल, भूगर्भशास्त्र, शारीर, वैद्यक, ज्योतिष आदिकरून शास्त्रांत पारंगत करणें यांचा ख्रिस्ती धर्म पतकर घेत नसून त्या त्या शास्त्रांतील उपपत्तीचा निर्णय ठरविणें हेंही आपलें काम नाहीं अशी त्या शास्त्राची समज आहे. प्रसंगोपात्त त्यांचा उल्लेख केलेला यदाकदाचित् आढळलाच तर हट्टवादानें ते स्थापित करण्याच्या भरीस तो धर्म पडत नाहीं. मानसशास्त्रांविषयींही तसेंच मौन धारण केलेलें आहे. बायबल हा केवळ धर्मग्रंथ आहे. तसेंच, धर्माशीं ज्या विषयांचा संबंध असून त्यांविषयीं खुलासा मिळण्याची अन्यत्र खटपट चाल-

---

[१] ज्या ज्या धर्मांत पुष्कळशीं क्रियाकर्में सांगितलीं आहेत ते सर्व खोटे आहेत असें आह्मी प्रतिपादन करीत नाहीं. यहूदी धर्मांत तीं असून त्या धर्माची गोष्ट हिंदु धर्माहून वेगळी आहे. पहिलें कारण हें कीं यहूदी धर्म हा भावी ख्रिस्ती धर्माचीं साधनें तयार करणारा असा होता. ह्मणूनच त्या धर्मांतील क्रियाकर्में हीं सूचक होतीं ह्मणजे भावी ख्रिस्ती धर्माचें स्वरूप व महती यांविषयीं भविष्य कथन करणारीं अशीं होतीं. दुसरें कारण, यहूदी धर्मांतील क्रियाकर्में बालिश नव्हतीं. सोमरस, घृत आणि यज्ञसामुग्री यांसच महत्त्व देऊन जें हास्यास्पद वर्णन वेदांत भरलेलें आहे त्याचा लवलेश सुद्धां जुन्या करारांत नाहीं. तिसरें कारण, "यज्ञापेक्षां मला दया आवडती," "यज्ञापेक्षां आज्ञापालन बरें आहे," अशा वचनांवरून हें व्यक्त होतें कीं यहूदी धर्मांत नीतितत्त्व थोर मानलें असून कर्मांस गौणत्व दिलें आहे. Davison on Prophecy या ग्रंथाचें चौथें प्रकरण पहावें.

लेली आहे अशा कित्येक इतर गोष्टींविषयीं देखील बायबलांत मुळींच चर्चा केलेली नाहीं. मनुष्याचें कर्तव्य व तसेंच धर्मसंबंधी अत्यावश्यक विषयांचा मात्र खुलासा बायबलांत फारच स्पष्टपणें केला आहे. ज्या केवळ काल्पनिक व ज्यांकडून मनुष्याची जिज्ञासा मात्र तृप्त होते असे विषय ख्रिस्ती शास्त्रांतून बुद्धिपुरस्सर गाळले आहेत. आतां हें सहजगत्या घडून आलें असें मुळींच नसून मनुष्यांनीं आपल्या बुद्धिचातुर्यानें हे विषय शास्त्रांतून गाळले असें ह्मणावें तर तेंही संभवत नाहीं.

पुढील महत्त्वाच्या गोष्टींविषयीं व तशाच अनेक धर्मसंबंधीं गोष्टींविषयीं ज्ञान प्राप्त करून घेण्याची जिज्ञासा व तें ज्ञान इतरांस प्राप्त करून देण्याचा प्रयत्न करण्याची मनुष्यमात्राची प्रवृत्ति सर्वकाळीं चालत आलेली आहे. ईश्वराचें अस्तित्व, त्यानें सृष्टि कशी निर्माण केली, आत्मा व शरीर यांचा संबंध, मरणोत्तर आत्म्याची स्थिति, देवदूत, त्यांचे वर्ग, त्यांचें वसतिस्थान व त्यांचे व्यवसाय, तसेंच स्वर्गांतील सुख व नरकांतील यातना यांचे प्रकार व या विश्वांतील इतर गोलांची व्यवस्था कशी काय आहे इत्यादि शेंकडों प्रश्न मनुष्याचे मनांत घोळत असतात. ज्या गोष्टी मनुष्याच्या अटकळी बाहेरच्या आहेत व ज्यांपासून तादृश फायदाही नाहीं त्यांविषयीं उगीच काथ्याकूट करणें हें चांगलें नाहीं, असा बेकननामक तत्त्ववेत्त्याचा सिद्धांत पाश्चिमात्य विश्वविद्यालयांतून पसरल्यामुळें पुष्कळ सुशिक्षित लोक त्याचें अनुकरण करूं लागले आहेत हें जरी खरें तरी साधारण लोकांची प्रवृत्ति या गोष्टींकडे आहे ती आहेच.

**नवा करार** ज्या काळीं लिहिला त्या वेळेस तर ही प्रवृत्ति फारच प्रबळ होती. त्या काळच्या धर्मपुस्तकांतून या प्रश्नांचा ऊहापोह ठिकठिकाणीं केलेला आपण पहातों. हे विषय बायबलांत तर मुळींच नाहींत हें किती आश्चर्याचें आहे! आधुनिक तत्त्वज्ञान्यांसारखे बायबलाचे लेखक होते, किंवा त्यांचीं मनें ईश्वरानेंच प्रकाशित केलीं होतीं या दोहोंतून कोणतें तरी एक गृहीत केल्याशिवाय या गूढ गोष्टीचा निकाल लागणार नाहीं. परंतु **नवा करार** लिहिणारे हे जर तत्त्वज्ञानी नव्हते तर ईश्वराची प्रेरणा त्यांस झाली असावी असें मानणें भाग पडतें.

ईश्वरास जर भविष्यज्ञान आहे तर एखादी गोष्ट मनुष्यानें करावी किंवा न करावी याची जबाबदारी मनुष्यावर कां असावी, अशा मानसशास्त्रासंबंधी कित्येक तत्त्वांचा उलगडा करण्याची पुष्कळांस फारच हौस असते, परंतु या गूढ गोष्टीचा निकाल लावण्याच्या भरीस ख्रिस्ती धर्म बिलकुल पडत नाहीं.

वर सांगितलेल्या बाबदींत इतर धर्मांतून पुष्कळ दोष सहज दाखवितां येतील. हिंदु, बौद्ध, फारशी, व महमदी धर्मग्रंथांतील स्वर्ग व नरक यांचीं वर्णनें वाचून पाहिलीं असतां त्यांचा विपर्यास लागलींच लक्ष्यांत येतो व तीं तिरस्करणीय वाटूं लागतात.[१] याशिवाय कित्येक फारच गहन अशा आध्यात्मिक विषयांवर त्या त्या ग्रंथांतून लिहिण्याचें धाडस

---

१ अशीं वर्णनें बायबल खेरीजकरून इतर सर्व धर्मग्रंथांत ओतप्रोत भरलेलीं आहेत.

केलेलें आहे. महमदी धर्मांत नशीबावर भरंवसा ठेवण्यास सांगितलेलें आहे तें अजीबात चुकीचें असून वरील गोष्टीचें प्रत्यंतर आहे हें दिसून येईल.

बायबल खरें आहे याविषयीं वरील निरूपणानें तुमची इतक्यांत खातरी होईलसें मला वाटत नाहीं. ज्या प्रकारें हिंदु धर्मग्रंथांतून ज्योतिषादि शास्त्रें शिकविण्याचा आव घातला आहे तसा बायबलांत प्रकार असता तर बरें झालें असतें, असा तुमचा समज होण्याचा संभव आहे. शास्त्रीय विषयांत तुमचा प्रवेश जसजसा अधिकाधिक होईल ततसतसें प्रस्तुत पुराव्याचें महत्त्व तुमच्या लक्ष्यांत आल्यावांचून रहाणार नाहीं. असोः पुढील सिद्धांत तुह्मांस मान्य होतील अशी माझी उमेद आहे. पहिला सिद्धांत—ज्या शास्त्रीय गोष्टी शोधून काढण्यापुरती शक्ति मनुष्याचे आंगीं आहे त्या ईश्वरानें प्रगट करणें अगत्याचें नाहीं, ह्मणूनच तो तसें करील हें संभवत नाहीं. दुसरा सिद्धांत—जरकरितां ईश्वरी प्रेरणा न झालेल्या लोकांनीं बायबल लिहिलें असतें तर अर्थात्‌च त्या ग्रंथांतून तत्कालीन प्रचलित असलेलें सिद्धपदार्थविज्ञान व मानसशास्त्र यांतील तत्त्वविचार आढळले असते; आणि ते अगदींच सदोष असते, हें उघड आहे.

हे तात्त्विक व शास्त्रीय विचार ज्याअर्थीं बायबलांतून अजिबात गाळलेले आहेत त्याअर्थीं तो धर्मग्रंथ ईश्वरदत्त आहे हें अगदीं निर्विवाद होय.[१]

**ख्रिस्ती धर्म सार्वत्रिक होण्यास पात्र आहे.**

९. ख्रिस्ती धर्म सार्वत्रिक होण्यास पात्र असल्यामुळें तो इतर ईश्वरदत्त मानलेल्या धर्मांहून विशेष योग्यतेचा आहे. अशी त्या धर्माची प्रतिज्ञा आहे एवढेंच केवळ नव्हे, तर त्याप्रमाणें खरोखरीं तो तसाच आहे. ज्ञानी व अज्ञानी, श्रीमान व गरीब, पुरुष व स्त्रिया, या सर्वांस उद्देशून ह्या धर्माचें सांगणें आहे. मग ते कोणत्याही देशांतले असोत. मोठमोठ्या राजांस ख्रिस्ती धर्मानें जसें अंकित करून सोडलें आहे तसेंच अगदीं भिकार झोंपड्यांतून राहणारे जे न्यू झीलंड किंवा पोलिनीशिआ येथील रहिवाशी त्यांस देखील सन्मार्गप्रवर्तक करण्यास तो धर्मच कारण झाला आहे. जसजसा ख्रिस्ती धर्माचा प्रसार होत जाईल ततसतसें मानवजातीचें सुख वृद्धि पावेल. ख्रिस्ती धर्म फार सुबोध असल्यामुळें तो सर्वांच्या अंतःकरणांस पटतो. फार तर काय पण एकीकडे पाहावें तों न्यूटनसारख्या विद्वानांचीं मनें त्या धर्मामुळें उन्नत झालेलीं आहेत, आणि दुसरीकडे पहावें तों त्यामुळेंच लहान बालकांस देखील मरणसमयीं अभय व आनंद प्राप्त झालेला आहे.

---

[१] यहूदी लोकांस शास्त्रीय किंवा तत्त्वज्ञानाच्या गोष्टींची आवड नसल्यामुळें अशा गोष्टी त्यांच्या ग्रंथांतून येण्याचा संभव नाहीं. याकरितां वरील प्रमाण कांहीं उपयोगाचें नाहीं असें कित्येकांचें ह्मणणें आहे. परंतु सर्व राष्ट्रें, मग तीं कितीही रानटी स्थितींतलीं असोत, सृष्टीमधील अद्भुत गोष्टींविषयीं त्यांचा कोटिक्रम कांहींना कांहीं असतोच. मानसशास्त्रांतील गहन गहन गोष्टींचा सिद्धांत ठरविणें हें मनुष्यास मुळींच दुरापास्त असूनही त्याविषयीं अगदीं अडाणी लोक सुद्धां ऊहापोह करीत असतात हें सर्वत्र विश्रुत आहेच.

हेंच काय तें खऱ्या धर्माचें इंगित. यावत् धर्मांमध्यें केवळ एकच धर्म खरा असला पाहिजे; व एशिआ, यूरोप व आफ्रिका या खंडांमध्यें परस्परविरुद्ध असे धर्म ईश्वर प्रगट करील हें मुळींच संभवत नाहीं.

स्त्रियांचें महत्त्व.

१०. पृथ्वीवर स्त्री व पुरुष समसमान असून स्त्रियांचे आचरणाशीं पुरुषजातीच्या सुखदुःखाचा संबंध जोडलेला आहे; त्या अर्थीं स्त्रीजातीबद्दल जर कदाचित् चुकीचा ग्रह होऊन बसला तर त्यापासून एकंदर समाजाचें सर्वस्वी नुकसान होणार आहे. याकरितां विवाहसंबंध व कुटुंबांतील माणसांचा परस्पर संबंध यांविषयीं कोणत्या एखाद्या धर्मांत जे विचार प्रगट केलेले असतात त्यांविषयीं विचार करणें हें विशेष अगत्याचें आहे. ख्रिस्ती धर्म खेरीजकरून इतर कोणत्याही धर्मांत स्त्रीजातीस योग्य मान दिलेला आढळून येत नाहीं. कन्या, भार्या, अथवा माता या नात्यानें स्त्रीचे जे हक्क आहेत ते स्त्रियांस हिंदु धर्मापासून मिळत नाहींत, आणि महमदी धर्मांत तर या हक्कांची अगदींच पायमल्ली झालेली आहे, हें आपण पाहतों. असें होण्यास मुख्य कारण म्हटलें म्हणजे त्या धर्मांत अनेक बायका करण्याची व बायकांस हवे त्या वेळेस सोडचिठी देण्याची पूर्ण मुभा आहे.

पुरुष व स्त्री देवाला सारखींच असून लग्नामुळें त्यांचा जो शरीरसंबंध जडतो तो पवित्र आहे असें बायबलांत लिहिलेलें आहे. "जशी ख्रीस्तानें मंडळीवर प्रीति केली" तशी पतिपत्नी यांत प्रीति असली पाहिजे; आणि "बायकोनेंही आपल्या नवऱ्याचा मान राखला पाहिजे," याप्रकारें स्त्रीपुरुषांस विवाहप्रसंगीं बायबलास अनुरूप उपदेश करण्याचा परिपाठ ख्रिस्ती समाजांतून आहे.

पारशी लोक एकपत्नीव्रत पाळणारे आहेत यामुळें त्यांची स्तुति केल्यास वाजवी होणार आहे. हिंदु व मुसलमान लोकांपेक्षां त्यांच्यांत स्त्रियांस जास्त मान मिळतो तरी बायबलांत स्त्रियांची जितकी प्रतिष्ठा मानलेली आहे तितकी आवेस्ता म्हणून जो पारशांचा धर्मग्रंथ आहे त्यांत नाहीं.

फक्त ख्रिस्ती धर्माविषयींचीं प्रमाणें सर्वांस पटण्याजोगीं आहेत.

११. सर्वांच्या मनास पटतील अशीं प्रमाणें ख्रिस्ती धर्माविषयीं मिळत असल्यामुळें तो इतर सर्व धर्मांहून विशेष आहे. कोणतीही गोष्ट प्रमाणांवांचून मान्य करणें व वाडवडिलांच्या चालींरीतींस निःशंकपणें अनुसरणें हें ख्रिस्ती धर्मास प्रशस्त नाहीं. कोणत्याही गोष्टीवर आपली श्रद्धा असण्याचें कारण आपल्यास ठाऊक असलेंच पाहिजे. ख्रिस्ती धर्म सत्य असल्याचीं जीं प्रमाणें आहेत तीं इतकीं व निरनिराळ्या प्रकारचीं आहेत कीं त्यांतील कित्येक सर्वांच्या लक्ष्यांत येण्यासारखीं आहेत. कोणीही ख्रिस्ती मनुष्य मग तो कितीही गरीब असो त्यास आपल्या धर्माच्या सत्यतेबद्दल जीं प्रमाणें आहेत त्यांचा सयुक्तिकपणा सहज उपलब्ध होण्यासारखा आहे.

**आपला मित्र—.**

# पत्र अकरावें.

## अनुभविक प्रमाण.

अनुभविक प्रमाण—या प्रमाणाचें महत्त्व—तें प्रांजलपणें पहाणारांस सुगम्य—त्याच्या दोन शाखा—ख्रिस्ती धर्म महौषधि आहे—तिचा अनुभव घेऊन पहा—आमच्या रोगाचें निदान बायूबलांत यथातथ्य केलें असून त्यावर उपचार सांगितला आहे—गुण आल्याचीं हजारों उदाहरणें—"मागा ह्मणजे तुह्मांस मिळेल"—ही कसोटी सुलभ—तीस लावून पहाण्याचें अगत्य.

**प्रिय मित्र—,**

अनुभविक प्रमाण.

ह्या पत्रांतून शंकानिवृत्ति होईल अशा प्रकारें ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयींचीं प्रमाणें सांगणें जितकें इष्ट आहे, तितकेंच तीं संक्षेपानें सांगणें हेंही अगत्याचें आहे. फार विस्तार केल्यास तुह्मी व इतर वाचक कंटाळून जाऊन या विषयाचा मुळींच विचार करणार नाहींत असेंही होण्याचा संभव आहे व त्यामुळें माझे सर्व श्रम जागचे जागींच राहतील. आतां अनुभविक प्रमाणाविषयीं जितकें अत्यावश्यक आहे तितकेंच सांगतों. कारण हा भाग गाळला तर या विषयाचें प्रतिपादन पूर्णपणें झालेंसें होणार नाहीं.

अनुभविक प्रमाणाची योजना व महत्त्व.

ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेचीं बरींच प्रमाणें सर्वांच्या लक्ष्यांत येण्याजोगीं सुलभ आहेत; व त्यामुळें तो धर्म विशेष महत्त्वाचा आहे असें मीं मागील पत्रांत विधान केलेलेंच आहे. आपण ज्या गोष्टीवर विश्वास ठेवतों तिचीं कारणें सांगतां न येऊन उगीच अविचाराचा दोष आपल्या पदरीं घ्यावा हें बरोबर नाहीं. ह्मणून बायबलांत "अवघ्यांची पारख करा व जें चांगलें तें धरा" असा उपदेश केला आहे. तथापि ख्रिस्ती धर्मास अद्भुत चमत्कार, भविष्य व इतिहास यांवरून जीं प्रमाणें मिळतात तीं सर्वांना सारखींच समजतील असें मात्र नाहीं. कारण विद्वत्तेशिवाय त्यांपासून निघणारीं अनुमानें व त्यांची योग्यता कळणार नाहीं. आतां वर जीं प्रमाणें सांगितलीं त्यांशिवाय जर इतर प्रमाणें नसतीं तर ख्रिस्ती मंडळीला ख्रिस्ती धर्मावर आपला विश्वास असल्याबद्दलचीं कारणें देतां आलीं नसतीं. पूर्वापार हा धर्म चालत आला आहे किंवा आमचे धर्माधिकारी सांगतात ह्मणून आमचा या धर्मावर विश्वास आहे असें त्यांस ह्मणावें लागलें असतें. बायबलांतील चमत्कार, भविष्य व इतिहास यांवरून जीं प्रमाणें मिळतात तीं ज्यांचीं मनें ज्ञानानें सुसंस्कृत झालीं आहेत त्यांची खातरी करण्यास पुरीं आहेत, परंतु जे सुशिक्षित नाहींत त्यांस त्यांचें मर्म समजावें कसें?

अनुभविक प्रमाण सर्वांच्या लक्ष्यांत येण्यासारखें आहे.

परंतु ख्रिस्ती धर्माचें अनुभविक प्रमाण असें नाहीं. तें गरिबगुरिबांस व गांवढळांसही समजण्याजोगें आहे. कारण ते आस्थेवाईक व सरळ मनाचे असतात. सुशिक्षित लोक तसे नसल्यामुळें त्यांस त्याचें इंगित समजणें कठीण. ह्मणूनच हें प्रमाण एखाद्या पंडिताहून नांगऱ्याच्या लक्ष्यांत चटकन उतरतें. हें प्रमाण समजून घेण्यास बुद्धिमानापेक्षां नीतिप्रिय मनुष्य अधिक उत्तम, कारण अंतःकरणाचा कठीण, स्वार्थपर, प्रापंचिक, धर्मभ्रष्ट असा न्यूटनसारिखा जरी बुद्धिमान् पुरुष असला तरी त्याला याचा काय उपयोग! परंतु जर कोणी मनाचा कोमल, सालस, सत्यप्रिय व धार्मिक असला तर पुरे. त्यानें जरी कधीं पांढऱ्यावर काळें केलेलें नसलें तरी हें प्रमाण त्यास सहज समजेल.

या विषयाचे दोन भाग करण्याचें मीं योजिलें आहे. पहिला भाग **स्वानुभव** व दुसरा भाग **इतरांचा अनुभव**. वरील विवेचन पहिल्या भागास अनुलक्षून आहे हें वाचकांच्या लक्ष्यांत सहज येईल.

## भाग पहिला.

कसोटी.

एखाद्या संकटाचे निवारणार्थ किंवा इच्छित हेतु सिद्धीस नेण्यासाठीं कोणीं कांहीं उपाय सांगितला तर त्याचें परीक्षण करण्याकडे आपली साधारणतः प्रवृत्ति होते. जर आपणांस संस्कृत भाषेचा अभ्यास कर्तव्य आहे तर ती गीर्वाण भाषा फारच कठीण, ती आपल्यास कोठून येणार वगैरे अडचणींचा विचार न करितां आपण लागलींच तिच्या व्यासंगास लागून ती भाषा आपल्यास साध्य होते कीं काय हें आपण पहातों. तद्वत्‌च ख्रिस्ती धर्माची कसोटी पहाणें आहे, तर त्या उद्योगास लागलें पाहिजे.

तुह्मी आजारी आहां अशी कल्पना करा. पुष्कळ वैद्यांचीं औषधें घेऊन घेऊन थकल्यामुळें कोणी कांहीं योजना तुमच्या रोगावर करूं लागल्यास तिजविषयीं तुह्मांस तिटकारा यावा हें साहजिक आहे. परंतु तुमच्या स्नेह्याच्या खातरीचा वैद्य येऊन तुमच्या रोगाचें निदान ठरवून तुह्मांस बरें करण्याविषयीं छातीस हात लावूं लागला तरी देखील तुमचें मन साशंक राहीलच. परंतु मित्राच्या आग्रहास्तव त्या वैद्याचा उपचार चालविला आणि त्यापासून तुह्मांस गुण आला असें झालें तर त्या वैद्यावर तुमची भक्ति बसेल कीं नाहीं? अर्थात्‌च बसेल. ह्याच वैद्याविषयीं जर कोणी कांहीं कुत्सित गोष्टी सांगूं लागला तर तुमची खातरी झाल्यामुळें त्या तुह्मांस खपणार नाहींत.

वरील दृष्टांत ख्रिस्ती धर्मास अक्षरशः लागू पडतो. ह्मणजे पहा, तुमचा आत्मा हा कोणी रोगी आणि त्या रोग्यास ख्रिस्त हा वैद्यराज भेटून औषध देत आहे. तुमचे मनास विकार झाला आहे, तुह्मी मृत्युपंथास लागलां आहां, तुमच्या बुद्धीला भ्रंश झाला आहे, तुमचें अंतःकरण भ्रष्ट झालें आहे. हिंदु धर्म किंवा महमदी धर्म जें औषध या विकारासाठीं देतात तें तुह्मीं घेऊन पाहिलें आहे, परंतु त्यापासून कांहीं गुण आल्याचा तुह्मांस अनुभव नाहीं. मग वरील दृष्टांतांतील वैद्याप्रमाणें ख्रिस्ती धर्माविषयीं कोणी मित्र तुह्मांस सांगूं लागून त्यानें आपला अनुभवही कळविला. तरी देखील त्याच्या बोलण्यावर तुमचा विश्वास बसत नाहीं. हा मित्र हल्लीं ख्रिस्ती असून पूर्वीं अन्यधर्मी होता. त्यानें आपला अन्यधर्मीतील अनुभव तुह्मांस सांगून ख्रिस्ती धर्माची फारच प्रशंसा केली. तेव्हां त्याच्या सांगण्याप्रमाणें तुह्मींही या वैद्याचें सहाय मागितलें आणि त्यापासून परिणाम काय झाला तो पहा.

ख्रिस्ती धर्म महौषधि आहे.

१. या वैद्यानें आमच्या रोगाचें निदान ठरवून तत्संबंधीं सर्व प्रकारचीं लक्षणें सांगून टाकलीं. बायबलांत आमच्या नैतिक स्थितीचें जें यथातथ्य वर्णन केलें आहे तेंच हें. तें वाचून पहातां आमची संशयनिवृत्ति होऊन गैरसमज होण्यास जागाच रहात नाहीं. मनुष्यास न रुचणाऱ्या अशा अनेक गोष्टी बायबलांत स्पष्टपणें सांगितल्या आहेत आणि तशांत त्या खोट्या असत्या तर त्यांचें विदारण केव्हांच झालें असतें. जर बायबलांत आपल्यापासून दूर असणाऱ्या जगाविषयीं वर्णन असतें तर तें कितपत खरें आहे हें ठरविण्यास बरेंच कठीण पडतें; परंतु हातच्या कांकणास आरसा कशास पाहिजे ? याप्रमाणें आमच्या मनोविकारांविषयीं लिहिण्याचें बायबलानें पतकरल्यामुळें त्याची प्रचीति सहज मिळते. जर बायबलांतील वर्णन गूढ असून चटकदार व मनोरंजक शब्दांनीं व्यक्त केलेलें असतें तर कित्येक गोष्टींविषयीं तुह्मांस भुरळ पडून खऱ्याखोट्याचा शोध तुह्मांस लागताना; परंतु तसा प्रकार त्यांत नसून लहान सहान चूक किंवा अतिशयोक्तीचा त्यांत शिरकाव बिलकुल झालेला नाहीं. यामुळें छिद्र पहाणारास त्यांत व्यंग दाखविण्यास मार्गच उरला नाहीं.

रोगाचें निदान बायबलांत केलेलें आहे.

यावत् मनुष्यजाति जन्मतः ईश्वरपराङ्मुख असल्यामुळें तिचें पुनरुज्जीवन होणें अत्यावश्यक आहे. हा दोषारोप जबरदस्त असून त्यांतून अंग काढून घेण्यास मनुष्यानें प्रयत्न केल्यास नवल नाहीं; आणि ह्मणूनच बायबल वाचतांच हा दोषारोप दृष्टीस पडून त्याच्या पायाची आग मस्तकास जाते व त्यामुळें तो ग्रंथ त्यानें फेंकून दिल्यास नवल तें काय ! कोणा मनुष्याची प्रकृति निकोप असल्याची खातरी असून जर कोणी त्यास कुष्ठरोगी ह्मणूं लागला तर त्यास संताप येणार नाहीं काय ? तद्वत् बायबलांतील दोषारोप वाचल्यावर कित्येकांचा संताप होणें साहजिक आहे. परंतु शहाणा मनुष्य असें करणार नाहीं. तो याचें

कारण शोधण्याच्या खटपटीस लागून आपल्या अंतःकरणाची पारख करील व बायबलांत सांगितलेल्या गोष्टी अंतःकरणाशीं लावून पाहील.

आपल्या नैतिक स्थितीसंबंधानें बायबलांत जें सांगितलें आहे, तें कितपत खरें आहे याचा अनुभविक प्रमाणाच्या पहिल्या भागांत समावेश होतो. आमच्या नैसर्गिक स्थितीचें स्वरूप बायबलांत हुबेहूब सांपडतें. एकदा कोणीं एका गृहस्थानें बायबल वाचण्यास आरंभ केला, आणि वर सांगितल्याप्रमाणें त्यांतील गोष्टींचा आपल्या अंतःकरणांतील गोष्टींशीं मेळ पाहूं लागला, तों त्यांत त्यास इतकें साम्य दिसून आलें कीं बायबलांतील वर्णन आपल्याच अंतःकरणाचें प्रतिबिंब आहे, ह्मणून तो आश्चर्यचकित होत्साता आपणाशींच ह्मणालाः "यावरून मनुष्याचें चरित्र तो जन्मास येण्यापूर्वीं कथन करितां येईल असें दिसतें." आपल्या मनांतील गुप्त गोष्टी या प्रकारें आधींच लिहून ठेवलेल्या वाचून त्या खोट्या आहेत असें ह्मणण्याचें त्याचें धाडस होईना, ह्मणजे त्या मान्य करणें त्यास भाग पडलें.

यांप्रमाणें बायबलांत रोगाची चिकित्सा केलेली आहे, एवढेंच केवळ नाहीं तर त्यावर

बायबलांत उपचार सांगितला आहे.

उपचारही सांगितलेला आहे, ह्मणून निराश न होतां भाव ठेवून सांगितलेल्या उपायाचें अवलंबन केल्यास गुण खातरीनें येईलच असें त्यांत आश्वासन आहे.

अनुभव घेऊन पहा.

सांगितलेला उपचार जर आह्मीं भक्तिपूर्वक करून पाहिला आणि त्यापासून गुण मुळींच आला नाहीं असें झालें तर हातीं घेतलेलें काम शेवटास नेण्यास वैद्यराज समर्थ नाहींत असें आपल्यास वाटूं लागेल. वैद्याला कदाचित् रोगपरीक्षा झाली असेल, परंतु तो बरा करण्याची कुशलता त्याच्या ठायीं नाहीं असें ह्मणणें प्राप्त होईल. परंतु जर करितां वैद्यानें सांगितलेला उपचार श्रद्धापूर्वक चालविला व त्यापासून गुण पडत चालला व त्याच्या सांगण्याप्रमाणें प्रचीति आलीही तर मग वैद्यबोआच्या कुशलतेविषयीं व औषधाच्या योग्यतेविषयीं शंकाच बाळगायाला नको. रोग नाहींसा झाला हेंच प्रमाण पुरें आहे.

याच प्रकारचा अनुभव आपल्यास आला असें शांतपणानें व खातरीनें सांगणारे लक्षावधि लोक आहेत. त्यांस पूर्वीं रोग झाला होता परंतु या घटकेस ते रोगमुक्त आहेत. त्यांस पूर्वीं दिसत नव्हतें तें आतां दिसूं लागलें आहे. त्यांच्या अंतःस्थितींत अगदीं पालट झालेला आहे. बायबलांत सांगितल्याप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं मागितलें त्यांस मिळालें. पूर्वीं त्यांस ज्या प्रकारची ईश्वराची भीति होती तशी आतां उरली नसून उलटें त्यांचे ठायीं त्याविषयीं प्रेम जडलें आहे. पूर्वीं मृत्यु व मरणोत्तर स्थिति यांची गोष्ट काढली कीं त्यांच्या सर्वांगास कंप सुटत असे; पण आतां त्याच गोष्टीविषयीं निर्भय होत्साते ते आनंदानें विचार करितात. "ख्रीस्ताचा अंगीकार कर ह्मणजे होणार क्रोधाचा भयंकर साक्षात्कार नाहींसा होईल" या शास्त्रवचनाचा अनुभव ज्यांनीं ख्रिस्तास अंगीकारिलें आहे

त्यांस आला आहे. बायबलांत आणखी असें सांगितलें आहे कीं "ख्रीस्ताचा अंगीकार कर ह्मणजे सर्व कांहीं नवें होईल, ह्मणजे नवीन विचार, नवीन इच्छा, नवीन भावना, नवीन आशा, हृदयाचे ठायीं उत्पन्न होतील." हें देखील भक्तांच्या प्रत्ययास आलेलें आहे. याप्रमाणें बायबलांतील सर्व वचनें भविष्यादाखल आहेत; व तीं प्रत्ययास आल्यामुळें बायबल हें सर्वज्ञ व सर्वसाक्षी जो परमेश्वर त्यापासूनच निघालें असें ह्मणावें लागतें.

या महत्त्वाच्या विचारावर आणखी विवेचन करणें जरूर दिसतें. पापाविषयीं दोन गोष्टी लक्ष्यांत ठेविल्या पाहिजेत. पहिली, पापाचा दोष, ज्याबद्दल ईश्वर न्यायी असल्यामुळें शासन पाहिजेच हें उघड आहे. दुसरी गोष्ट पापाचा अंतःकरणास डाग, ज्यामुळें मनुष्य भ्रष्ट झाला आहे ती.

सदसद्विवेक ह्मणून जी फार थोर व उदात्त मनःशक्ति आहे ती देवाच्या प्रतिनिधी-रूपानें मनुष्याचे ठायीं वसत आहे. परंतु रागादि मनोविकाराच्या भरांत या मनोदेव-तेच्या सूचनेकडे कोण लक्ष्य देतो! अंतःकरणांत मनोदेवता व मनोविकार यांचा झगडा चालून मनोदेवतेस हार खाणें भाग पडतें; तथापि ती पराभव पावत नसून आपला पगडा पाप्यावर बसवून त्यास ताळ्यावर आणिते. ग्रंथांतरीं याबद्दलचें वर्णन फारच हृदयभेदक आहे.[१] तसेंच, ज्यांचे हातून मानवी कायद्याप्रमाणें गुन्हा घडलेला नाहीं त्यांचीही मनःसाक्ष अशीच आहे कीं आपण देवाच्या घरीं गुन्हेगार आहों. अशी टोंचणी एकदा लागल्यावर क्षमा कोठें मिळेल असे उद्गार त्यांच्या तोंडांतून आल्यावांचून रहाणार नाहींत. परंतु अशांस भिण्याचें कारण नाहीं; कारण कीं "देवानें जगावर एवढी प्रीति केली आहे कीं त्यानें आपला एकुलता एक पुत्र दिला यासाठीं कीं जो कोणी त्यावर विश्वास ठेवितो त्याचा नाश होऊं नये तर त्यास सर्वकालचें जीवन प्राप्त व्हावें!" याला ह्मणावें शुभवर्तमान. कारण हें खरोखरींच शुभवर्तमान आहे, व ज्याची या वचनावर श्रद्धा आहे त्याचा ख्रिस्त अंगीकार करून त्यास क्षमा करील. मग अर्थातच होणाऱ्या न्यायाचें जबरदस्त भय त्याचे मनांतून निघून जाऊन लवकरच भक्तीच्या योगानें त्यास आनंद व शांति यथेच्छ प्राप्त होतात.

पापाच्या दोषामुळें मनुष्य भ्रष्ट होतो हें यापूर्वीं सांगितलेंच आहे. ख्रीस्त केवळ पापाची क्षमा करितो इतकेंच नाहीं तर पापाच्या दोषाचें परिमार्जनही करितो. कारण "त्यानें पश्चात्ताप व पापाची क्षमा द्यावी, म्हणून त्याला उंच करून राजा व तारणारा केलें आहे."[२] मनुष्याचें अंतःकरण व मति पालटून त्याच्या बुद्धीचा तो विकास करितो. याविषयीं बायबलांत या प्रकारें ह्मटलें आहे. "जर कोणी ख्रिस्ताकडे आहे तर तो नवा उत्पन्न आहे, जुनीं होऊन गेलीं, पाहा, अवघीं नवीं झालीं आहेत." अशा प्रकारें ज्याचे

[१] इंग्रजी भाषेंत शेक्सपीअर कवीचीं मॅक्बेथ व रिचर्ड द थर्ड हीं नाटकें प्रत्यया-करितां पहा.

[२] प्रे० कृ० ५: ३१. २. करिंथ. ५: १७.

ठायीं पालट झाला तेंच खरें स्थित्यंतर; ह्मणजे अशा मनुष्याचे हेतु, इच्छा, बेत, आशा व आवड हीं सर्व बदलून जाऊन ज्या गोष्टी त्यास पूर्वीं आवडत होत्या त्यांचा तो हल्लीं कंटाळा करितो व ज्यांविषयीं त्यास पूर्वीं तिटकारा होता त्यांच्यामागें तो लागतो. याचा इत्यर्थ हाच कीं अशा मनुष्याचा "पुनर्जन्म झाला" किंवा तो "वरून जन्म पावला," किंवा "देवापासून झाला" ह्मणजे देवाचें लेंकरूं झाला, असें समजावें.

हें जग नुस्तें पापमय नसून दुःखमयही आहे. दुःखाची वांटणी तर सर्वांच्या पदरीं असून कित्येक तर त्या ओझ्यानें अगदीं दडपून गेले आहेत. परंतु अशांस निराश होण्याचें कारण नाहीं. कारण पापापासून मुक्त करण्यास ख्रिस्त जसा पूर्ण समर्थ आहे तसाच तो दुःखाचा परिहार करण्यासही पूर्णपणें समर्थ आहे असें त्याविषयीं बायबलांत ह्मटलें आहे. "अहो कष्टकरी व ओझ्यानें लादलेले, तुह्मी सर्व माझ्याजवळ या, ह्मणजे मी तुह्मांस विसांवा देईन" असें त्याचें आश्वासन असून बायबलांत "तो भग्न मनाच्यांस बरें करितो, आणि त्यांच्या क्षतांस पट्टी लावून बांधतो" असें आणखी एक वचन आहे. या भूलोकीं जेव्हां तो होता तेव्हां ज्याला ज्याला ह्मणून शारीरिक किंवा मानसिक पीडा असे त्याविषयीं त्यास द्रव उत्पन्न होत असे, पण हल्लीं तो स्वर्गांत असूनही त्याला "आमच्या दुर्बलतेचा कळवळा येतो" असा तो आहे असें बायबलांत त्याविषयीं ह्मटलें आहे. हें जर खरें तर हा केवढा चमत्कार! दुःखाचा परिहार कसा करावा हें एकव्या ख्रिस्ती धर्मावांचून इतर सर्व धर्मांच्या गांवींही नाहीं. बुद्ध हा खरोखरींच फार दयार्द्र अंतःकरणाचा होता, परंतु दुःख भोगल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी त्याची समजूत असल्यामुळें दुःखितांस ईश्वरापासून समाधान मिळतें हें त्यास सांगतां आलें नाहीं. ही केवढी दुःखाची गोष्ट! परंतु ख्रिस्ताचे ठायीं समाधानाचें फारच अमोल्य भांडार आहे, असा ख्रिस्ती लोकांचा सर्वकाळीं अनुभव आहे. पौलस नामक प्रेषिताचें सर्व आयुष्य संकटांत गेलें, तथापि तो दुःखाविषयीं "जशीं ख्रिस्ताविषयींचीं दुःखें आह्मांस पुष्कळ होतात, तसें ख्रिस्ताकडून आमचें सांत्वनही पुष्कळ होतें" असें ह्मणाला. अशी साक्ष एकव्या पौलसाचीच नाहीं तर हजारों लोकांची आहे. कारण ही गोष्ट त्यांच्या प्रत्ययास आली आहे. शोकाचा प्रसंग यापूर्वीं तुह्मांवर कधीं तरी आलाच असेल; नसला तर पुढें मागें कधीं तरी त्याशीं प्रसंग पडेलच. अशा वेळीं तुह्मांस समाधान कोठून प्राप्त व्हावें? यास माझें उत्तर इतकेंच कीं ख्रिस्तावांचून अन्यत्र शांतीचें ठिकाण नाहीं. आपल्या पापाची क्षमा होऊन आपण शुद्ध व्हावें याकरितां त्याजकडे जा अशी जेव्हां जेव्हां मी तुमची विनवणी करितों तेव्हां पापाविषयीं तुमच्या मनांत तिटकारा नसल्यामुळें माझें सांगणें तुह्मांस रुचत नसेल. ज्या ज्या वेळीं तुह्मी दुःखानें व्याप्त होतां त्या त्या वेळीं आपलीं दुःखें त्याच्यापुढें ठेवा ह्मणजे खातरीनें तुह्मांस समाधान प्राप्त होईल. याचा अनुभव तर घेऊन पहा. तुमची निराशा होणारच नाहीं. कारण जो ह्मणून ख्रिस्ताकडे आला त्यास त्यानें विन्मुख लावलें नाहीं.

ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयीं अंतर्बाह्य पुराव्यांची माहिती जरी एखाद्याला नसली

तरी तेवढ्यानें त्याचें अडून रहाणार नाहीं. त्यास वरील पाप व दुःखविमोचनाचें अनुभविक प्रमाण माहीत झाल्यानें त्याची खातरी होऊन बायबलावर त्याचा विश्वास बसेल. कारण अनुभविक प्रमाणाशिवाय मनुष्याची खरी भक्ति बसणें अशक्य आहे. पुढील उतारा फार महत्त्वाचा आहे, यास्तव त्याचें मनन करा:

पवित्र आत्म्याची साक्ष.

"ख्रिस्ती मंडळी बायबलास फार पूज्य मानीत असल्यामुळें कोणाचीही प्रवृत्ति त्या ग्रंथाकडे भक्तियुक्त होणें साहजिक आहे. कारण तो ग्रंथ तसाच आहे. त्यांतील विषय पारमार्थिक, उपदेश मनावर ठसणारा, भाषा प्रौढ, त्यांतील जुळणी संगतवार, त्याचें सर्व धोरण ईश्वराच्या गौरवाकडे व तरणोपायाचा मार्ग दाखविण्याकडे अशा अनेक अमूल्य गुणांमुळें तो ग्रंथ सर्वमान्य होऊन ईश्वरदत्त आहे अशी खातरी झाल्यावांचून रहात नाहीं. पण ही खातरी केवळ बाह्य पुराव्यानें झाली. या गोष्टीचें अंतःप्रमाण देवाचा आत्मा आपल्या आत्म्यास जी साक्ष देतो तीमध्यें आहे." सबळ पुरावा काय तो हाच, ह्मणजे पवित्र आत्म्याची मनोमय साक्ष. देव करो व तुह्मांला या गोष्टीचा प्रत्यय कळून येवो. "यापूर्वी मला दिसत नव्हतें तें आतां दिसूं लागलें" हा उद्गार ज्यानें काढला त्याच्याप्रमाणें तुमची स्थिति होऊन तुह्मांसही त्याच्याप्रमाणें खरा मार्ग दिसो हें माझें देवाजवळ मागणें आहे.

## भाग दुसरा.

व्यक्तीप्रमाणें समाजाच्याहीबऱ्याकरितां ख्रिस्ती धर्म आहे.

२. ख्रिस्ती धर्मानें व्यक्तिमात्राची उन्नति कशी होत जाते हें वर निर्दिष्ट केलें आहेच. आतां अनुभविक पुराव्यावरून व्यक्तिमात्राची जी गोष्ट तीच समाजाची हेंही दाखवितां येईल. याबद्दल ख्रिस्ती मंडळीचा इतिहास पहा ह्मणजे त्यामध्यें या प्रकारें मनुष्याचें चमत्कारिक स्थित्यंतर झाल्याचीं शेंकडों उदाहरणें सांपडतील. ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यामुळें ज्यांचीं मनें उन्नत होऊन ज्यांचे विचार व कल्पना उदात्त झाल्या आहेत असे पुष्कळ लोक तुह्मांस माहीत असतीलच. व्याधीनें जसें व्यक्तिमात्रास सोडलेलें नाहीं तसेंच जनसमूहासही सोडलेलें नाहीं. त्यांत मूर्तिपूजकांची तर गोष्ट बोलावयासच नको. पाप आणि यातना यांहींकरून ते जर्जर झाले आहेत तर त्यांचा परिहार व्हावा कसा? बायबलांत सांगितलेल्या उपायानें त्यांचा परिहार होणें शक्य नाहीं काय? "नाहीं" कोण ह्मणेल?

एका स्पष्टवक्त्या व बहुश्रुत ग्रंथकारानें आपली साक्ष या गोष्टीविषयीं दिली आहे ती अशी:[१] "असंख्य लोकांचें वर्तन ख्रिस्ती धर्मामुळें बदलून गेलें अशी प्राचीन ख्रिस्ती ग्रंथकारांची गर्वोक्ति आहे. पण तींत सत्य नाहीं असें ह्मणतां येईल काय? तसेंच, अगदीं

१ लेकी नामक ग्रंथकाराचे History of European Morals या ग्रंथाचा २ भाग पृष्ठ ४४०.

भ्रष्ट झालेल्यांस स्वातंत्र्यानुभव झाल्यानें उमेद येऊन पुनरुज्जीवन झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. यांपैकीं कित्येकांनीं तर ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेकरितां आपले प्राणही वेंचण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. ही गोष्ट त्यांच्या शत्रूंनीं सुद्धां अनेक वेळां कबूल केली आहे." सर्वपरी मृत्युपंथास लागलेल्या अशा ह्या जगाचा उद्धार व्हावा ह्मणूनच ख्रिस्त अवतरला असें ऑगस्टीन नामक एका ख्रिस्ती ग्रंथकाराचें ह्मणणें आहे. प्राचीन काळीं या जगांत तीन मोठीं विघ्नें होतीं. तीं कोणतीं ह्मणाल तर गुलामगिरी, भयंकर लढाया, व स्त्रीजातीची पायमल्ली. यांपैकीं दोन बरींच नाहींशीं झालीं आहेत, परंतु अद्याप दुर्दैवें-करून ख्रिस्ती राष्ट्रांतही युद्धसंग्राम चालूच आहेत. फरक इतकाच कीं त्यांत प्राचीन कालचें भयंकर स्वरूप फारसें दिसून येत नाहीं. एकंदरींत पहातां स्त्रीजातीला यथायोग्य मान मिळून समाजाची उन्नतावस्था बरीच झाली आहे.

मनुष्यजातीची उन्नतावस्था करण्याचा ख्रिस्ती धर्माचा प्रभाव प्राचीन काळाप्रमाणेंच सांप्रत काळींही कायम आहे; ह्मणजे पतिताचा उद्धार त्या धर्मानें पूर्वीं होत होता, तसाच आतां जे मृत्युमुखीं पडलेले आहेत त्यांसही त्यापासून संजीवन मिळत आहे. मिशनरी लोकांच्या परिश्रमानें अगदीं रानटी स्थितींतले नरभक्षकांचेही कानीं बायबलांतील उपदेश पडून त्यांची सुधारणा झाली आहे. तात्पर्य हेंच कीं ख्रिस्ती धर्मासारखा सन्मार्गप्रवर्तक असा अन्य मार्गच नाहीं. ह्मणून त्याव्यतिरिक्त इतर पाश्चिमात्य सुधारणा रानटी लोकांच्या बिलकुल हिताच्या नसून त्यांजपासून उलटा त्यांचा ऱ्हास व नीतिभ्रष्टता मात्र होणारी आहे.

यावर कोणी असा आक्षेप घेतील कीं ख्रिस्ती ह्मणविणाऱ्या देशांतून का थोडा अनाचार चालतो? ख्रिस्ती ह्मणविणाऱ्या राष्ट्रांचें आचरण ख्रिस्ती धर्मानुरूप सर्वदा असतेंच असें नाहीं हें आह्मांस मोठ्या कष्टानें कबूल करावें लागतें. तसें झाल्यास स्वर्ग व पृथ्वी यांमध्यें भेदच न उरून अन्य धर्मी लोक ख्रिस्तानुयायी झालेच असते.[१]

शेवटीं माझी आपणांस अशी विनंती आहे कीं वर सांगितलेल्या गोष्टींचा तुह्मी स्वतः

अनुभव घ्या.

अनुभव घेऊन पहा. हें कसें करावें ह्मणाल तर बायबलाचें मनःपूर्वक अध्ययन करून सत्यप्राप्ति व्हावी ह्मणून ईश्वराची मनोभावें प्रार्थना करा, ह्मणजे खऱ्याखोट्याची पारख तुमची तुह्मांसच होईल. त्यावर बायबलांत खरा उपाय आढळला तर त्याचें अवलंबन करा. ख्रिस्ताचे अंकित व्हा. "अहो कष्टकरी व ओझ्यानें लादलेले, तुह्मी सर्व माझ्या जवळ या, ह्मणजे मी तुह्मांस विसांवा देईन." अशा प्रकारें त्याचें तुह्मांस आमंत्रण आहे. त्याचा स्वीकार करा आणि त्यानें वचन दिल्याप्रमाणें शांति मिळते कीं नाहीं याची प्रचीति पहा.

---

१ पंजाबांतील एका मुसलमान गृहस्थानें सर डॉनल्ड मॅक्लाउड व जनरल रेनेल टेलर या दोघांस केवळ देवदूत ह्मटलें आहे. सर्व ख्रिस्ती ह्मणविणारांनीं हें लक्ष्यांत वागवून त्या मानास योग्य आचरण ठेवल्यास किती उत्तम होईल!

वरील ख्रिस्तोक्ति त्रस्त झालेल्यांस आहे. तुह्मीही तसेच असाल तर त्याजकडे जाण्यास अनमान करणार नाहीं. कारण ज्याचें पोट दुखतें तो ओंवा मागतोच, ह्मणजे ज्याला आपण पापी आहों असें वाटतें तो होऊन तारणाऱ्याचा शोध करितो. असा तारणारा येशू ख्रिस्तावांचून अन्य कोणीही मिळणार नाहीं. इहलोकीं व परलोकीं जें कांहीं तुह्मांस पाहिजे तें सर्व तुह्मांस देण्यास तो तयार आहे, व एकदा हें प्राप्त झालें कीं तुमच्या आनंदास पारावार नाहीं.

आणखी बायूबलांत यासंबंधानें असेंही लिहिलें आहे:

"या गोष्टी आह्मी तुह्मांस यासाठीं सांगतों कीं तुमचा आमचा सहवास घडावा; आमचा सहवाण तर बापाशीं व त्याचा पुत्र येशू ख्रीस्त यांशीं आहेच."

**आपला मित्र—.**



# पत्र बारावें.

## लोप झालेले प्राचीन धर्म.

मिसरी लोकांचा धर्म—बाबिलन व आसिरिया देशांतले धर्म—सिरिया प्रांतांतले धर्म—आशिआ मायूनर प्रांतांतील धर्म—डूइड धर्म—शार्मण्य देशचा धर्म—प्राचीन स्लावोनिया प्रांतांतील धर्म—ग्रीक धर्म—रोमन धर्म.

**प्रिय मित्र—,**

अलीकडे जगांतील निरनिराळ्या धर्मांची तुलना करून त्यांचा परिस्फोट करण्याचा प्रघात बराच पडला आहे. कोणत्याही राष्ट्राची किंवा समाजाची धर्मव्यवस्था हा विषय फार महत्त्वाचा असल्यामुळें, प्राचीन किंवा अर्वाचीन काळीं जे मोठमोठे धर्म उदयास आले तत्संबंधी विचार फार बोधप्रद व लाभदायक आहे. या व्यासंगानें निरनिराळ्या धर्मांची आह्मांस माहिती होऊन ते धर्म कितपत मान्य आहेत हें आह्मांस ठरवितां येतें.

या पत्रांतून ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे हें स्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे, तर त्या धर्माची इतर धर्मांशीं तुलना करून पहातां ख्रिस्ती धर्माचें वर्चस्व स्पष्टपणें शाबीत झालें पाहिजे. बहुतेक सर्व धर्मांतून मनुष्याच्या तर्कास व मनोदेवतेस पटतील अशा प्रकारचा सत्यांश आहे असें यापूर्वीं सांगितलेंच आहे. आतां धर्म या शब्दाची व्याख्या केली तर तींत ईश्वरी प्रेरणेचा भाग घेणें अवश्य होय. ह्मणूनच कोणत्याही धर्मांत केवळ सत्यांश अल्पस्वल्प असून उपयोग नाहीं तर त्या त्या धर्मांतून याशिवाय मनुष्यास ईश्वरी कृपेवांचून न उमगणाऱ्या व ईश्वरास शोभतील अशा गोष्टींचा समावेश असला पाहिजे. ज्या धर्मांत या गोष्टींचा अभाव आहे त्यांस ईश्वरदत्त कसें ह्मणावें?

आतां प्राचीन काळच्या मोठमोठ्या धर्मांचा या पत्रांत विचार कर्तव्य आहे. परंतु तो फारच संक्षेपानें केला पाहिजे ह्मणजे त्यांतील ठळक ठळक गोष्टींचा मात्र विचार करण्यास सवड होईल; कारण त्यांचें पूर्ण विवरण करूं गेल्यास विस्तार फार होईल. तो या लहानशा पत्रांतून करणें इष्ट नाहीं. तथापि त्या धर्मांचें संक्षेपानें जें निरूपण करण्यांत येईल त्यापासून विचार करण्यासारखे पुष्कळ विषय आपणांस कळतील.

### १ मिसरी लोकांचा धर्म.

टायग्रीस व यूफ्रेटीस या दोन नद्यांच्या आसमंतांतील मेसोपोटेमिया प्रदेशांत प्रथम सुधारणा सुरू झाली हें जरी खरें, तरी धर्मसंबंधी फार प्राचीनकालचीं स्मारकें मिसर देशांतून सांपडतात.

मिसरी धर्मांत कोणत्याही प्रकारचा मेळ नसून धरबंद बिलकुल नव्हता. तो निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या रूपानें प्रगट झाला. एकाच लेखांत एके ठिकाणीं पाहावें तों एकेश्वरी मत व दुसरे ठिकाणीं पाहावें तों अनेक देवतांची उपासना प्रशस्त ह्मणून ह्मटली

आहे, आणि त्यामुळेंच पशुपूजा ह्मणजे विशेषेंकरून बैल, मांजर कोल्हा वगैरे जनावरांची पूजा त्या लोकांत प्रचारांत होती. राजे लोकांस जीवंत असतांनाच देवासमान मानीत असत. तसेंच, मनुष्य मेल्यावरही त्याची पूजा अर्चा करण्याचा परिपाठ असे. वनस्पति देखील नाना प्रकारच्या देवता होऊन बसल्या होत्या, ह्मणूनच "बागांतून देवता ओतप्रोत भरल्या आहेत" असें एका रोमन कवीनें त्यांविषयीं विनोदानें ह्मटलें आहे.

पुढें पुढें तर हा धर्म केवळ घोर मांत्रिक होऊन बसला. "**मृताचें पुस्तक**"— The Book of the Death ह्मणून जो त्यांचा ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे त्यांत पाहावें तों मंत्रतंत्रादि कर्मांची योग्यता वर्णिली असून मनुष्याच्या कर्तव्याविषयीं फारच थोडें लिहिलेलें आहे. "मनुष्यास सदाचारसंपन्न करण्यास त्याच्यामागें हजारों मिथ्याचार लावून दिले होते." मोठमोठ्या सणाचे दिवशीं दुराचाराची तर गर्दी उडून जात असे. प्लूटार्क नामक इतिहासकारानें त्यांच्या उपासनेच्या निंद्य कर्मांस अतिशयित नांवें ठेविलीं आहेत. धर्म व नीति यांचा परस्पर संबंध बिलकुल नाहीं अशी त्यांची समजूत असल्यामुळें फार शोचनीय दोष त्यांनीं आपल्या पदरीं घेतला होता. त्यांच्या उपलब्ध ग्रंथावरून ते लोक गहन विचाराचे नसून बुद्धीनें किंवा नीतीनें श्रेष्ठ होते असें ह्मणतां येत नाहीं. ते कष्टाळू, सहनशील व उद्योगी असें जरी होते तरी ते जुलमी व दारूबाज असत. त्यांच्या इतिहासाचें काळजीपूर्वक अध्ययन केलेल्या एका ग्रंथकारानें त्यांजविषयीं या प्रकारें ह्मटलें आहे:—"ते लोक लबाड, चोर, विश्वासघातकी व आर्जवी असून परकीय लोकांविषयीं त्यांस अतिशयित तिटकारा असे."

## २ बाबिलन व आसिरिया देशांतले धर्म.

खालडिआ प्रांतांत दोन प्रकारच्या लोकांचा संकर झाल्याचें आपण पहातों, यामुळें तेथील धर्मांत देखील दोन तऱ्हा स्पष्टपणें दिसून येतात.

यांपैकीं एक तऱ्हा आकेडियन लोकांची. तींत भूतपिशाचादिकांची उपासना सांगितली आहे. मनुष्य मेला ह्मणजे पिशाचयोनींत शिरतो अशी या लोकांची समजूत असल्यामुळें असंख्य भूतें आहेत असें ते मानीत असत. जादूटोणा करून भूतांचा बंदोबस्त देवर्षींस करतां येत असे. ह्मणूनच या लोकांच्या प्रार्थना ह्मटल्या ह्मणजे निव्वळ मंत्रतंत्रः याशिवाय कांहीं नाहीं.

दोन प्रकारच्या लोकांचा संकर झाल्याविषयीं प्रथमतः सांगितलेंच आहे. त्यांतील एक आकेडियन व दुसऱ्या लोकांचा संकर शेमटीक राष्ट्राशीं झाला. ते सूर्य, चंद्र यांचे उपासक असत, तथापि भूतांखेतांनीं त्यांस सोडलें नव्हतें. भूतांचा संचार सर्वत्र असून ते मनुष्यमात्रास पीडा करण्याच्या खटपटींत निरंतर असतात अशी त्या लोकांची समजूत असे. या कल्पनेंत मिथ्याचाराची भर पडल्यामुळें प्रोफेसर साईस ह्मणतात कीं त्या लोकांस भीतीमुळें आपला जीव नकोसा झाला असेल. पिशाचबाधा दूर करण्याकरितां जादूटोणा इतका मातला होता कीं तो एक शास्त्रच बनून राहिला असे. शकुनादि कुटिलविद्यांची या लोकांत तर अगदीं रेलचेल झाली होती.

या लोकांच्या कित्येक भजनांतून पापांगीकार केल्याचें आढळतें. यावरून आपली उन्नत अवस्था होण्याविषयीं त्यांच्या मनांत तळमळ असे हें व्यक्त होतें. तथापि एकंदरींत त्यांचा धर्म ह्मटला ह्मणजे विलक्षण दुराचाराचा. ग्रीस देशचा हिराडोटस नामक इतिहासकार यानें त्या लोकांतील चंद्राची पूजा करण्याच्या पद्धतीस फारच दोष दिला आहे. याच पूजेबद्दल प्रोफेसर साइस ह्मणतात कीं "धर्माआड लपून हे लोक पुष्कळ अनन्वित कर्में करीत असत." धर्मबाह्य होऊन अनाचार करणें हें एकपरी संभवेल; परंतु धर्माच्या नांवानें मनुष्यानें अशीं नीच कृत्यें करण्याकडे वळून आपली अवनति करून घ्यावी याविषयीं मात्र कल्पना चालत नाहीं. असा अनाचार हिंदु लोकांतल्या शाक्तपंथांत आहे खरा, तथापि तो उघडपणें चालत नाहीं. बाबिलोन देशांत तर असे अनाचार निःशंकपणें दिवसाढवळ्या चालत असत.

## ३ सिरिया प्रांतांतले धर्म.

यांपैकीं विशेष प्रख्यात ह्मटला ह्मणजे फिनिशिअन लोकांचा धर्म. तो टायर व सायडन या दोन मोठाल्या शहरांतून प्रचलित होता. या धर्माचीं दोन मुख्य लक्षणें ह्मटलीं ह्मणजे हिंसा व व्यभिचार व मुख्य दैवत सूर्य. त्यासच बाल किंवा मोलख अशी संज्ञा असे. या देवतेचें वर्णन मिल्टन कवीनें सुरेख रीतीनें केलें आहे तें पहावें.

या देवाला ज्येष्ठ अपत्य वहाण्याची चाल असे; व राष्ट्रावर एखादें अनिष्ट आलें ह्मणजे मोठमोठाल्या घराण्यांतील तरुण लोकांना देवास अर्पून त्यांची होळी करीत असत.

या क्रूर चालीबरोबर व्यभिचार देखील चालत असे. या गोष्टींत त्यांनीं तर बाबिलोनिअन लोकांस मागें टाकलें होतें. हा भ्रष्टाकार उपासनारूपानें बऱ्याच देशांतून पसरला होता. अमोनी, मवाबी वगैरे सिरियन राष्ट्रांतून हा दुराचार फैलावल्यामुळें ते देखील फिनिशियन लोकांप्रमाणें भ्रष्ट झाले होते. त्यांतून निभावले काय ते यहूदी लोक. ते मात्र इतरांप्रमाणें भ्रष्ट झाले नव्हते.

## ४ आशिआ मायनर प्रांतांतील धर्म.

यांपैकीं प्रख्यात धर्म लिडिया, फ्रिजिया, बिथिनिया व कापाडोशिआ एथील होत. सैरावैरा होऊन नाचणें उडणें, पखवाज टाळ वाजविणें इत्यादि रानटी चाली या धर्मांतून प्रचलित असत. विशेषतः यांच्यांतील पुजाऱ्यांनीं हेल काढून ओरडावें, बागडावें व चाकू सुऱ्यांनीं आपणांस भोसकून घ्यावें. अशा धर्माचरणाची प्रवृत्ति अखेरीस दुराचाराकडे व्हावी यांत नवल नाहीं. याच प्रकारचा अनाचार पूर्वेकडून रोम शहरांत शिरला असतां तो रोमन लोकांस सहन न होऊन त्यांनीं इ० सनाचे पूर्वी १८६वे वर्षीं कायद्यानें बंद केला. दक्षिण हिंदुस्थानांतील पिशाचभक्तिही यासारखीच कांहींशी आहे, परंतु आशिआ मायनर प्रांतांतील विलक्षण प्रकारचें खूळ त्यांत दिसून येत नाहीं.

## ५ ड्रूइड धर्म.

सेलटीक लोकांत व विशेषतः गाल व ब्रिटन या देशांतले लोकांत प्राचीन काळीं जो

धर्म प्रचलित होता त्यास ड्रूइड धर्म ह्मणत असत. या धर्माविषयीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं.[१] या लोकांचे धर्माध्यक्षांस ड्रूइड ही संज्ञा होती. धर्माध्यक्षतेचें काम स्त्रियाही करीत असत व त्यांतील उच्च प्रतीच्या स्त्रिया विवाह करीत नसत.

गर्द व भयाण रानांतून या लोकांची पूजा अर्चा चालत असे. ओक वृक्ष व त्यावरील बांडगूळ यांस विशेषतः पूज्य मानीत असत. ते आपल्या देवांस नरयज्ञ नेहमीं अर्पण करीत असत. झाडाच्या फांद्यांची एक विशेष आकृति करून तींत मनुष्यास बसवून अग्नि लावून देत असा सीझरच्या ग्रंथांत उल्लेख आहे.

ड्रूइड लोकांचे देव व तसेच त्यांचे धर्मसंस्कार इतके कठोर व गर्हणीय असत, कीं शेवटीं तैबेरियस व क्लाडियस बादशाहांनीं त्या धर्माचा उच्छेद करून टाकण्याचा प्रयत्न केला. मि० व्हाइटली स्टोक्स साहेब खातरीपूर्वक सांगतात कीं आयरलंडांतील ड्रूइड लोक केवळ चेटकीच बनून राहिले होते.

यांत सिंब्री ह्मणून जे लोक होते त्यांच्याविषयीं कांहीं निश्चयात्मक सांगतां येत नाहीं; तथापि सीझर, सालस्ट, सिसरो वगैरे प्रख्यात प्राचीन ग्रंथकार त्यांची गणना ड्रूइड धर्मी जे गॉल लोक त्यांत करीत असत. लढाईंत पाडाव केलेल्या बंदीवानांचा या धर्माच्या पुजारणींनीं फार छल केल्याचें भयंकर वर्णन स्ट्राबो नामक ग्रंथकारानें दिलें आहे.

## ६ शार्मण्य देशाचा धर्म.

या धर्माचा आरंभ सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वी, अग्नि आदीकरून सृष्ट पदार्थांची पूजा अर्चा करण्यांत झाला आहे. सर्व देवतांमध्यें रणदेवता व विद्युद्देवता श्रेष्ठ मानीत असत. स्वर्गास वल्हाला ही संज्ञा असून त्याचें वर्णन या प्रकारें केलें आहे: रणवीरांनीं भूलोकीं असतां जो युद्धसंग्राम केला तोच स्वर्गलोकीं ते पुनः चालवितात; ते एकमेकांस शस्त्रप्रहारांनीं जेरीस आणून पुनः ताजेतवाने झाल्यावर पराभव पावलेल्या शत्रूंच्या कवटींतून मादक पेय पिऊन समाधान पावतात; अशा रीतीनें स्वर्गलोकीं एकेका दिवसाची परिसमाप्ति होते.

ते आपल्या देवांना लढाईंत धरून आणलेल्या बंदीवानांस बळी देत असत. स्कांडीनेविया देशचे लोक त्याच शाखेचे असून क्रूर कर्मांत त्यांहूनही पुढें गेले होते. कित्येक शतकें वनपशूंप्रमाणें त्यांचें वर्तन अति क्रूर असून युद्धसंग्रामांत व हाणमार करण्यांत त्यांस फारच हौस वाटत असे. स्वीडन देशच्या एका राजानें आपण दीर्घायु व्हावें ह्मणून आपले नऊ पुत्र एकामागून एक बळी दिले.

## ७ प्राचीन स्लावोनिया प्रांतांतील धर्म.

वर सांगितलेल्या दोन धर्मांइतका स्लावोनियन धर्मांत क्रूरतेचा प्रकार नव्हता. तथापि त्याची तऱ्हा फारच बालिश होती. बाल्टिक समुद्रांत रूगेन नामक बेटांत इ० ११६८

---

[१] जी थोडीबहुत माहिती या धर्माविषयीं मिळते ती सीझर, टासिटस व प्लिनी नामक इतिहासकारांपासून मिळते.

पर्यंत जो मूर्तिपूजेचा प्रकार अव्याहत चालला होता तत्संबंधानें साक्सो ग्रमाटीकस ग्रंथकारानें आपले ग्रंथांत लिहून ठेविलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं दुराचाराचा अतिरेक करणारांची त्या लोकांत मोठी वाहवा होत असे, व त्यांच्या देवाची पताग धारण करणाऱ्यांस देवळांतील चोरी किंवा कोणतेंही अनन्वित कर्म करण्यास मुभा असे.

## ८ ग्रीक धर्म.

आतां नाणावलेल्या ग्रीक व रोमन लोकांकडे वळूं. हे लोक प्राचीन काळीं सुधारणेच्या कळसास पोंचले होते, तरी धर्माच्या बाबतींत यांच्यांतही वेडेचार कमी नव्हते. ग्रीस देशांतील देवतांची संख्या कमींत कमी तीस हजार होती. हे देव ह्मटले ह्मणजे मनुष्यें तर खरींच, परंतु त्यांच्यांत सद्गुणदुर्गुणाचा अतिरेक झाल्यामुळें ते देवपदाप्रत पोंचले होते, हें यापूर्वीं आह्मीं सांगितलेंच आहे. देव सुलभदर्शनीय असला पाहिजे ह्या प्रकारची इतरांप्रमाणें ग्रीक लोकांचीही समज होती; तथापि ते लोक वेड्यावांकड्यांत शिरून या समजुतीचा विपर्यास करीत असत. होमर कवीनें जें या देवतांचें वर्णन आपल्या काव्यांत केलें आहे तें फारच ओंगळ असल्यामुळें कित्येकांनीं अशा बुद्धिमान् पुरुषानें ह्या देवतांवर विश्वास ठेवला तरी कसा अशी पृच्छा केली आहे. “देवेंद्र व नरेंद्र” असा जो त्यांचा जूपिटर देव त्याचे ठायीं ईश्वरानुरूप गुणाचा लेशमात्र नसून त्याची शक्तिही तशीच परिमित असल्याचें दिसून येतें. होमरच्या काव्यांतील देव खातात, पितात, लढतात, व कधीं कधीं आनंदातिशयांत हसूं लागले ह्मणजे सर्व आकाश दणाणून टाकतात. ते छांदिष्ट, विषयी, मत्सरी व खुनसी असे असून जे त्यांचा अनादर करीत त्यांविषयीं दीर्घद्वेषी व आपल्या भक्तांस नीतीच्या अनीतीच्या अशा कोणत्याही कामांत सहाय करीत असत. अशा देवांच्या भजनीं सर्व ग्रीक लोक लागले होते हें काय तें नवल.

खऱ्या धर्माचें रहस्य प्रार्थना, ह्मणजे देवाशीं सहवास करणें होय. प्रार्थनेचे स्वतःकरितां व इतरांकरितां असे दोन प्रकार आहेत. होमरच्या काव्यांतून प्रार्थनेचा पहिला प्रकार ओतप्रोत भरला आहे, परंतु दुसऱ्याचें नांव सुद्धा नाहीं.[१]

**ग्रीक लोकांचें तत्त्वज्ञान.**

जसजसे ग्रीक लोक ज्ञानसंपन्न होऊन सुधारत गेले तसतसा त्यांचा आपले धर्मावरचा विश्वास उडाला. व्यापारवृद्धि, परकीय राष्ट्रांशीं दळणवळण व तत्त्वज्ञानाचा प्रसार यांहींकडून त्यांच्यांत हें महदंतर पडलें. ग्रीक लोक मूळचे कर्मनिष्ठ असत, व ख्रिस्ती धर्माचा प्रसार होऊन या त्यांच्या वृत्तीचा उच्छेद होईपर्यंत गांवढळ लोकांची प्रवृत्ति पूर्वींच्या मार्गाकडेसच होती. परंतु त्यांच्यांतील ज्ञाते लोकांनीं हा धर्म लवकरच झुगारून दिला. ख्रिस्ती शकाचे पूर्वीं ५२४ वर्षें झालीं त्या वेळीं ग्रीक लोकांत झेनोफानीस नामक ज्ञाता होऊन गेला. त्यास त्यांच्यांतील पूज्य दैवतांचें वर्णन मुळींच न खपून त्या शुद्ध भाकड-

---

[१] असें ग्लाडस्टन साहेब ह्मणतात. त्यांच्या The Impregnable Rock of Holy Scripture नामक ग्रंथाचें पृ० १५५ पहा.

कथा आहेत अशी त्यानें उघड निर्भर्त्सना केली आहे.[१] इतर ज्ञात्यांनीं देखील त्या धर्माचा तसाच कडक रीतीनें निषेध केला आहे. याप्रमाणें ग्रीक धर्मरूप इमारतीचा नाश करण्यास हे ज्ञाते प्रवृत्त झाले खरे तथापि त्याऐवजीं त्याहून चांगल्या अशा धर्माची योजना करण्यास ते समर्थ नव्हते. नांव ठेवणें सोपें, पण कांहीं मार्ग दाखविणें कठीण आहे. देवाविषयीं मला पूर्ण अज्ञान आहे असें वर सांगितलेल्या पंडितानें निःशंकपणें कबूल केलें आहे. यानंतर जे विद्वान् ग्रीक देशांत होऊन गेले त्यांच्या ग्रंथांतून देवाशीं ऐक्य करण्याची कल्पना सुद्धां आढळून येत नाहीं. मिल्टन कवीनें ग्रीस देशांतील पंडितांचें जें यथातथ्य वर्णन केलें आहे तें वाचल्यानें मन उद्विग्न होतें.[२] तें इंग्रजी जाणणारांनीं अवश्य वाचावें.

ग्रीस देशांत या पंडितांच्या तत्त्वज्ञानापासून नीतिविशिष्ट फायदा न होतां उत्तरोत्तर लोक दुराचारी होत गेले. होमर कवीच्या वेळेस त्या लोकांच्या रीतीभाती पुष्कळ अंशीं रानवट असल्यामुळें निंद्य होत्या तथापि पुढील काळीं सुधारणेच्या कळसास पोंचल्यावर तर पूर्वींपेक्षां फारच बिघाड झाला. या प्रकारें नीतिभ्रष्ट होतांच त्या लोकांत जो कांहीं थोडाबहुत स्वाभिमान व स्वदेशप्रीति होती त्यांचा देखील लोप झाला. तर्कज्ञानाभिमानी जे त्यांच्यांतले सोफिस्ट लोक ते निव्वळ नास्तिक असत व त्यांनींच ग्रीस देशाचा सर्वस्वीं नाश केला.[३] दिवसेंदिवस लोकसंहारास आरंभ झाला. मोठमोठीं उदयास आलेलीं शहरें मोडकळीस आलीं व अंगावर रोमांच उभे राहतील असा अनाचार देशभर पसरून त्या किडीनें देश केवळ खाऊन टाकला.[४]

## ९ रोमन धर्म.

रोमन लोकांची धर्मसंबंधीं स्थिति ग्रीक लोकांसारखीच शोचनीय होती; कारण त्यांनीं धर्म व रीतभात यांत ग्रीक लोकांचेंच अनुकरण केलें होतें. ग्रीक लोकांत दुर्गुणांचें बीज सर्वथैव रुजलें आहे तर त्यापासून तुह्मी अलिप्त रहा असें केटोनें आपल्या देशबांधवांस निक्षून सांगितलें असतांही त्याच्या बोलण्याकडे सर्वांनीं दुर्लक्ष्य केलें. रोम शहरांत तर ग्रीक

---

[१] याचे पूर्वीं ग्रीक तत्त्वज्ञानास आरंभ होऊन सुमारें एक शतक झालें होतें. पहिला तत्त्वज्ञ थेल्स नांवाचा होऊन गेला.

[२] Paradise Regained, Book iv. साक्रेटीस, प्लेटो आदीकरून पंडितांस उद्देशून हें वर्णन आहे.

[३] Hutchison Stirling's Philosophy. p. 123.

[४] Thirlwall's History of Greece. Vol. viii. p. 464. रोमन लोकांच्या जुलमानें ग्रीस देश उद्ध्वस्त झाला असें कित्येक ग्रंथकारांचें मत आहे. परंतु थर्लवाल या इतिहासकारानें मुख्यत्वेंकरून अनीतीमुळें ग्रीस देश लयास गेला हें जें प्रतिपादन केलें आहे तेंच खरें.

लोकांचे तत्त्वविचार व धर्मसमजुती यांचा उत्तरोत्तर प्रसार होऊन दुर्गुणांत त्यांनीं ग्रीक लोकांस मागें टाकलें. तत्त्वज्ञानामुळें ग्रीस देशांत जो अनर्थ घडला त्याचीच पुनरावृत्ति रोमन लोकांत होऊं लागली, ह्मणजे पूर्वींचें धर्मवेड नाहींसें होऊन ते कोणत्याही देवास मानीनातसे झाले. रोमन लोकांतील महाजनांत पाखंड मत (ख्रिस्ताच्या पूर्वींचीं दोन शतकें) इतकें माजलें होतें कीं त्याचा अनर्थकारक परिणाम कनिष्ठ प्रतीच्या लोकांवरही घडून त्याजबरोबर दुराचारही वाढत गेला.[१] रोम शहरांतील प्रमुख प्रमुख मंडळी तर इतकी दुर्वृत्त झाली कीं त्याची कल्पनासुद्धां होत नाहीं; व त्यांतील जूलिअस सीझरसारखे महाबुद्धिमान् पुरुष इतके बिघडले होते कीं ते ताळ्यावर येण्याची आशा बिलकुल राहिली नव्हती.

रोमन लोकांत सर्व प्रसंगीं धर्म ह्मणजे लौकिकाचार होऊन बसला. त्याचा व्यक्तिमात्रास संसर्गही नसे. त्यांचीं सर्व धर्मकृत्यें मुख्यत्वेंकरून चारचौघांनीं मिळून करण्याचा प्रघात असल्यामुळें, व्यक्तिमात्राच्या भक्तिभावाकडे त्याचें लक्ष्य जात नसे. शेवटीं शेवटीं धर्माचा इतका ऱ्हास झाला कीं अति दुष्ट बादशहास देखील ते देव मानूं लागले. रोमन बादशाही ह्मणजे त्यांच्या भरभराटीचा कळस, पण त्या वेळीं देखील धर्माची स्थिति काय? हीच.

कालगतीनें या क्रमांत उलट प्रकार व्हावा हें साहजिक आहे. यास आरंभ आगस्टस बादशाहीपासून किंवा कांहीं कालापूर्वीं झाला, त्या वेळीं पूर्वेकडील धर्मसंस्कार करण्याचा प्रघात मुख्यत्वेंकरून पडला. परंतु येणेंकरून त्यांचें समाधान होईना. अनाचार वाढायाचा तो वाढलाच. एम्. रेनन नामक प्रसिद्ध ग्रंथकारानें असें ह्मटलें आहे कीं रोमन बादशाहींत रोम शहर तर प्रत्यक्ष नरक बनून राहिलें होतें.

वर सांगितलेल्या बहुतेक धर्मांतून क्रूरकर्मांची प्रवृत्ति विलक्षण होती. रोम शहरांत आगस्टस बादशहाच्या कारकीर्दींपर्यंत नरयज्ञ करण्याचा प्रघात चालला होता.[२]

---

[१] कार्थेज शहराचा विध्वंस झाल्यावर रोमन लोकांनीं आपल्या पूर्वापार चालत आलेल्या रीतीभाती चटसाऱ्या एकदम गुंडाळून टाकून त्यांच्यांतील तरुण मंडळी लोभविलासादि दुर्गुणांनीं उन्मत्त झाली.

[२] हें सूटोनियस नामक इतिहासकारानें लिहून ठेविलें आहे. रोमन सेनेटनें जरी इ० सनाचे पूर्वीं ९५वे वर्षीं नरयज्ञ देण्याचा प्रघात कायद्यानें बंद केला होता तरी ख्रिस्ती शकास आरंभ होऊन पन्नास वर्षें लोटल्यावरही कधीं कधीं तो प्रघात चालू असल्याचें दिसून आलें असें प्लिनी नामक ग्रंथकारानें लिहून ठेविलें आहे. इ. सनाच्या ४थ्या शतकाचे प्रारंभीं जूपिटर नामक देवतेस रोम शहरीं नरयज्ञ करून संतुष्ट करीत असत असें लाकटांटियस नामक ग्रंथकारानें लिहिलें आहे. कधीं कधीं बळी अर्पण न करितां त्याऐवजीं चाबकानें ताडन करण्याची रूढि पडली होती. स्त्रियांना चाबकानें ताडन करून त्यापासून निघालेल्या रक्तानें आर्तेमिस नामक देवीची पूजा करीत असत.

प्राचीन काळीं अति घोर युद्धसंग्राम चालत असत.[१] गुलामांचा व्यापार बहुतेक सर्वत्र पसरला होता, व त्या बापड्यांस जनावरांप्रमाणें वागवीत असत. रोम शहरांत तर पाऊण हिस्सा वस्ती गुलामांची होती. मल्लयुद्धाचे खेळांत हे गुलाम एकमेकांच्या नरड्यांचे घोट कसे घेतात हें पाहण्यास रोम शहरांत स्त्रीपुरुषांची मोठी गर्दी उडत असे. या प्रकारें वीस वीस हजार लोकांचा चुराडा एका महिन्यांत होत असे. परंतु अनाथ किंवा दुखणाईत यांसाठीं एक देखील आश्रम नव्हता.

ख्रिस्ती धर्माचा उदय ज्या वेळेस झाला त्या वेळच्या मूर्तिपूजक राष्ट्रांची धार्मिक व नैतिक स्थिति फार निकृष्टावस्थेची होती हें इतिहासावरून सर्वश्रुत आहेच. दुष्ट देवतांची भक्ति मनुष्यांनीं पतकरल्यामुळें तदनुसार त्यांचें भ्रष्ट वर्तन झालें अशी ओरड चांगल्या चांगल्या ग्रीक व रोमन ग्रंथकारांची आहे.[२]

कार्थेजिनियन लोकांनीं तर कमाल करून सोडली. ते तर या लोकांहून अति दुष्ट. त्यांच्यांतील हानिबाल नामक सरदारानें एके प्रसंगीं सुमारें तीन हजार कैदी मोलाक देवतेस बळी दिले. पुढें कांहीं काळ लोटल्यावर देखील हाच प्रकार. अगाथोक्लिस यानें तें शहर जिंकल्यावर त्यांतील प्रमुख प्रमुख घराण्यांतील लोकांनीं आपल्या पोटच्या मुलांपैकीं निदान दोनशें मुलें बळी दिलीं. कदाचित् पांचशेंही असतील. हें सर्व देवाला शांत करण्याकरितां! प्राचीन काळच्या धर्मवेडाचा असा हा भयंकर परिणाम.

"यरूशलेमापासून आरंभ करून सर्व राष्ट्रांस पश्चात्ताप व पापांची क्षमा माझ्या नांवानें गाजविण्यांत यावी"[३] याप्रमाणें ख्रिस्तानें आपल्या शिष्यवर्गास आज्ञा केली त्या वेळीं वर सांगितलेल्या सर्व धर्मांची भरभराट होती, आणि या आज्ञेच्या जोडीला जें थोर आश्वासन दिलें तें हें: "पाहा, कालाच्या समाप्तीपर्यंत मी तुह्मांबरोबर सर्वकाल आहें." ही आज्ञा शिरसावंद्य मानून त्याच्या भाविक शिष्यांनीं तो उपक्रम चालू केला, व त्याच्या

---

[१] इसवी सनाचे पूर्वीं चौथ्या शतकांत शिकंदर बादशहानें टायर शहर काबीज केलें त्या प्रसंगीं जे आपल्या शहरच्या संरक्षणार्थ मोठ्या निकरानें लढले अशा शत्रूंच्या दोन हजार शूर शिपायांस त्यानें सुळावर चढविलें व त्यांच्या बायकांपोरांस गुलाम करून विकून टाकलें. ग्रीक लोक इतर सर्व राष्ट्रांस आपल्याहून नीच मानीत असल्यामुळें त्यांच्यांत ही निर्दयता शिरली असावी; परंतु आपआपसांत ज्या लढाया ग्रीस देशांत झाल्या त्यांवरूनही त्यांचा निर्दयपणा या प्रकारचाच होता असें दिसून येतें. रोमन लोकांची तर यांहून सरशी होती. जूलिअस सीझर यानें गाल देशांत युद्धसंग्राम करून सुमारें दहा लक्ष लोकांचा गुरांप्रमाणें फन्ना उडवला, व या अघोर कृत्याबद्दल त्याला यत्किंचित्‌ही वाईट वाटलें नाहीं. याप्रमाणें प्राचीन युद्धसंग्रामाच्या बखरी वाचून अंगावर रोमांच उभे रहातात.

[२] थोलक, लीलांड, व डालिंजर या प्रसिद्ध ग्रंथकारांनीं या विषयावर जें लिहिलें आहे तें इंग्रजी जाणणारांनीं अवश्य पहावें. [३] लूक २४:४७.

उपदेशानें ते "कोट मोडून टाकण्यास देवाकडून शक्तिमान् झाले." त्यांचीं शस्त्रें ह्मटलीं ह्मणजे केवळ आध्यात्मिक असल्यामुळें त्यांस सारखा जय मिळत गेला. त्यांस एकदम जयप्राप्ति झाली नाहीं हें जरी खरें तरी त्यांचा युद्धसंग्राम अव्याहत चालू राहून मूर्तिपूजक धर्माचा एकामागून एक पाडाव होत गेला. धर्मवेड आपोआप निर्मूळ होत जाऊन वर सांगितलेले सर्व धर्म लयास गेले. रोम शहरांत ज्या ठिकाणीं जूपिटर नामक ग्रामदेवतेचें देऊळ होतें त्या ठिकाणीं हल्लीं ख्रिस्ती देऊळ आहे. आथेन्स शहरांत आजमितीला आक्रोपालीस डोंगरावर पारथी नांवाचें देऊळ जरी आहे तरी तें सर्वस्वीं मोडकळीस येऊन त्यांतील प्राचीन काळांच्या कारागिरांनीं आपलें बुद्धिकौशल्य खर्चून फार सुंदर बनवलेल्या पालस आथेनी देवीच्या मूर्तीचा तर आज पत्ताही नाहीं. तिचा मागमूस नसून, ज्या ठिकाणीं तिची पूजा अर्चा होत असे त्या ठिकाणच्या लोकांस तिचें स्मरणसुद्धां उरलें नाहीं. "सत्यमेव जयते" हें वचन अखेरीस खरें ठरलें[१].

आपला मित्र—.



# पत्र तेरावें.

## हिंदु धर्माचें परीक्षण.

ईश्वरदत्त ह्मणविणारे चालू असलेले धर्म—हिंदु धर्म—हिंदु धर्म ह्मणजे काय? तत्संबंधीं प्रमाण—हिंदु शास्त्रांचा काल—तीं अस्सल असल्याचें परीक्षण—हिंदु शास्त्रांत सांगितलेले चमत्कार—भविष्य कथन—हिंदु शास्त्रांचा विस्तार.

अंत:प्रमाण—हिंदु शास्त्रांचा परस्पर अपार विरोध—हिंदु शास्त्रांतील मतें व संस्कार वगैरे विलक्षण असल्यामुळें त्या शास्त्रांचा स्वभावसिद्ध धर्माशीं मेळ पडत नाहीं—भूगोल ज्योतिषादि शास्त्रांतर्गत हिंदु धर्मातले अनेक दोष—हिंदु धर्म सार्वत्रिक होण्यास पात्र नसून तसा होण्याविषयीं मूळ संकल्पही नव्हता—तो धर्म दुराचारप्रवर्तक आहे—उपसंहार.

प्राचीन हिंदु धर्माचें परीक्षण—वेद—हिंदु तत्त्वज्ञान—वेदान्तविचार—सांख्यशास्त्र, योगशास्त्र, न्यायशास्त्र, भगवद्गीता—तिजसंबंधानें कजन साहेबांचा अभिप्राय. उपसंहार.

## भाग पहिला.

**प्रिय मित्र—,**

या देशांत आपण हिंदु व मुसलमान लोकांनीं परिवेष्टित आहोंत तेव्हां त्यांच्या धर्मांशीं ख्रिस्ती धर्माची तुलना करून पाहिल्यास वावगें होणार नाहीं. प्रथम आपण हिंदु धर्म घेऊं.

ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयीं विवेचन करितांना आपण तत्संबंधीं बाह्य प्रमाण, अंतःप्रमाण, अनुभविक प्रमाण अशा प्रकारची योजना केली. तीच योजना सर्व धर्मांस लागू पडते.

### बाह्य प्रमाण.

हिंदु धर्माविषयीं बाह्य प्रमाण कोणतें तें प्रथम पाहूं.

आतां हिंदु धर्म म्हणजे काय हें प्रथम ठरविलें पाहिजे; कारण कोणत्याही धर्माचें परीक्षण करितांना प्रथम तो धर्म काय आहे याचा निर्णय ठरवून नंतर तो धर्म कितपत खरा आहे या प्रश्नाकडे वळावें लागतें. तर ज्याला आपण हिंदु धर्म म्हणतों तो आहे तरी काय? पण या प्रश्नाचें उत्तर देणें सुलभ नाहीं. कारण बंगाल व मद्रास इलाख्यांतील हिंदु धर्म मुंबई इलाख्यांतील हिंदु धर्माहून अगदीं वेगळा आहे. फार कशास? मुंबई इलाख्यांतच एकमेकांस लागून असणारे प्रांत ह्मणजे कर्नाटक व महाराष्ट्र देश या दोहोंत हिंदु धर्म सारखा नाहीं. उच्च ह्मणविणारे ब्राह्मण यांचा हिंदु धर्म कनिष्ठ वर्णाच्या हिंदु लोकांच्या धर्माहून भिन्न आहे. वस्तुस्थिति अशी असल्यामुळें वरील प्रश्नास योग्य उत्तर ह्मटलें ह्मणजे हेंच कीं प्राचीन ग्रंथांतून जो हिंदु धर्म सांगितला आहे तोच अस्सल हिंदु धर्म समजला पाहिजे. हे ग्रंथ हिंदु लोक ईश्वरप्रणीत मानितात. तेव्हां त्या ग्रंथांत न आढळणारे प्रचार केवळ स्थानिक किंवा प्रासंगिक ह्मटले पाहिजेत.

कालगतीनें हिंदु धर्मांतील आचारविचारांत विलक्षण रूपांतर झालें आहे. **प्राचीन व अर्वाचीन हिंदु धर्म**[१] या नांवाचें पुस्तक मीं लिहिलें आहे त्यांत हिंदु धर्माचें सादृश्य महानदीशीं या प्रकारें केलें आहे "या महानदीच्या शोधार्थ आह्मी निघालों तों तिचीं नागमोडी वळणें व तिला मिळणारे असंख्य दुसरे प्रवाह पाहून आह्मी बुचकळ्यांत पडलों. हें जरी खरें तरी या नदीचा उगम कोठून झाला व ती कोणत्या दिशेस वहात आहे याचें ठोकळ अनुमान आह्मांस करितां आलें." ज्याप्रमाणें भागीरथी हरद्वारापाशीं उगम पावतांना निर्मळ व एकप्रवाही असून पुढें समुद्रास मिळतांना तिचीं अनेक मुखें होऊन अगदीं मलिन झाली आहे, त्याप्रमाणें हिंदु धर्माची स्थिति आहे. वेदकालीन हिंदु धर्म व सांप्रतचा हिंदु धर्म यांत महदंतर झालें आहे.

आतां हिंदु लोकांचे धर्मग्रंथ कोणते? या प्रश्नास चार वेद, सहा शास्त्रें, व अठरा पुराणें हेंच उत्तर असलें पाहिजे. यांशिवाय दुसरे संस्कृत ग्रंथ बहुत आहेत, पण त्यांचा समावेश धर्मग्रंथांत करीत नाहींत. फक्त वर सांगितलेलेच ग्रंथ विशेष पवित्र व विश्वसनीय मानिले आहेत.[२] तथापि चार वेद किंवा मुख्यत्वेंकरून ऋग्वेद हाच सर्व श्रेष्ठ प्रमाण ग्रंथ होय असें मानिलें आहे. (**वेद** या शब्दांत चारही वेदांचा समावेश होतो.)

हिंदु लोकांचे धर्मग्रंथ सर्वच प्रमाणभूत असे जरी मानलेले आहेत तरी ते सर्वच एकसारखे ईश्वरप्रणीत असें मानीत नाहींत. त्यांचे **श्रुति** व **स्मृति** असे दोन वर्ग करितात. श्रुति ह्मणजे ऐकलेले. यांत वेदांचा समावेश होत असून, संहिता, ब्राह्मणें, व उपनिषदें यांसही श्रुतिच ह्मणतात. सनातन ईश्वरी वाणीनें हे ग्रंथ प्रथम उच्चारिले व ते ज्यांनीं ऐकले त्यांनीं त्यांचा संग्रह करून त्यांचें पठन केलें. आतां स्मृति ह्मणजे आठवलेलें. स्मृति ग्रंथांसही प्रमाण मानलेलें आहे कारण श्रुतीच्याच आधारें हे ग्रंथ झाले.

वेद देववाणीपासून आले ही कल्पना बसविणें फार कठीण आहे; ह्मणून ती निरर्थक समजून तिजविषयीं आपणांस विचार कर्तव्य नाहीं. तथापि वेदांतील बरींच मंडलें मनुष्यकृत आहेत असें त्या त्या मंडलांतील ऋषींच्या नांवावरून स्पष्ट कळून येतें. पुष्कळ ठिकाणीं तर कांहीं मंडळें अगदीं नवीन रचलेलीं आहेत असा उल्लेख असून त्याबद्दलची प्रतिष्ठा त्यांचे कर्ते स्वतःकडे घेतात.

---

[१] Hinduism, Past and Present, p. 12 ("In Present Day Tracts.")

[२] पश्चिम हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं हेच ग्रंथ मान्य आहेत. बंगाल्यांत पुष्कळ लोक तंत्रग्रंथाची मोठी मान्यता समजतात. कलकत्ता एथील आदि ब्रह्मसमाजाचे कोणी एका प्रमुख गृहस्थानें तंत्रग्रंथाची धर्मग्रंथांत गणना करून षड्शास्त्रें वगळून टाकलीं आहेत. खरें पहातां बरींच तंत्रें अगदीं गर्हणीय आहेत. महाराष्ट्रांत पहावें तर साधारण लोकांस तुकारामाचे अभंग वेदच होऊन बसले आहेत. तथापि ते वेदाला सोडून नाहींत.

ज्या प्रकारें आपण बायबलाचें परीक्षण केलें तसेंच याही ग्रंथांचें आतां आपण करूं. प्रथम त्यांचे प्राचीनत्वाविषयीं विचार केला पाहिजे.

## १ हिंदु शास्त्रांचा काल.

शास्त्रांचा काल.

ह्यांपैकीं ब-याच ग्रंथांचा कालनिर्णय करणें फार कठीण आहे. कित्येक मुख्य ग्रंथांचा काल ठरविण्याची खटपट विद्वान् लोकांनीं केली आहे खरी, परंतु त्यांचीं भिन्नभिन्न अनुमानें निघाल्यामुळें बराच गोंधळ झाला आहे. वेद इ० सनाचे पूर्वीं १४व्या शतकांत लिहिले असावेत असें कित्येक विद्वानांचें मत पडतें, पण दुसरे कित्येक विद्वान् त्या ग्रंथांस बरेच अलीकडे ओढतात. त्यांच्या मतें वेद इ० सनाचे सातशें वर्षांपूर्वीं लिहिले असावेत. या प्रमाणें या दोन मतांत सातशें वर्षांचें अंतर पडलें. तसाच पुराणांचाही काल अनिश्चित आहे. त्यांविषयीं इतकें ह्मणतां येईल कीं जुन्यांत जुनें पुराण सुमारें हजार वर्षांपूर्वीं म्हणजे इ० सनानंतर आठशें किंवा नऊशें वर्षांनीं रचलें असावें व अगदीं अलीकडील पुराणें चार पांचशें वर्षांमागें लिहिलीं असावीं. सहा शास्त्रांचा काल ठरविणें देखील फार कठीण आहे. याप्रमाणें या ग्रंथांचा कालनिर्णय करणें फारच कठीण. त्यांतल्या त्यांत वेद फार प्राचीन आहेत येवढें मात्र निष्पन्न होतें.[१]

---

[१] याप्रमाणें या वादग्रस्त विषयाचा निकाल जरी होत नाहीं तरी विद्वान् लोकांनीं हिंदु धर्मग्रंथांचे पुढील शक अनुमानानें ठरविले असून ते खरे मानण्यास हरकत दिसत नाहीं.

ऋग्वेद संहिता इ० सनाचे पूर्वीं एक हजार वर्षें एकत्र केली असावी. परंतु या पूर्वींच संहिता रचली असावी हें उघड आहे.

ब्राह्मणांपैकीं बराच जुना भाग इ० सनाचे पूर्वीं ५०० वर्षें किंवा त्यापूर्वीं कांहीं वर्षें लिहिला असावा.

कपिल मुनि—इ०सनाचे पूर्वीं ६०० किंवा ७०० वर्षें.

मनुसंहिता किंवा मानवधर्म शास्त्र, याचा काल इ० सनाचे पूर्वीं ५०० किंवा ६००, पण बहुतकरून इ० सनापूर्वीं ३०० वर्षें.

रामायण व महाभारत हीं काव्यें फार झालें तर इ० सनाचे पूर्वीं २०० किंवा ३०० वर्षें किंवा इ०सनाचे आरंभास रचलीं असावींत: त्यांहून अर्वाचीन बहुतेक उपनिषदें आहेत.

पुराणें त्यांहूनही अर्वाचीन ह्मणजे इ०सनाचे नवव्या शतकानंतर लिहिलीं असावींत.

प्रोफेसर विल्सन साहेबांच्या मतें विष्णु पुराण इ० सनाचे ११व्या शतकार्धानंतर लिहिलें असावें. (Wilson's Vishnu Purana पृष्ठ ७२). भागवत पुराण हें त्याहून अलीकडचें ह्मणजे पांच सहाशें वर्षांपूर्वीं लिहिलें असावें.

हिंदु धर्मग्रंथांच्या कालाविषयीं लिहितांना प्रोफेसर विल्सन साहेब यांनीं जें ह्मटलें आहे तें लक्ष्यांत वागविण्याजोगें आहे. तें असें: " हिंदु लोकांच्या कालगणनेंत पुष्कळच

## २. हिंदु धर्मग्रंथ अस्सल असल्याचें परीक्षण.

धर्मशास्त्रें अस्सल आहेत कीं काय?

हे ग्रंथ मूळारंभीं लिहिले तसेच आजमितीस बहुतेक अंशीं आहेत कीं काय हें ठरविणें देखील कांहीं सोपें नाहीं. इतकें ह्मणतां येईल कीं बराच काळपावेतों वेदांत कांहीं फेरबदल झाल्याचें दिसून येत नाहीं; तथापि त्यांतही बरेच महत्त्वाचे फेरफार केलेले आपण पहातों. ऋग्वेदांत बहुतेक सामवेद आला आहे; परंतु त्या दोहोंतील पाठभेद बरेच आहेत. आतां ऋग्वेदांतर्गत सामवेद व स्वतंत्र सामवेद या दोहोंपैकीं फार प्राचीन व अस्सल कोणता या संबंधानें विद्वानांनीं बराच ऊहापोह केला आहे.[१] तसाच बराच अथर्ववेद ऋग्वेदांतर्गत आहे, परंतु त्या दोहोंतील पाठभेदांविषयीं एका विद्वानाचें मत असें आहे कीं ते अर्थविपर्यास व्हावा या बुद्धीनें कोणीं तरी केले असावेत.[२]

प्रत्येक वेदाच्या शाखा असून त्यांतही परस्पर विरोध महत्त्वाचे आहेत. ऋग्वेदाची एक, यजुर्वेदाच्या पांच व अथर्ववेदाच्या दोन याप्रमाणें शाखा आज उपलब्ध आहेत.

नुक्तीच अथर्ववेदाची एक प्रत काश्मीरांत सांपडली. ती हल्लीं ज्ञात असलेल्या प्रतीहून फार भिन्न असून बरीच मोठीही आहे. मोठ्या प्रतीवरून लहान प्रत संशोधन केलेली असावी असें दिसतें.[३]

पुराणें अस्सल नाहींत.

कोणत्याही पुराणाच्या दोन प्रती सारख्या पडत नाहींत ह्मणून एकंदरींत सर्व पुराणें अस्सल नाहींत असें ह्मणावें लागतें. पुराणांविषयीं प्रोफेसर विल्सन साहेब ह्मणतात कीं "हल्लीं उपलब्ध असलेल्या पुराणांहून प्राचीन काळीं वेगळीं पुराणें होतीं व हल्लींचीं पुराणें हीं त्यांचींच खंडें असून त्यांहून बरींच भिन्न व दूषित आहेत."[४] हें जर खरें

---

घोंटाळा आहे; ह्मणजे कालदर्शक विश्वसनीय विशिष्ट गोष्टी किंवा इतिहास असा त्यांच्यांत नाहीं, ह्मणून सर्व गोष्ट अनुमानावर येऊन पडल्यामुळें अनेक वेळां हीं अनुमानें चुकीचीं असण्याचा संभव आहे." (Wilson's Rigveda Vol. i. p. 18.)

वर दिलेले शक जर करितां चुकीचे असले तर ती चूक त्या त्या ग्रंथास जें आह्मीं प्राचीनत्व दिलें आहे त्यामुळें झाली असें ह्मटल्यास हरकत घेतां येणार नाहीं.

[१] Benfy's Samaveda. Introduction.

[२] Dr. R. Roth "On the Literature and History of the Veda."

[३] ऋग्वेदाच्या ५, यजुर्वेदाच्या ८६, सामवेदाच्या १,०००, व अथर्ववेदाच्या १२ या प्रमाणें शाखा होत्या असें शौनकाचें ह्मणणें आहे. यांपैकीं बहुतेक नष्ट झाल्या आहेत.

[४] विष्णु पुराण, पृष्ठ ४.

असेल तर खरीं पुराणें मिळण्याची बिलकुल आशा उरली नसून जीं आहेत तीं कृत्रिम आहेत असें ह्मणणें भाग पडतें. कोणत्याही पुराणांत इतर पुराणांचा विस्तार व कथानक हीं सांगितलेलीं असतात, परंतु त्यांत मेळ ह्मणून बिलकुल नसतो. तेव्हां पुराणांच्या अस्सलपणाविषयीं विचार करण्याचें सोडून देणें भाग पडतें. आपल्याजवळ असलेलें पुराण अस्सल आहे हें निश्चयात्मक कोणास जरी सांगतां येणार नाहीं तरी आपली प्रत खरी नाहीं हें विधान त्यास निर्धास्तपणें करितां येईल.

पुराणें अठरा आहेत असें सांगतात; परंतु त्यांची नामावलि निरनिराळ्या ग्रंथांतून निरनिराळी मिळते. ह्मणजे कूर्मपुराणांत अग्निपुराण गाळून त्या ठिकाणीं वायुपुराण, अग्निपुराणांत शिवपुराण गाळून त्याऐवजीं वायुपुराण, वराहपुराणांत गरुडपुराण व ब्रह्मांडपुराण गाळून त्यांबद्दल वायु व नरसिंहपुराण[१] अशीं घातलीं आहेत; व मत्स्यपुराणांत शिवपुराण वगळलें आहे.

बायबलाचें भाषांतर प्राचीन काळीं अनेक भाषांतून झालें ही एक लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. ( तिसरें पत्र पहा. ) या भाषांतरांवरून बायबलाचें प्राचीनत्व व अस्सलपणा हीं शाबीद करितां येतात. तसा पुरावा हिंदु धर्मग्रंथांस मुळींच नाहीं. उलट शास्त्रांचें शास्त्रत्व भाषांतरानें नष्ट होतें असा ग्रह आहे. ह्मणूनच अकबर बादशाहाच्या कारकीर्दीपर्यंत यांपैकीं एकाचेंही भाषांतर अन्य भाषेंत झालें नव्हतें. तें यश अकबरानें घेऊन कांहींचें पार्शिअन् भाषेंत भाषांतर केलें. या गोष्टीस अवघीं तीनशें वर्षेंही झालीं नाहींत; परंतु जुन्या कराराचें भाषांतर ग्रीक भाषेंत सुमारें दोन हजार वर्षांमागें झालें.

## ३. हिंदु धर्मग्रंथांतील इतिहास कितपत विश्वसनीय आहे.

या ग्रंथांची विश्वासपात्रता.

बाह्य पुराव्यावरून हें मुळींच ठरत नाहीं.

( १. ) या धर्मग्रंथकारांचें लक्षण व अंतर्गत हेतु आपणांस फक्त त्यांच्या ग्रंथांवरून काय ते कळून येतात. त्यांचें ठिकाण किंवा परिस्थिति, तसेंच त्यांचे ग्रंथ उदयास केव्हां आले व त्या ग्रंथांस कोणीं कितपत मान दिला या सर्वांविषयीं आह्मांस कांहींच सांगतां येत नाहीं.

( २. ) इतर देशांतील ग्रंथांत तत्संबंधानें मुळींच उल्लेख केलेला आढळत नाहीं.

ग्रीक ग्रंथांशीं पुराणांचा विरोध.

शिकंदर बादशाहानें हिंदुस्थानावर जी स्वारी केली व त्यानंतर या देशांत ज्या घडामोडी झाल्या त्यांजविषयीं ग्रीक ग्रंथकारांनीं जें लिहून ठेविलें आहे त्याचा पुराणांतील गोष्टींशीं मेळ पडत नाहीं. असें असूनही पुराणें इतिहासच मानतात!

त्यांचा बाक्ट्रियाच्या इतिहासाशीं विरोध.

हिंदुस्थानच्या सरहद्दीवर बाक्ट्रिया प्रांतांत ग्रीक लोकांचा अंमल फार दिवस होता; परंतु त्या प्रांताच्या इतिहासाशीं पुराणांचा मेळ बसत नाहीं.

---

[१] हें उपपुराण मानलें आहे.

त्यांचा चिनी ग्रंथांशीं विरोध.

हिंदुस्थानाविषयीं चिनी ग्रंथ झाल्याचें आढळून येतें. चीन देशांत ऐतिहासिक ग्रंथ पुष्कळ आहेत व त्यांतील कित्येकांत हिंदुस्थानाविषयीं उल्लेख केलेला आहे, पण त्यांतील एकाशींही पुराणांचा मेळ नाहीं.[१] तीर्थाटन करीत करीत कित्येक बौद्ध धर्मी लोक या देशांत येऊन गेले. त्यांच्या ग्रंथांतून हिंदुस्थानाविषयीं जें लिहिलें आहे त्याचा पुराणांशीं विसंगतपणा वारंवार दृष्टोत्पत्तीस येतो.[२]

त्यांचा मुसलमानी ग्रंथांशीं विरोध.

इसवी सनाच्या सातव्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानाचा संबंध मुसलमान लोकांशीं जडला. त्यानंतर दहाव्या शतकाचे शेवटीं शेवटीं गिजनीच्या महमुदानें या देशावर स्वाऱ्या करून हिंदुस्थानाशीं अति निकट संबंध जोडला. कित्येक पुराणें जरी मुसलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्यानंतर रचलेलीं आहेत तरी त्यांतील गोष्टींचें पुष्टीकरण मुसलमानी ग्रंथकारांनीं मुळींच केलेलें नाहीं.

पुराणांतील गोष्टी अन्य देशांच्या ग्रंथांतून मुळींच आढळत नाहींत असा आमच्या लिहिण्याचा भाव नसून त्यांतील अनेक गोष्टी परकीय देशांतील ग्रंथकारांनीं मोडून काढल्या आहेत असें आमचें म्हणणें आहे.

त्यांचा अस्तित्वांत असलेल्या शिलालेखांशीं विरोध.

( ३. ) आतां तत्संबंधानें शिलालेखांवरून मिळणारें प्रमाण पाहूं. हिंदुस्थानांतील अनेक भागांत दगडांवर खोदलेले जे लेख आढळतात, तसेंच कित्येक डोंगरांतून जीं लेणीं आहेत त्यांतील चित्रें, तसेंच हिंदुस्थान व त्याच्या आसमंतांतील प्रदेशांत विशेषतः काबूलांत जीं नाणीं सांपडतात त्यांवरून जी माहिती उपलब्ध होते ती पुराणांतील कथानकांशीं मुळींच जुळत नाहीं. या दोहोंमध्यें इतका विरोध आहे कीं पुराणांत खरा इतिहास मुळींच नसून केवळ भाकडकथा भरल्या आहेत असें पूर्वभाषाभिज्ञ चकचकीत ह्मणतात.

रामायण व महाभारत यांत भाकडकथा आहेत.

( ४. ) हिंदु लोक ज्या रामायण व महाभारत ग्रंथांस खरा इतिहास म्हणून समजतात त्यांजविषयींही हेंच विधान करणें भाग पडतें. या ग्रंथांकडे पाहूं गेलें असतां असें दिसून येतें कीं कवींनीं मनास वाटेल त्याप्रमाणें कथानकें बदलून तीं अलंकृत करून पाल्हाळ करण्यांत कमाल केली आहे.

पुराणांतील इतिहासाविषयीं जीं विधानें आह्मीं वर केलीं आहेत तीं सर्व या दोन महाकाव्यांस लागू पडतात.

---

[१] See Elphinstone's India p. 157 (Ed. 1866)

[२] पुराणांची योग्यता इतिहासदृष्ट्या वेबरसाहेबांच्या मतें अगदीं अल्प आहे.

एकंदरीनें पहातां हिंदु धर्मग्रंथांतील इतिहास विश्वसनीय ठरत नसून त्यांत खोटेपणाची इतकी कमाल केली आहे कीं तो फारच हास्यास्पद झाला आहे.

हिंदु धर्मांतील चमत्कारांचें परीक्षण.

### ४. हिंदु धर्मांतील चमत्कार त्या धर्माच्या सत्यतेविषयीं कितपत प्रमाणदर्शक आहेत हें आपण आतां पाहूं.

हिंदु धर्मग्रंथांतून अनेक अद्भुत चमत्कार सांगितले आहेत. ते वाचून पहातां मनुष्य आश्चर्यचकित होतो; परंतु ते चमत्कार घडून आले कीं काय याविषयीं प्रमाणें काय सांपडतात तीं पाहूं.

हिंदु लोक भोळे आहेत.

(१.) हिंदु लोक आरंभापासून आजतागाईत विलक्षण भोळे आहेत. त्यांना कांहीं सांगा, तें सर्व त्यांस खरें वाटतें. या देशांतील बहुतेक सर्व देवळांत अद्याप अद्भुत चमत्कार घडून येतात ही समज त्यांच्या मनानें घेतली आहे, ह्मणून एखाद्या लबाड मनुष्यास या लोकांत अद्भुत चमत्कार करून दाखविण्याचा लौकिक सहज संपादन करितां येतो.

या अद्भुत चमत्कारांकडून नवी धर्मस्थापना झाली नाहीं.

(२.) ज्यांनीं हे अद्भुत चमत्कार केले त्यांनीं ते नवीन धर्मस्थापना करण्याचे हेतूनें केले नाहींत; किंवा ज्या आचारविचारांचा व मतांचा हिंदु लोकांस तिरस्कार होता त्यांच्या पुष्टीकरणार्थ प्रमाणभूत म्हणून त्यांनीं ते केले नाहींत.

जे लोक चमत्कार पहाण्यास उत्कंठित आहेत अशांची जिज्ञासा तृप्त करावी ह्राच काय तो चमत्कार करणारांचा हेतु असून त्यांनीं जे कांहीं चमत्कार करून दाखविले ते प्रचलित असलेल्या धर्माच्या पुष्टीकरणार्थ केले.

यावरून अद्भुत चमत्कारांविषयींचें प्रमाण किती दुर्बल ठरतें तें पहा. हिंदु धर्माच्या पुष्टीकरणार्थ जर कोणी अद्भुत चमत्कार करण्यास आज उद्युक्त झाला तर त्याचें अभिनंदन किती तरी होईल! असें जर आहे तर प्राचीन काळींही याचप्रमाणें त्याचा गौरव झाला असता. कारण एखाद्या गोष्टीवर विश्वास ठेवण्याचें मनानें घेतलें ह्मणजे त्याच्या खरेखोटेपणाच्या पुराव्याकडे पहाण्याच्या भरीस कोणी फारसें पडत नाहीं.

त्यांच्या पुष्टीकरणार्थ खंबीर पुरावा नाहीं.

(३.) या अद्भुत चमत्कारांच्या सत्यतेविषयीं जें प्रमाण दाखविण्यांत येतें त्यावरून मुळींच समाधान होत नाहीं.

या कामीं हिंदु लोकांचा पुरावा अपुरा आहे, कारण ज्या ग्रंथांतून हे अद्भुत चमत्कार वर्णिले आहेत त्या ग्रंथांचा काल, स्थल व प्रसंग हीं शोधून काढणें दुरापास्त असल्यामुळें ते पुराव्याचे कामीं अग्राह्य आहेत. त्या ग्रंथांतील ऐतिहासिक भाग चुकयांनीं भरल्याचें

वर दर्शविलेंच आहे; तर त्याच ग्रंथांत वर्णिलेले अद्भुत चमत्कारांवर आमचा विश्वास बसावा कसा? ठेविला तर खोटी साक्ष दिल्याची शाबिती ज्या मनुष्यावर झाली आहे त्यासच न्यायाच्या कोर्टांत फिरून साक्षीस आणल्याप्रमाणें होणार आहे.

दुसरें—अद्भुत चमत्कारांच्या वतीनें हिंदु लोकांशिवाय इतर कोणत्याही लोकांची साक्ष मिळत नाहीं. ग्रीक किंवा रोमन ग्रंथकार, तसेंच चिनी किंवा सिंहलद्वीपांतले व पारशी किंवा मुसलमान ग्रंथकार यांच्या ग्रंथांतून जे उल्लेख आहेत ते हिंदु ग्रंथांशीं मुळींच जुळत नाहींत.

या चमत्कारांचा अमर्यादपणा.

(४.) प्रत्यक्ष या चमत्कारांकडे पहावें तों ते अकटोविकट व भयंकर दिसतात; चमत्कारांची कमाल इतकी केली आहे कीं सर्वच चमत्कारमय. हनुमानाचें उदाहरण पहा. अंजनी पर्वतावर वनस्पति गोळा करण्याचे पूर्वी सूर्योदय होईल म्हणून त्यानें सूर्यमंडळ काखेंत मारून रामानें ज्या ठिकाणीं तळ दिला होता तेथें तो जाता झाला.

रामेश्वर व लंका यांच्या दरम्यान सेतु बांधण्याकरितां हनुमानानें डोंगर उचलून समुद्रांत फेंकले. आतां हे डोंगर हनुमानानें कसे व किती आणिले याविषयीं ग्रंथांत पहावें तों काय चमत्कार सांगावा! त्यानें आपल्या एकेका रोमरंध्रावर एकेक असे लक्षावधि पर्वत उचलून समुद्रांत टाकले.

प्रियव्रतानें रथांत बसून पृथ्वीला सात प्रदक्षिणा केल्या. त्याच्या रथचक्रांच्या ज्या खांडी पडल्या तेणेंकडून एकांत एक असे सात सात समुद्र झाले.

अगस्ति ऋषीनें तीन आचमनांनीं समुद्र प्राशन करून क्षारोदकानें तो लघ्वीवाटें भरून टाकला.

गोकुळवासी जनांचें पर्जन्यापासून रक्षण करण्याकरितां कृष्णानें गोवर्धन पर्वत उचलून आपल्या करांगुलीवर छत्रीप्रमाणें कित्येक दिवस धरिला.

याप्रमाणें हजारों चमत्कार सांगतां येतील; दुखणाईत मनुष्याच्या स्वप्नाप्रमाणें हे सर्व चमत्कार आहेत असें पूर्वीं जें आह्मीं सांगितलें आहे त्याचा प्रत्यय वरील उदाहरणांवरून येईलच.

या चमत्कारांचा परस्परविरोध.

(५.) जे पुरुष एककालीं अति विशाल कृत्यें करण्यास समर्थ तेच अन्यकालीं अगदीं निर्वीर्य झालेले पाहून या अद्भुत चमत्कारांचा मोठा चमत्कार वाटतो.

ब्रह्मदेवाचें शीर शंकरानें आपल्या अंगठ्याच्या नखानें तोडल्यामुळें ब्रह्म्यानें त्यास शाप दिला तरी पण त्याच्या हातांतून तें मस्तक सुटलें नाहीं. त्याच शापामुळें शंकर शक्तिहीन होत्साता एका भयंकर राक्षसापुढें त्याच्यानें टिकाव न धरवून सैरावैरा पळत सुटला.

भृगु ऋषीनें विष्णूस शाप देऊन त्यास मृत्युलोकीं दहा जन्म[1] घेण्यास लावलें. कृष्णावतारीं विष्णूनें मोठीं अचाट कर्मे केलीं असून शेवटीं ब्राह्मणाचा शाप त्यास भोंवला. तो असा कीं एकदा दुर्वास ऋषीचें आतिथ्य करतांना ऋषीच्या पायांवर भाताचीं शितें पडलीं. त्यावरून तूं अपमृत्यूनें मरशील असा शाप त्यानें कृष्णास दिला. पुढें एके दिवशीं कृष्ण झाडाखालीं निजला असतां एका पारध्यानें त्याच्या गुडघ्यास हरिण समजून बाण मारिला व त्यामुळें तो गतप्राण झाला.

नहुष ह्मणून कोणी राजा होता. तो तपोबलानें इंद्रपद पावणार इतक्यांत अगस्त्य ऋषीच्या जटा त्यानें धरून विसकटल्या तेव्हां त्या शीघ्रकोपी ऋषीनें त्यास शापून क्षणार्धांत सर्पाच्या योनींत घातलें.

शंकरानें ब्रह्मदेवास शाप दिल्यामुळें त्याची पूजा कोणी करीत नाहीं.

## ५. हिंदु धर्मग्रंथांतील भविष्यें.

भविष्यपरीक्षण.

(१.) भविष्य व भविष्योत्तर म्हणून जीं पुराणें आहेत त्यांच्या नांवांवरून व मत्स्य-पुराणांत जें सांगितलें आहे त्यावरून हीं पुराणें भविष्य कथनाचीं असावींत असें सहज वाटण्यासारिखें आहे, तथापि त्यांत भविष्यें नसून क्रियाकर्मविधि मात्र सांगितला आहे. निव्वळ भविष्य ग्रंथ हिंदु धर्मांत असल्याचें ऐकिवांत नाहीं.

चाऱ्ही शास्त्रें भविष्य कथनाचा आव घालतात.

(२). भविष्याभास होणारीं वाक्यें हिंदु धर्मग्रंथांतून ओतप्रोत भरलीं आहेत. उदाहरणार्थ विष्णुपुराण घ्या. हें पुराण परिक्षित राजाचे वेळेस रचलें असें त्याच पुराणावरून कळून येतें. यांतील खंड ४ अ. २१,२२,२३,२४ यांत परिक्षित राजापासून पुढें कोणते राजे भरत-खंडावर राज्य करतील हें कथन केलें आहे. हेंच वायु, मत्स्य, व

---

[1] हिंदु धर्मांतील प्रसिद्ध दहा अवतार ते हेच. विष्णूनें दयार्द्रबुद्धीनें दश अवतार आपण होऊन घेतले नसून एका क्रुद्ध ऋषीच्या शापामुळें त्यास अवतीर्ण होणें प्राप्त झालें असें असूनही दशावतार ईश्वरी दयेचें प्रमाण ह्मणून अन्यत्र त्याचे स्तुतिपाठ गायिले आहेत. अशा अर्थाचे भगवद्गीतेंत दोन प्रसिद्ध श्लोक आहेत ते असे :

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

भ० गी० अ० ४:७,८.

याचा अर्थ: हे अर्जुना, जेव्हां जेव्हां धर्माची हानि होऊन अधर्म माजतो तेव्हां मी प्रगट होतों. साधूंचें रक्षण करण्यास व दुष्टांचा संहार करण्यास तसेंच धर्माची संस्थापना करण्यास मी युगायुगांचे ठायीं अवतार घेतों. याप्रमाणें अवतारांविषयीं परस्परविरुद्ध अशा भिन्न समजुती आहेत.

भागवतपुराणांत कथन केलें आहे.[१] हें वाचून हिंदु धर्मग्रंथांत खरीं भविष्यें आहेत असा एकाद्या अशिक्षित मनुष्याचा पक्का समज होण्याचा संभव आहे. परंतु पुराणांतील हीं वाक्यें त्यांत कथन केलेल्या गोष्टी घडल्यानंतर कित्येक वर्षांनीं लिहिलीं असावींत असें सर्व विद्वानांचें मतैक्य आहे. यासाठीं या चाऱ्ही पुराणांचा काल निश्चित झाल्यावांचून हीं वाक्यें भविष्यें ह्मणून मानितां येणार नाहींत. हीं वाक्यें फार प्राचीन आहेत एवढें काय तें ब्राह्मण लोक ह्मणतात, पण तीं तशीं असल्याबद्दल त्यांजकडून लेशमात्रही प्रमाण मिळत नाहीं.

(३.) या भविष्यांमध्यें मोडणाऱ्या पुराणांतर्गत कथा परस्पर फारच विरुद्ध आहेत. पुढें होणारे राजे, त्यांची संख्या व त्यांचा कालानुक्रम यांविषयीं विसंगतपणा आहे. बरें, त्यांची सांगड घालूं ह्मणावें तर तेंही दुरापास्त. परस्परविरुद्ध अशीं दोन विधानें एकाच काळीं खरीं असूं शकत नाहींत. प्रस्तुत प्रसंगीं चार भविष्यें असून त्यांतून कोणतींही दोन परस्परांशीं जुळत नाहींत.

या भासणाऱ्या भविष्यांचा परस्पर विरोध.

(४.) हिंदुस्थानचा इतिहास जगाच्या परिसमाप्तीपर्यंत सांगण्याचा आव पुराणांनीं घातला असून, मुसलमानांनीं केलेल्या स्वाऱ्यांविषयीं जरी त्यांत बरीच माहिती दिली आहे, तरी त्यानंतर जे मोगल बादशाह झाले त्यांविषयीं किंवा पोर्तुगीज लोकांविषयीं किंवा इंग्रेज लोकांनीं जें साम्राज्य या देशांत स्थापून त्यांत सामाजिक, राजकीय, नैतिक व धार्मिक सुधारणा आजपर्यंत करून पुढेंही तोच क्रम अव्याहत चाललेला दिसतो या सर्वांविषयीं यत्किंचित्‌ही उल्लेख पुराणांत नाहीं ही फारच आश्चर्याची गोष्ट आहे.

हिंदुस्थानाच्या इतिहासांतील मुख्य मुख्य गोष्टी पुराणांत मिळत नाहींत.

(५.) जगाच्या इतर भागांविषयीं पुराणें अगदीं मुग्ध आहेत. तेव्हां एशिआ, यूरोप, आफ्रिका व अमेरिका या खंडांतून ज्या घडामोडी होणार त्या पुराणदृष्ट्या निरर्थक किंवा त्यांचा या भरतभूमीशीं अर्थाअर्थीं संबंध बिलकुल नाहीं असें समजावें कीं काय?

त्यांचें अनुसंधान काय तें हिंदुस्थानापुरतें.

(६.) या भविष्यांचा खऱ्या वृत्तांतांशीं मेळ पडत नाहीं. मासल्याकरितां पुढील भविष्यें पहा: "उत्तरोत्तर धन व धर्मश्रद्धा यांचा क्षय होत जाऊन सर्व जगांत दुराचार माजेल;" "राज्यकर्ते लोभी होऊन प्रजेला करभारानें दडपतील व त्यामुळें प्रजा रानावनाचा आश्रय धरून कंदमुळें खाऊन आपला निर्वाह करील;" "मनुष्य फार झाला तर तेवीस वर्षें जगेल;" "शेवटीं कलंकी अवतार होऊन तो सर्व

पुष्कळ गोष्टींत हीं भविष्यें खोटीं ठरतात.

---

[१] See Wilson's Vishnupurana, p. x.

म्लेंच्छ, चोर, व पापी यांचा संहार करील."[१] आतां म्लेंच्छ ह्मटले ह्मणजे झाडून सर्व यूरोपीअन लोक. त्या बापड्यांचा कलंकी अवतारांत संहार होईल हें भविष्य खरें नसून संभवनीयही नाहीं. याचप्रमाणें बाकीचीं भविष्येंही विसंगत आहेत.

विष्णुपुराणांत ज्योतिषादि शास्त्रें व धर्म शिकविण्याचा डौल घातलेला आहे. परंतु ज्या तारायंत्रामुळें हजारों कोसांवरील दूरदूरचे देश निव्वळ परसांतील भाजी होऊन बसले आहेत त्या व त्यासारखेच टेलिफोनादि इतर विलक्षण शोध यांविषयीं त्या पुराणांत एक शब्दही नसावा हें आश्चर्य नव्हे काय?

परिक्षित राजामागून जे राजे झाले त्यांची संपूर्ण मालिका पुराणांत सांपडते, परंतु गेल्या सहाशें वर्षांत जे राजे, बादशाह, व योद्धे या देशांत होऊन गेले त्यांविषयीं यत्किंचित्ही उल्लेख पुराणांत नसावा हें आश्चर्य नव्हे काय? पण तेराव्या शतकापासून तों जगाच्या समाप्तीपर्यंतचा हिंदुस्थानचा इतिहास थोड्या श्लोकांत गुंडाळिला आहे तर आश्चर्य कशाचें!

ईश्वरी प्रेरणेवांचून भविष्य कोणासही कळून येत नाहीं हें जाणून पुराणग्रंथकारांनीं त्याजविषयीं मोठ्या धूर्ततेनें मौन धारण केलें हेंच यांतलें इंगित असावें.

### ६. ईश्वरप्रणीत ह्मणविणारे हिंदु धर्मग्रंथ इतके आहेत कीं त्यांचा विस्तार पाहूनच नवल वाटतें.

हिंदु धर्मग्रंथांचा अमर्याद विस्तार.

ख्रिस्ती लोकांचें बायबल हें मोठेंसें पुस्तक नसून मनुष्यमात्रास सर्व विषयांचें तें मार्गदर्शक आहे असेंही ह्मणतां येत नाहीं. वेद, शास्त्रें व पुराणें यांचा विस्तार फारच मोठा आहे. नुसत्या वेदांत ३०,००० सूत्रें आहेत.[२] उपपुराणें खेरीजकरून मुख्य पुराणांतून कमींत कमी चार लक्ष श्लोक आहेत.[३] तसेंच, सहा शास्त्रें देखील मोठमोठाले ग्रंथ आहेत. या ग्रंथांचा निदान शतांश तरी ज्यानें अवलोकन केलेला आहे असा ब्राह्मण सांपडणें कठीण.

हे ग्रंथ ईश्वरप्रणीत नाहींत यासंबंधानें निराळा पुरावा पाहण्याची जरूर नाहीं. वरील पुरावा काय कमी आहे! तशांत ब्राह्मणांच्या अनुशासनाप्रमाणें करूं लागल्यास हातच टेंकावे लागतील; कारण संस्कृतांतच त्यांचें अध्ययन केल्यास आयुष्य पुरणार नाहीं.

याप्रमाणें बाह्य प्रमाणांचा यथेष्ट विचार झाला. आतां अंतःप्रमाणाकडे वळूं.

### अंतःप्रमाण.

हिंदु धर्म येथूनतेथून लबाडीनें भरलेला आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं.[४] हिंदु धर्मग्रंथांत अनेक योग्य सत्यवचनें आहेत. त्यांत वैगुण्य इतकेंच कीं खऱ्या व खोट्या वचनांचा ठिकठिकाणीं संकर केलेला आढळतो. जे जे ग्रंथ ईश्वरप्रणीत असतात त्यांचीं अवश्य लक्षणें हिंदु धर्मशास्त्रांस लागू पडत नाहींत हें दाखविण्याकडे आपण आतां वळूं.

---

[१] हीं भविष्यें विष्णुपुराणांतून शब्दशः उतरून घेतलीं आहेत.

[२] Roth "On the Literature and History of the Veda."

[३] Wilson's Vishnupurána, p. xiv. [४] दहावें पत्र पहा.

शास्त्रांचा विरोध.

१. हिंदुधर्मशास्त्रें परस्परविरोधी आहेत यावरून तीं ईश्वरप्रणीत नाहींत हें स्पष्टपणें सिद्ध होतें.

उपनिषदें[१] व पुराणें यांचें वेदांशीं जुळत नाहीं; तसेंच षड्शास्त्रांचें असून तींही परस्परांशीं विरुद्ध आहेत; व पुष्कळ महत्त्वाच्या विषयांत पुराणापुराणांतच भांडण असून उभा दावा असल्याचें आपण पहातों.[२]

ज्याप्रमाणें हिंदु लोकांचे देव त्याचप्रमाणें त्यांचे ग्रंथही परस्परभिन्न असे आहेत. वेदांत पंच महाभूतांची पूजा सांगितलेली असून प्रस्तुतकाळीं ज्या देवांची भक्ति प्रचलित आहे त्यांतील एकाचाही मागमूस त्यांत नाहीं. प्रतिमापूजेची आज्ञा वेदांत नाहीं. असें असून आज हिंदुस्थानांत मूर्तिपूजेचें बंड किती माजलें आहे! कित्येक हिंदु धर्मग्रंथांत फक्त अनेक देवमत प्रतिपादन केलेलें असून कित्येक पहावें तों अद्वैतवादी आहेत. एकंदरींत या दोन्ही मतांची भेसळ फार चमत्कारिक रीतीनें हिंदु धर्मांत झालेली आहे. कथाभाग एकच असून तो दोन पुराणांत दोन तऱ्हांनीं सांगितलेला असतो. याचीं शेंकडों उदाहरणें देतां येतील. आतां या विषयावर जास्त विस्तार नको, कारण सुशिक्षित हिंदु लोकांस हें नाकबूल करितां येणारच नाहीं.

हे धर्मग्रंथ स्वभावसिद्ध धर्माच्या विरुद्ध आहेत.

२. हिंदु धर्म स्वभावसिद्ध धर्माशीं जुळत नाहीं. हा मुद्दा पुढें आणिला कीं हिंदु लोक निरुत्तर होतात. कारण तशीच गोष्ट आहे. त्या धर्मांतील मतें व अनुशासनें स्वभावसिद्ध धर्माशीं सर्वथैव प्रतिकूल आहेत.

ईश्वराविषयीं कल्पना.

(१.) ईश्वर एक असून, तो शुद्ध परमात्मा स्वरूप आहे व त्यानें हें अखिल ब्रह्मांड निर्माण करून त्याचें पालनही तोच करितो अशा प्रकारची परमेश्वराविषयीं हिंदु लोकांत कल्पना नाहीं. हें अखिल विश्व ईश्वरच आहे असें कित्येक मानणारे असून कित्येक अनेक देवमतांत शिरले आहेत; असा घोंटाळा साधारण हिंदु लोकांत झालेला आहे. अनेक देवमतांत शिरून हिंदु लोकांनीं दैवतांची संख्या ३३ कोटीपर्यंत नेली; पण अद्वैतमताप्रमाणें तर त्यांनीं हें सर्व विश्वच ईश्वर आहे असें ठरविलें. ही सृष्टि ईश्वरानें केली नसून त्यापासून ती उद्भवली आहे अशी एक साधारण समजूत आहे. पवित्रतेसारखे महान् महान् परमेश्वराचे गुण हिंदु लोकांस मान्य नाहींत. परमेश्वर सगुण आहे व निर्गुणही आहे असें ते समजतात. ईश्वर सत्त्वगुणी आहे इतकेंच नाहीं तर तो रजोगुणी व तमोगुणीही आहे अशी कल्पना करून त्यास कलंक लावितात. जर रजोगुणांनीं

[१] उपनिषदें वेदांची पुरवणी ह्मणून समजतात, पण हें मत ब्राह्मणास मान्य नाहीं: उपनिषदांत तत्त्वविद्या सांगितलेली आहे.

[२] पुराणापुराणांचा उभा दावा आहे असें वेबर साहेब ह्मणतात.

ईश्वर दूषित होत नाहीं असें मानिलें तर तमोगुण त्यास विशेष वैगुण्य आणणारा आहे हें उघड आहे; कारण तमोगुणांत "अज्ञान, माया, काम, व गर्व" या गुणांचें बीज आहे. यामुळें अर्थात्च पवित्रता नष्ट होऊन ईश्वर ज्ञानशून्य होऊन बसतो.

परमात्म्यापासून जरी अनेक देव झाले तरी तो व ते एकच आहेत अशी साधारण समजूत आहे. लबाडी, व्यभिचार, मत्सर आदीकरून दुर्गुणांनीं हे देव परिपूर्ण आहेत.

ब्रह्मा, इंद्र, कृष्णादिकांच्या ज्या कथा पुराणांतरीं आहेत त्या ऐकून शुद्ध व सात्विक मनुष्यास खरोखरींच तिटकारा उत्पन्न होतो. त्यांच्या अति निंद्य कर्माचें वर्णन करून मी आपली लेखणी विटाळीत नाहीं. या ज्या ईश्वरी लीला म्हणून मानतात त्या जर तुह्मी आह्मी करण्यास प्रवृत्त झालों तर आपण खरोखर राक्षस मानिले जाऊं.

(२.) त्याचप्रमाणें मनुष्याविषयींची हिंदु धर्मांतील समजूत स्वभावसिद्ध धर्माच्या विरुद्ध आहे.

मनुष्याविषयीं कल्पना.

मनुष्याचा आत्मा हा परमात्म्याचा अंशच आहे असें हिंदु लोक साधारणतः समजतात. ज्याप्रमाणें जलबिंदु सागरांत मिळून एकीकरण पावतो तद्वत् मनुष्याचा आत्मा परमात्म्यापासून निघून शेवटीं त्यांतच जाऊन मिळतो. मध्यंतरीं इहलोकीं त्यास कधीं मनुष्ययोनि, तर कधीं पशु, पक्षी, मत्स्यादि योनींमधून जाणें प्राप्त होतें. ही कल्पना स्वभावसिद्ध धर्माशीं बिलकुल जुळत नाहीं ह्मणून चुकीची ह्मणणें भाग पडतें.

पापाची कल्पना.

(३.) पापाविषयींची कल्पना वरीलप्रमाणेंच स्वभावसिद्ध धर्माशीं अगदीं विरुद्ध आहे. मी व ईश्वर भिन्न आहोंत अशी अहंवृत्ति बाळगणें हेंच पाप अशी साधारण समजूत आहे. ही केवढी मोठी अनर्थकारक चूक! हिंदु धर्मांतून जीं असंख्य निरर्थक क्रियाकर्में सांगितलीं आहेत तीं न आचरणें किंवा विधिमार्गाचा अतिक्रम करणें यास ते पाप समजतात.

प्रायश्चित्त.

(४.) पापाप्रमाणेंच पापक्षालनाची कल्पना देखील चुकलेली आहे. नीतिभ्रष्ट झालेला मनुष्य क्रियाकर्मांनीं शुद्ध होतो अशी समजूत आहे. अंतःकरण ठिकाणीं नसून केवळ देवाच्या नामघोषानें किंवा गंगा, भागीरथी इत्यादि नद्यांच्या स्नानानें, किंवा पंचगव्य घेतल्यानें पापविमोचन होतें असे पापक्षालनार्थ असंख्य विधि हिंदु धर्मांत सांगितले आहेत.

वर सांगितलेलीं क्रियाकर्में केल्यानें पाप किती निंद्य आहे व परमेश्वर पवित्र असून दयाळूही आहे असा संस्कार मनावर घडत नाहीं; पण ख्रिस्तानें मनुष्यजातीकरितां केलेलें प्रायश्चित्त पाहून मनास कसा बोध होतो बरें! तें मानवास पवित्र व नम्र करणारें आहे असें ख्रिस्ती शास्त्राच्या अवलोकनानें कळून येईल.

(५.) हिंदु धर्मांतील अनेक प्रघात स्वभावसिद्ध धर्माच्या अगदीं विरुद्ध आहेत.

दुष्ट प्रघात.

उदाहरणार्थ, जातिभेद घ्या. या दुष्ट चालीपासून ब्राह्मणांचा पगडा नीच जातींवर पूर्णपणें बसून त्यांस कशी दैना प्राप्त झाली आहे तें पहा.

ह्याप्रमाणेंच स्त्रियांस प्रत्येक कामांत वागविण्याची चाल जुलमी व अन्यायाची आहे. वेदकालीं सतीचा प्रघात नसून पुढें निरनिराळ्या शास्त्रांतून तो आज्ञापित झाला आहे.

लग्नास वधूवरांची स्पष्ट संमति अवश्य मानिली जात नाहीं. तीवांचूनही विवाह होतो. तसेंच, स्त्रिया वयांत येण्यापूर्वीं गतभर्तृका झाल्या तरी त्यांस पुनर्विवाह करण्यास मोकळीक नाहीं. (मनु० ५:१६२.)

धर्मविधि ह्मणून आत्मवध[१] करण्याची चाल कित्येक प्रसंगीं प्रशस्त मानिली आहे.

(६.) विशिष्ट प्रसंगीं लबाडी, खोटी साक्ष व चोरी यांस शास्त्राची मोकळीक आहे.

दुराचारप्रवर्तक आज्ञा.

उदाहरणार्थ, मनुसंहिता अ० ८ श्लोक १०४ यांत या प्रकारें सांगितलें आहे :

"चाऱ्ही वर्णांपैकीं कोणाचाही प्राणघात खोटी साक्ष दिल्यानें टळतो आहे तर खुशाल खोटें बोलावें."

तसेंच मनुसंहिता अ० ८ श्लोक ११२ यांत असें सांगितलें आहे :

"स्त्रियांशीं, लग्न जमवते वेळीं, गाईनें दुसऱ्याचे शेतांत जाऊन गवत वगैरे खाल्ल्यास, यज्ञाकरितां काष्ठें गोळा करितांना, किंवा ब्राह्मणाचे संरक्षणार्थ अभयवचन दिलें असल्यास, खोटें बोलण्यास प्रत्यवाय नाहीं."

हिंदु धर्मशास्त्रें ईश्वरप्रणीत नाहींत यास हें निश्चयात्मक प्रमाण आहे.

धर्मग्रंथांतील शास्त्रीय दोष.

३. हिंदु धर्मग्रंथांत शास्त्रीय विषयांच्या अनेक चुका असल्यामुळें ते खरे ठरत नाहींत.

हिंदु धर्मग्रंथांत शास्त्रीय विषयांचा उल्लेख प्रसंगोपात्त केलेला नसून ते ते विषय पूर्णपणें समजून देण्याचा आव घातला आहे. पण तो डौल फुकट.

पुराणांतील भूगोलवर्णन व ज्योतिष हीं भयंकर चुकांनीं भरलेलीं आहेत. ग्रह नऊ असून सूर्य नवग्रहांतच धरिला आहे. सूर्यचंद्राला राहु व केतु ग्रासूं लागले ह्मणजे ग्रहणें होतात. सूर्य चंद्राहून आपल्याला अगदीं जवळ आहे इत्यादि दोष पुराणांत भरलेले आहेत. सिद्धांतशास्त्रांतील ज्योतिष याहून वेगळें आहे; तथापि तेंही निर्दोष आहे असें नाहीं. त्यावरून तर पृथ्वी ग्रहमालेच्या केंद्रस्थानीं असून अचल आहे.[२]

हिंदु लोकांचें वैद्यशास्त्र व शारीरशास्त्र चुक्यांनीं ओतप्रोत भरलेलें असून रसायनशास्त्र तर त्यांहून वाईट आहे.

---

[१] हिंदुस्थानांतील कित्येक भागांत अद्याप ही चाल आहे.

[२] हिंदु लोकांचें ज्योतिषशास्त्र ख्रिस्ती शकाचे आरंभीं ग्रीक लोकांपासून घेतलें असावें व पुढें पांच किंवा सहा शतकांनीं तें पूर्णत्वास आलें.

खरा इतिहास व तदंतर्गत कालगणना यांचा अभाव असल्यामुळें त्यांऐवजीं हिंदु शास्त्रांतून भाकडकथा भरलेल्या आहेत.

गणित, न्याय, व अलंकारशास्त्र व वैद्यकाचा कांहीं भाग खेरीज करून इतर सर्व शास्त्रें दोषपरिपूर्ण आहेत.[१]

हिंदु धर्म फक्त हिंदु लोकांकरितां आहे.

४. हिंदु धर्म फक्त हिंदु लोकांकरितांच असल्यामुळें तो ईश्वर-दत्त ठरत नाहीं. जर कोणी हिंदु धर्म स्वीकारण्यास प्रवृत्त झाला तर उलटी त्या धर्माची त्यास आडकाठी आहे.

पण असें कां? जर देव एक आहे तर खरा मार्गही एकच असला पाहिजे; आणि हिंदु धर्म जर हिंदुस्थानाकरितां निर्माण झाला असें ह्मणावें तर बिचाऱ्या इंग्लंडानें काय केलें! यावत् मनुष्यमात्र एका पित्याचीं अपत्यें असल्यामुळें त्यांनीं एकदील होऊन शुद्धांतःकरणानें व आनंदानें परमेश्वराचें भजन करावें हें त्यांस उचित आहे. ह्मणू-नच ख्रिस्ती धर्म या प्रकारें शिकवीत असून तसें एक दिवस घडून येईल अशी उमेद त्या धर्माची आहे. पण हिंदु धर्मास तसें होणें नको आहे: अवघ्या मनुष्यजातीनें बंधुभगिनी होऊन एक अंतःकरणानें परमेश्वराची उपासना करावी हें तत्त्व त्या धर्मास अगदीं नापसंत आहे.

५. व्यक्तिस्वातंत्र्य हिंदु धर्मानें अगदीं नष्ट झालें आहे. आपलें कुटुंब,[२] गांव व

---

[१] स्थलसंकोचामुळें हे सर्व असंख्य दोष येथें नमूद करणें शक्य नाहीं, तथापि पुराणांतील ह्मणजे विशेषतः विष्णुपुराणांतील विलक्षण भूगोलवर्णन संक्षेपानें सांगतों. पृथ्वीवर एकांत एक अशीं सप्तद्वीपें आहेत. त्या द्वीपांच्या मध्यंतरीं निरनिराळ्या रसांचे समुद्र आहेत.

पृथ्वीच्या मध्यभागीं वर्तुलाकार असें जंबुद्वीप आहे. त्याच्या मध्यभागीं मेरु पर्वत आहे. त्याची उंची ६४,००० मैल आहे. ही उंची कोठें व हिमालयाची पांच मैल उंची कोठें! जंबुद्वीपाच्या सभोंवार क्षारसमुद्र आहे.

त्याच्या पलीकडे प्लक्ष द्वीप असून त्याच्या सभोंवतीं इक्षुरसाचा समुद्र आहे.

त्याच्या पलीकडे शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर अशीं द्वीपें असून तीं तीं सुरा, घृत, दधि, दुग्ध व शुद्धोदक यांच्या समुद्रांनीं परिवेष्टित आहेत.

त्याच्या पलीकडे सुवर्णद्वीप आहे.

सुवर्णद्वीपाच्या पलीकडे लोकालोक पर्वत. त्याच्या पलीकडे अलोकस्थान व सर्वांच्या पलीकडे ब्रह्मांड कवच आहे.

[२] हिंदु लोकांची गृहस्थिति फार शोचनीय आहे. स्त्रियांचें स्वातंत्र्य सर्वतोपरी हरण केलें आहे हेंच एक उदाहरण घ्या.

हिंदु धर्मानें व्यक्तिस्वांतत्र्य नष्ट होतें.

जाती यांपलीकडे हिंदु लोकांस कांहीं दिसत नाहीं. खऱ्या-खोट्याचा विचार न करितां दुसरा करतो तसेंच आपणांस केलें पाहिजे अशी त्यांची प्रवृत्ति आहे. विवेकबुद्धीचा धनी काय तो परमेश्वर आहे व मनुष्यानें कर्तव्यपराङ्मुख झालें न पाहिजे हीं तत्त्वें निरर्थक व मूर्खपणाचीं आहेत असें हिंदु लोक समजतात.

या प्रकारें व्यक्तिस्वातंत्र्याचें मातेरें झालें आहे. ह्मणूनच सामाजिक व राष्ट्रीय कल्याण होणें दुरापास्त झालें आहे. कारण प्रत्येक वरच्या जातीचा पगडा खालच्या जातीवर असून, ब्राह्मणाचा तर सर्वांवर पगडा आहे. ह्मणूनच हिंदु लोकांनीं धर्मांतर केलें पाहिजे. न करतील तर त्यांची एकी न होतां त्यांस राष्ट्रत्व प्राप्त होणार नाहीं.

सामाजिक व राष्ट्रीय उन्नति.

६. हिंदु धर्मानुयायी मनानें व आचरणानें नीतिभ्रष्ट होतात याचा दोष त्या धर्माकडे आहे हें सिद्ध करून दाखविणें फार सुलभ आहे.

हिंदु धर्माचा दुराचरणाकडे झोंक.

मानसशास्त्राचा असा एक सिद्धांत आहे कीं पूज्य वस्तूप्रमाणें पूजकाचें मन बनतें.[१] या न्यायानें हिंदु देवतांचें अनुकरण हिंदु लोकांस करावें लागून त्यांची अवनति झाली आहे. तसेंच, ज्या गोष्टींस हिंदु धर्माची सदर परवानगी आहे व जीं कर्तव्यें ह्मणून त्यांत सांगितलेलीं आहेत त्यांची प्रवृत्ति बहुतेक दुराचाराकडे असल्यामुळें तीं करून करून मनुष्याच्या मनांत अनीतीचें बीज निश्चयेंकरून रुजतेंच. ग्रंथांतरीं किंवा व्यवहारांत जो हिंदु धर्म आपण पाहातों त्या दोहोंपासूनही मनुष्याचें अंतःकरण शुद्ध होईल असें सत्त्व त्यांत नाहीं. दुराचारानें मलिन झालेल्या मनुष्याची जी अंतर्यामीं तळमळ होते ती दूर व्हावी ह्मणून हिंदु धर्माकडे पहावें तर त्यापासून बिलकुल सहाय होत नाहीं. जों जों त्या धर्मांतील भ्रामक उपदेशाकडे मनुष्य धांव घेतो तों तों अधिकाधिक भ्रष्ट होऊन तो गटंगळ्या खातो. मनुष्य कसा आहे, त्याची स्थिति, आशा व दुःखें कोणत्या प्रकारचीं आहेत व त्याच्या विशेष अगत्याच्या गोष्टी कोणत्या हें सर्व हिंदु धर्मग्रंथकारांस मुळींच न समजल्यामुळें त्यांच्या पदरीं मोठाच दोष येतो. ही केवढी दुःखाची गोष्ट आहे! हिंदु धर्माविरुद्ध जे कांहीं मुद्दे आहेत त्यांचें निराकरण यदाकदाचित् झालें नाहीं तथापि या वरील एका गोष्टीवरून देखील तो धर्म मनुष्यांनीं बनविलेला आहे हें सिद्ध होत आहे. डी. टोक-वीली नामक एका विचारी ग्रंथकारानें हिंदु धर्माविषयीं असें ह्मटलें आहे कीं "हिंदु धर्मांत असण्यापेक्षां एकपरी धर्मलोप झालेला बरा.[२]"

---

[१] हा सिद्धांत हिंदु लोकांस मान्य आहे. "यथा देवाः तथा भक्ताः" ह्मणजे देव तसे भक्त ही उक्ति सुप्रसिद्धच आहे. परंतु वारंवार लोकांचें वर्तन त्यांच्या धर्माहून चांगलें असल्याचें आपण पहातों. कारण ईश्वरदत्त मानलेल्या धर्मग्रंथांचें प्राबल्य, बुद्धि व विवेक चालू देत नाहींत.

[२] हिंदु धर्मावर या ग्रंथकाराचा याहून तीव्र तडाखा आहे, पण त्याचा उल्लेख या

या विषयावर अधिक लिहिण्याचें प्रयोजन उरलें नाहीं असें मला वाटतें. हिंदु धर्माच्या अंतर्बाह्य प्रमाणांचें जें वर विवेचन केलें आहे त्यावरून तो धर्म ईश्वरदत्त आहे असें ह्मणण्यास बळकटी मुळींच येत नाहीं असें दिसून येईल. ज्यानें इतिहासाचें अवलोकन केलें आहे अशा एखाद्या विचारी व नेकीच्या मनुष्यास हिंदु धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत आहेत असें सहसा वाटणार नाहीं.

## भाग दुसरा. वेदांविषयीं.

एकंदर सामान्य लोकांत जो धर्माचार चालू आहे त्याविषयीं एवढा वेळ आह्मीं ऊहापोह केला. त्यास पौराणिक हिंदु धर्म ह्मणण्याचा परिपाठ आहे. त्याशिवाय वैदिक व शास्त्रीय असे दोन प्रकार आहेत. वैदिक हिंदु धर्म वेदांत सांगितला आहे, व षड्शास्त्रांतून जो हिंदु धर्म सांगितला आहे तो तत्त्वविचाराचा आहे. आतां हिंदु धर्मास जीं प्रमाणें आहेत त्यांचें सामान्य निरूपण आपण आरंभिलें आहे. तर वैदिक व तात्त्विक हिंदु धर्माचें विवरण प्रस्तुत ठिकाणीं करणें इष्ट दिसतें.

पाश्चिमात्य पंडित वेदाध्ययन कां करितात हें इकडील लोकांच्या ध्यानांत येत नाहीं. वेद हे धर्मग्रंथ आहेत या समजुतीनें पाश्चिमात्य पंडित त्यांचें अध्ययन करीत नसून केवळ त्या ग्रंथांतील इतिहास व भाषालंकार यांकडे त्यांचें लक्ष्य लागलें आहे. तीन हजार वर्षांपूर्वीं आर्य लोकांची धार्मिक स्थिति कशी काय होती हें वेदांवरून आह्मांस समजतें. खरोखर या दृष्टीनें वेदांची महती फार आहे. परंतु वेदांत नैतिक व आध्यात्मिक मार्ग कितपत उपलब्ध आहे याविषयीं मात्र या पत्रांतून विचार कर्तव्य आहे.

वेद चार आहेत. एतद्देशीय पंडितांनीं वेदांचीं मुख्य अंगें तीन ठरविलीं आहेत. पहिलें, संहिता किंवा मंत्र. यांत छंदोबद्ध सूक्तें व स्तोत्रें आहेत. ब्राह्मणें हें दुसरें अंग. यांत मंत्रांची योजना, हवनाची उत्पत्ति, अर्थ व तीं करण्याची पद्धति सांगितल्यामुळें ब्राह्मणें हीं उपासना व अध्यात्मविद्येचे टीकारूप ग्रंथ आहेत. आरण्यकें हे ग्रंथ ब्राह्मण ग्रंथांचा भाग समजतात. त्यांचें अध्ययन ऋषि लोक अरण्यांत करीत होते ह्मणून त्यांस ही संज्ञा आहे. आरण्यकांपैकीं ज्या ग्रंथांत परमात्मा, आत्मा, सृष्टि व मनुष्याची गति इत्यादि गहन धार्मिक व शास्त्रीय विचार केले आहेत तीं उपनिषदें[1] होत. या ग्रंथांची हिंदु लोक परम पूज्य ग्रंथांत गणना करून त्यांस घरीं न ठेवतां देवालयांत ठेवणें प्रशस्त मानितात.

---

ठिकाणीं करून आमच्या हिंदु मित्रांचें मन दुखवावें हें आह्मांस प्रशस्त वाटत नाहीं. पाहिजे असल्यास या ग्रंथकाराचे लेख पाहावे. See his "Miscellaneous Writings" ( MacMillan and Co., 1861 ) Vol. i., p. 77.

[1] हा शब्द शद् ह्मणजे नाश करणें या धातूवरून झाला असावा. स्वयंभू जें ब्रह्म, ज्याचें ज्ञान झाल्यानें अज्ञानांधकार समूळ नाश पावतो तें ज्ञान उपनिषदांत असल्यामुळें त्यांस ही संज्ञा प्राप्त झाली असावी. तथापि या शब्दाचा अर्थ व्याख्यानमाला असाही संभवतो.

या पत्रांत वेद ह्मणून ज्या ठिकाणीं ह्मटलें आहे तेथें संहिता असें समजावें. संहितेंत हिंदु धर्माचें अगदीं प्राथमिक स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें. अति पुरातन उपनिषदें देखील अगदीं अलीकडचीं ह्मणजे वेदांनंतर सुमारें एक हजार वर्षांनीं झालीं असावीं. त्यांपैकीं कित्येक तर अगदीं अलीकडचीं आहेत. वेद व उपनिषदें या दोहोंतील अध्यात्म विचार परस्पर अगदीं भिन्न आहेत.

वैदिक देवता.

वेदांत ईश्वराला **देव** हा शब्द आहे. तो दिव् किंवा द्यु ह्मणजे प्रकाशणें या धातूवरून झाला आहे. ह्मणून वेदांतील देवाविषयींची कल्पना प्रकाशावरून, विशेषतः, तेजोमय आकाशाच्या स्वरूपावरून घेतली असावी. यावरून प्राथमिक हिंदु धर्म ह्मटला ह्मणजे सृष्ट पदार्थांची उपासना ह्मणजे सृष्टींतील चमत्कारांस देवत्व देणें यांत अंतर्भूत झाला आहे.

द्योस् ह्मणजे आकाश हें फार प्राचीन काळीं आर्य लोकांचें मुख्य दैवत होतें अशाविषयीं वेदांत प्रमाणें आहेत. तथापि वेदांत इंद्राला द्योस् देवापेक्षां श्रेष्ठत्व दिलें आहे. त्याचे खालोखाल दुसरें दैवत वरुण होय. हें पुराणांतील जलदैवत असून वेदांत ही संज्ञा सर्व वस्तूंस वेष्टणारें जें अति उंच आकाश त्यास दिली आहे. तिसरें दैवत अग्नि.[१] हे तिन्ही देव सपत्नीक आहेत. इंद्राची इंद्राणी, वरुणाची वरुणानी, व अग्नीची अग्नायी अशीं त्यांच्या पत्न्यांचीं नांवें जरी सांगितलीं आहेत तरी त्यांचा उल्लेख फार थोड्या प्रसंगीं केलेला आहे.

यांहून खालच्या प्रतीच्या प्रकाशदेवता सूर्य, उषा व दोन अश्विनीपुत्र (उषेची प्रभा) ह्या होत.

तदनंतर मरुत् ह्मणजे वायु.

विष्णु हा इंद्राचा सहचर मानलेला आहे, तरी तो त्याहून खालच्या पायरीचा आहे. प्रकाशमान जें नभोमंडल तें तोच (विष्णु) आहे.

पृथ्वीला देवी मानलेली आहे.

उदकें ह्या देवता आहेत.

---

१ असें लासनसाहेब ह्मणतात. प्रोफेसर विलसनसाहेबांच्या मतें अग्नि व इंद्र हे मुख्य देव असून तिसरी जी सूर्यदेवता ती फार कनिष्ठ आहे. अग्नि, इंद्र, व सूर्य हे वेदकालीं मुख्य देव होते असें वेबरसाहेब ह्मणतात.

वेदांत देवांची क्रमवार व्यवस्था मुळींच नसून त्यांच्या गुणांचें वर्णन अस्पष्ट व परस्परविरुद्ध असें आहे; ह्मणून त्यांच्या अन्योन्यसंबंधाचा निर्णय अनुमानानें ठरवावा लागतो. उदाहरणार्थ, ऋग्. ३ मंड. ३ सर्ग, सूक्त १५ या ठिकाणीं असें ह्मटलें आहेः "इंद्रानें आपले वीरांच्या साह्यानें सूर्य, अरुण, पृथ्वी, अग्नि यांस निर्माण केलें." तथापि वेदांत अन्यत्र अग्नीस इंद्राहून उच्च पद दिलें आहे. हें एकच काय पण याप्रमाणें शेंकडों उदाहरणें देतां येतील.

वेदांत सोम ही एक बलिष्ठ देवता आहे. या वल्लीच्या रसप्राशनानें इतर देवांस अमरत्व प्राप्त झालें. प्राचीन हिंदु लोकांस हें मादक पेय अतिशय प्रिय असून त्यांचे देव व देवी यांसही तो रस प्रिय आहे असें मानीत असत. सोमाचा महिमा ह्मणून अतिशयोक्तीनें वर्णन केलेलीं अशीं शंभरावर स्तोत्रें वेदांत आहेत. हें सोमवल्लीचें फाजील वर्णन वाचून सखेदाश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं. एकंदर धर्माच्या इतिहासांत याहून बालिश प्रकरण दुर्मिळ ह्मटल्यास बाध येणार नाहीं.

याप्रमाणें वेदांतले मुख्य देव झाले. वेदांतील देवतांमध्यें ताऱ्यांची गणना झालेली नाहीं याचें आश्चर्य वाटतें.

शिव, दुर्गा, राम, कृष्ण, काली इत्यादि देवांचीं नांवें वेदांत आढळत नाहींत. पुराणांतील रुद्र, वेदांत अग्नि किंवा इंद्र या रूपानें आला आहे. लिंग, त्रिमूर्ति व दशावतार हे वेदांत सांगितले नाहींत. वेदाला ज्ञातिभेद मान्य नाहीं. ऋग्वेद मंडल १० श्लोक ६ ही ऋचा अगदीं अर्वाचीन आहे. पुनर्जन्माचें स्तोम अर्वाचीन हिंदु धर्मांत जें माजलें आहे त्याविषयीं अवाक्षर देखील वेदांत नाहीं.[1]

या विश्वाचा उत्पन्नकर्त्ता व नियंता जो परमेश्वर त्याचे ठायीं प्राचीन काळचे हिंदु लोकांचा विश्वास होता असें दर्शविणारें एकही वाक्य वेदांत असल्याचें आह्मांस माहीत नाहीं. तात्पर्य, वेद एकेश्वरी मताचे आहेत असें ह्मणतां येणार नाहीं.[2]

---

[1] ऋग् १:१६४.७२ ही उक्ति पुनर्जन्मास अनुलक्षून आहे असें कित्येक ह्मणतात. या ऋचेंत **बहुप्रजाः** ह्मणून जो शब्द आहे त्याचें भाष्य सायनाचार्यानें या प्रकारें केलें आहे : "अनेक जन्मास पात्र," किंवा "बहु संततियुक्त." हा दोहोंपैकीं फक्त दुसरा अर्थ प्रायः शुद्ध आहे.

[2] एलफिन्स्टन साहेबांनीं आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत (पुस्तक १ प्रकरण ४) या ठिकाणीं हिंदु लोक मूळचे एकेश्वरवादी होते असें जें ह्मटलें आहे तें चुकीचें आहे. हिंदु लोकांस कोणत्याही अर्थानें एकेश्वरी मताचे ह्मणतां येत नाहीं असें त्याच ग्रंथाचे प्रकाशक प्रोफेसर कोवेल यांनीं ह्मटलें आहे. भट्ट मोक्ष मुलर हे देखील वेद एकेश्वरवादी नसून बहुदेववादी आहेत असें ह्मणतात. (Chips Vol. i., p. 27). असें असूनही वेदांत एकेश्वरी मताची झांक मधून मधून दिसते. उदाहरणार्थ, ऋग्. १. ६४. १६. ६४ पहा. या ऋचेंत, लिहिणारा भ्रांतींत पडलेला आहे असें दिसतें; तथापि मधून मधून एक ईश्वर आहे अशा अर्थाचीं संदिग्ध वाक्यें तींत मिळतात.

वेदांत बहुदेवमत असून त्यांत विश्वदेवमतही आहे हें विसरतां कामा नये. सृष्टीचा प्रत्येक भाग ईश्वरी शक्तीनें युक्त असून ज्यापक्षीं अखिल विश्व असे सर्व भाग मिळून झालेलें आहे त्यापक्षीं सर्व विश्व ईश्वरमय आहे. कित्येक स्थळीं हें विश्वदेवमत अस्पष्ट रीतीनें दर्शविलें आहे.

वेदसंहितेंतील हा जो अभिप्राय तो तत्कालीन सर्व लोकांचा होता असें ह्मणतां येत नाहीं हें लक्ष्यांत ठेवावें. संहितांस हें जें स्तोत्ररूप प्राप्त झालें आहे तें पुरोहितांची योजना आहे.

वेदांत सृष्टिचमत्कारांस देवत्व दिलें आहे. यामुळें ते देव पौराणिक देवांसारखे मानव-गुणान्वित नसून तितके दुराचारभ्रष्टही नाहींत.

उपासना.

वेदांतील स्तोत्रांत आराध्य देवतेचा प्रभाव, पराक्रम, औदार्य व कधीं कधीं सौंदर्य यांचें वर्णन केलेलें असून त्या देवतेची स्तुति केल्याबद्दल व तीस जें कांहीं समर्पण केलें त्याबद्दल तिजपासून आशीर्वाद मागितलेला आहे. तसेंच, ऐहिक सुखें ह्मणजे धन, धान्य, जीवन, संतति, गायी, घोडे, युद्धांत यश, शत्रुनाश इत्यादि गोष्टी मागितल्या आहेत. पापाविषयीं ज्या ठिकाणीं उल्लेख सांपडतो तें स्वतःचें नसून इतरांचे पापास अनुलक्षून लिहिलेलें आहे. उदाहरणार्थ, "पापापासून आमचें संरक्षण करः दुष्टापासून आह्मांस संभाळ," असें वचन आहे.[१] वेदांत स्वतःचे पापाविषयीं जर कदाचित् लिहिलेलें आढळलेंच तर तें फारच संदिग्ध आहे[२].

देव देहधारी प्राण्यांप्रमाणें घृत वगैरे अर्पण केल्यानें संतुष्ट होतात अशी कल्पना होती. स्तुतिपाठ केल्यानें देवांचा प्रभाव वृद्धिंगत होतो व त्यामुळें देव प्रसन्न होऊन भक्ताचे मनोरथ पूर्ण करतील अशी खातरी तो बाळगीत असे. यथासांग पूजा व हवन केल्यानें भक्तानें मागितलेलें वरदान देवास देणें प्राप्त होतें अशी समजूत होती. प्रार्थना ही निव्वळ मंत्रजप करण्यांत उरली होती. मंत्रोच्चार पूर्ण व स्पष्ट झाला ह्मणजे त्यानें सर्व साध्य झालेंच पाहिजे अशी समजूत होती. प्रार्थना किंवा उग्र तप केल्यानें देवास वश करून घेण्याची जी अर्वाचीन हिंदु धर्मांतील अश्लील समजूत ती पहिल्या तीन वेदांत कोठेंही आढळत नाहीं. तथापि चौथ्या वेदांत अनेक ठिकाणीं ही कल्पना दृष्टोत्पत्तीस येते.

अर्पण, प्रार्थना आणि स्तुति अशी त्रिविध भक्ति वेदकालीं असे, व हीं कर्में उपासकाच्या घरींच होत असत. देवळें असल्याचा उल्लेख वेदांत मुळींच नाहीं. अर्पण करण्याचे मुख्य पदार्थ घृत व सोमरस असून हीं द्रव्यें पळींत घेऊन अग्नीवर ओतीत असत. सोमवल्लीचा रस काढून तो मादक झाल्यावर अग्नीवर व पसरलेल्या दर्भावर सिंचन करीत असत. नंतर देवांनीं येऊन दर्भासनावर बसावें व सोमपान करावें म्हणून त्यांचें आवाहन करीत असत. सोमरसाचा शेष यज्ञ करणारे पीत असत.

वैदिक कर्म करण्यास प्रत्येकास वेगवेगळें स्थंडिल करावें लागत असे, कारण प्राचीन आर्य लोकांस सामाजिक उपासना माहीत नव्हती व एकाच काळीं कोणी दोन मनुष्यांस उपासना कर्तव्य असल्यास एकमेकांस ऐकूं न जाईल अशा अंतरावर बसावें लागत असे, ह्मणजे प्रत्येकाचा व्यवहार वेगळा.

---

१ Wilson's Rigveda, Vol. iii, p. 411 पहा.

२ वेबर साहेबांनीं History of Indian Literature या पुस्तकाचे ३८व्या पृष्ठांत जो अभिप्राय लिहिलेला आहे त्यांत ते ह्मणतात कीं वेदांतील स्तोत्रांत पापाची धर्म-दृष्टीनें कल्पना मुळींच नाहीं. या अभिप्रायांत सत्यांशही बराच आहे असें आह्मांस वाटतें.

अर्पणाचे वेळीं निरनिराळ्या छंदांत रचलेलीं स्तोत्रें ह्मणत असत. प्रत्येक स्तोत्रांत कांहीं विशेष सामर्थ्य आहे अशी समजूत असे. उपासनेंत देखील अर्थाकडे दुर्लक्ष्य करून नादलुब्ध होण्याची प्रवृत्ति फार प्राचीन कालापासून हिंदुस्थानांत रूढ होऊन बसली आहे.[१]

कांहीं विशेष प्रसंगीं पशुयज्ञ करीत असत व “ कित्येक वेदवचनांवरून नरमेध करीत असत असेंही अनुमान करण्यास प्रत्यवाय नाहीं.”[२]

मरणोत्तर स्थिति.

वेदांत मरणोत्तर स्थितीविषयीं निश्चयात्मक ह्मणून कांहींच सांगितलेलें नाहीं. देव अमर आहेत व कांहीं मनुष्यांस देवपदाप्रत पोंहचणें शक्य आहे हें मत वेदास ग्राह्य असल्याचें दिसून येतें.[३] मरणोत्तर सुखें जीं म्हटलीं आहेत तीं निव्वळ विषयोपभोगाचीं आहेत. मृतांच्या आत्म्यांस हविर्भाग सेवन करण्यास आमंत्रण करण्याचीं स्तोत्रें वेदांत आहेत.

वेदाची भाषा व स्वरूप हीं लक्ष्यांत यावीं ह्मणून चार वेदांपैकीं मुख्य व प्राचीन जो ऋग्वेद त्यांतील कांहीं उतारे आह्मी देतों. हे उतारे ऋग्वेदाच्या प्रथम मंडलांतील असून त्यांचें भाषांतर प्रोफेसर विल्सन साहेबांनीं जें केलें आहे त्यावरून हें मराठींत उतरलें आहे :

शत्रुभक्ष वरुण ( सूक्त २ ). हे इंद्रा, शीघ्रसंचारी सोमरस तुजमध्यें प्रवेश करोत व ते प्रसन्न होऊन तुला प्रबुद्ध करोत. ( ५ )

सोमरस घटाघट पिऊन इंद्राचें उदर समुद्राप्रमाणें विस्तृत झालेलें असून गिरिशिखरावरील प्रवाहाप्रमाणें किंवा सुखरसाप्रमाणें नेहमीं आर्द्र असतें. ( ८ )

सुंदर हनुवटीचा किंवा सुंदर नाकाचा इंद्र. ( ९ ) तसेंच ८१, १०१ इ० पहा.

आह्मांस अपार व अक्षय्य संपत्ति दे. ( ९ ) उदार होऊन आह्मांस गायी पाठवून दे. ( १० ) सहस्रावधि उत्तम अश्व व गायी यांहींकरून आह्मांस श्रीमान् कर. ( २९ )

---

[१] ईश्वरज्ञानप्राप्तीकरितां **गायत्री** छंद, शक्तीकरितां **त्रिष्टुभ**, चिरायु होण्याकरितां **उष्णिक**, व पशुप्राप्तीकरितां **जगति** याप्रमाणें छंदांची योजना करणें प्राप्त असे. कोण मूर्खपणा हा!

[२] Wilson's Rigveda, Vol. i., p. 24. ऐतरेय ब्राह्मण खंड ७ अ. ३ यांतील शुणहशेप याची कथा सुप्रसिद्ध आहे ती पहा. तिजवरून वरील गोष्टीस प्रत्यंतर मिळतें. ऋग्वेदाचे पहिले मंडलांतील सात श्लोकांत याच गोष्टीचें अनुसंधान आहे. “ या कथेवरून प्राचीन काळीं नरमेध करण्याचा परिपाठ ब्राह्मणांत असून कित्येक ब्राह्मण मानलेले लोक आपल्या पुत्रांचा या कामाकरितां विक्रय करण्यास तयार असत” असें भट्ट मोक्ष मुल्लर ह्मणतात.

कलकत्त्याचे डाक्टर राजेंद्रलाल मित्र यांनींही हाच निर्णय ठरविला आहे.

[३] **रिभु, विभु** व **बज** असे तीन कुशल शिल्पकार देवत्व पावले असें लिहिलें आहे.

आमच्या स्तुतीनें तुझें बल वाढो. (१०) हे अग्नी, आमच्या शत्रूंचें दहन कर. (१२) आमच्या सर्व निंदकांचा नाश कर; आमच्या प्रत्येक पीडकाचा वध कर. (२९)

हे इंद्रा, जेव्हां तुझ्या हृदयांत भय शिरलें व जेव्हां तूं अहीला मारण्यास उद्युक्त झालास, तेव्हां त्याचा नाश करणारा दुसरा कोण तूं पाहिलास? कारण तूं भिऊन नव्याण्णव नद्या ससाण्याप्रमाणें ओलांडून गेलास. (३२)

हे इंद्रा, वणिकाप्रमाणें आह्मांस अडवून धरूं नकोस. (३३)

तीनपट अकरा देवता. (३४,३५,१३९) याप्रमाणें ठिकठिकाणीं आहे.[1]

हे इंद्रा, तृषाक्रांत मृगाप्रमाणें सोमपान कर. (१६) बैलाप्रमाणें उग्र होऊन तो (इंद्र) सोमरस घटाघट प्याला. (३२) सोमरस पिण्याकरितां तो बैलाप्रमाणें मुसंडी मारतो. (५५)

उल्लसित होण्याकरितां इंद्र सोमरस पितो. (१८)

वेदांतील एका सूक्तांत (२९) उखळ व मुसळ यांस देवता मानून त्यांचें आवाहन केलेलें आहे.

मदोन्मत्त इंद्र सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहे. (५५)

जे हविर्भाग देतात ते त्यायोगें तुझें महाबल व पुंसत्व हीं वाढवीत असतात. (५४)

इंद्राचें बल व आनंद हीं मनुष्यांकडून वृद्धि पावत आहेत. (८१)

हे वज्रधारी इंद्रा, मादक रसाच्या प्राशनानें तूं उल्लसित झालेला आहेस; तर पौष्टिक पदार्थांनें तृप्त होत्साता आपल्या स्त्रीसह रममाण हो. (८२)

हे उषा, मला तें विपुल धन प्राप्त होवो, ज्याच्या योगें कीर्ति, संतति, दासगण व अश्वप्राप्ति होते. (९२)

हे बृहदवयवी, अग्नि पी व आपलें उदर विस्तृत कर. (१०४)

शत्रूंची वाताहत करणारा जो पेदु त्याच्या अश्वाचें आवाहन नेहमीं करावें लागतें. (११६) तसेंच १:१७:११७.

दधंच यास तुह्मीं अश्वशिर दिलें, त्यानें तुह्मांस मंत्रविद्या शिकविली. (११६) तसेंच ११७ व ११९.

तुमच्या कुलीन अश्वाच्या खुरापासून शेंकडों हंडे दारू तुह्मांस प्राप्त झाली. (११६) तसेंच ११७.

पुष्कळ घृत प्राशन केलेल्या अतिथीप्रमाणें अग्नि होता झाला. (१२८)

संग्रामांत आनंदानें नृत्य करणाऱ्या इंद्रा, तूं नव्वद पुरांचा नाश केला आहेस. (१३०)

आह्मांशीं सख्य न करणाराचा वध कर. (१३१)

---

[1] वेदांत तेहतीस देव सांगितले आहेत. परंतु ऋग्वेद मंडल ३. अ. ९ व सू. ९ या स्थळीं ३,३३९ देव सांगितले असून प्राचीन भाष्यकारांचें मतही हेंच आहे. अर्वाचीन ग्रंथांत देवांची संख्या ३,३०,०००पर्यंत गेली असून शेवटीं ती ३३,००,००,०००पर्यंत येऊन ठेपली आहे.

हे वायू, तूं आपल्या अयुतावधि अश्वांसह आमच्या यज्ञास ये. (१३५)

घृतप्रवाह होत आहे तेथें जा. (१३५)

उग्र, बुभुक्षित व पर्वतवासी वनपशूंप्रमाणें विष्णु आहे. (१५४)

उंच धातूची पळी आह्मांस तुच्छ नाहीं; खरोखर काष्ठपात्राची योग्यता विशेष आहे असें आह्मी ह्मणतों. (१६१)

हे इंद्रा, तुझा उन्माद फार आहे. (१७५)

हे स्वादिष्ठ पितू (अन्न), मधुर पितू, तुला आमचा नमस्कार असो: तूं आमचा संरक्षण कर्ता हो! (१८७)

आणि हे शरीरा, ज्याअर्थीं पाणी व वनस्पति यांची समृद्धि आहे त्याअर्थीं तूं पुष्ट हो. (१८७)

संपत्ति व संतति प्राप्त होण्याकरितां यूप किंवा यज्ञस्तंभ याची प्रार्थना करून त्यास आवाहन केलेलें आहे. (३:१:८)

दस्यु व हिंदुस्थानांतील इतर मूळचे रहिवासी यांविषयीं प्राचीन आर्यांचा इतका द्वेषभाव होता कीं त्यामुळें त्यांनीं जो त्यांवर प्रलय केला त्या तोडीचें क्रौर्य अन्यत्र सांपडणें कठीण. याचीं शेंकडों उदाहरणें वेदांत सांपडतात. मासल्याकरितां पुढील उदाहरण पहा:

"तुझें तीक्ष्ण वज्र त्यांवर फेंक! त्यांचें निर्मूलन कर. त्यांचें विदारण कर. हे इंद्रा, त्या दैत्याचा पराभव कर, त्यास जिंकून टाक व त्याचा वध कर. त्यास उपटून टाक. त्याचे दोन तुकडे कर. त्याच्या मस्तकाचा चुराडा कर." यांहून ओंगळ शापवचनें वेदांतून दाखवितां येतील. (ऋग्. ३:३.१६–१७)

वेदांत पुष्कळ ग्राम्य वचनें आढळतात. त्यांतील कित्येक इतकीं बीभत्स आहेत कीं तीं वाचतांच आंगांवर रोमांच उभे रहातात. प्रमाणादाखल पुष्कळ उतारे देतां येतील, परंतु तसें करणें आह्मांस प्रशस्त वाटत नाहीं. असें असूनही प्रसंगानुसार मनुष्याचें अति अज्ञान व त्याचा अति पंगुपणा दाखविणारीं शेंकडों वचनें वेदांत सांपडतात. उदाहरणार्थ: "देवांची प्राप्ति होण्याचा मार्ग कोण खरोखर जाणतो किंवा कोणीं येऊन कथन केला आहे?" (ऋग्. ३:५:५४)

अश्वमेधाविषयीं ऋग्वेदांत जीं दोन सूक्तें आहेत तीं फारच लोकोत्तर आहेत. संतति, संपत्ति इत्यादि सुखें प्राप्त व्हावीं ह्मणून अश्वमेध करण्याची चाल फार पुरातन काळापासून पडली होती. हा मेध करण्याचा प्रकार पुढें सांगितल्याप्रमाणें असे. अश्वाच्या शरीराचे तुकडे तुकडे करून त्यांतील कांहीं उकडीत व कांहीं विस्तवावर भाजीत असत. नंतर यज्ञास आलेले लोक त्यांपैकीं कांहीं मांस भक्षण करीत व कांहीं देवांस अर्पण करीत. या प्रकारें या मेधाचें वर्णन फारच बारकाईनें केलेलें वेदांत सांपडतें. वैदिक काळीं अश्वमेध करण्याचा प्रकार बराच गर्हणीय होता, व पुढें पुढें तर तो प्रकार फारच निंद्य झाला.

वरील सर्व चर्चा ऋग्वेदाच्या संबंधानें आहे. सामवेद ज्याला ह्मणतात त्यांत ऋग्वेदांतील उतारे आहेत. हे वेंचे मोठमोठ्या यज्ञयागांच्या प्रसंगीं गात असत. यजुर्वेदांत जे मंत्र पुरोहितानें यज्ञाचे वेळीं ह्मणायाचे त्यांचा समावेश केलेला आहे. त्याचे शुक्ल व कृष्ण असे दोन भाग असून कृष्णयजुर्वेद शुक्लाहून प्राचीन आहे. अथर्ववेद नैतिक दृष्टीनें ऋग्वेदाहून कमी योग्यतेचा आहे. त्यांत भूतपिशाचादि योनींचें भय प्रकट केलें असून त्यांची पीडा निवारणार्थ त्यांत मंत्रच मंत्र भरलेले आहेत. भयंकर शाप व शत्रूंवर जारणमारणादि प्रयोग यांहींकरून अथर्ववेद ओतप्रोत भरलेला आहे. यावरून असें दिसतें कीं तत्कालीन हिंदु लोक धर्मवेडानें अगदीं जखडून टाकिले होते. कांहीं दिवसांमागें काश्मीरांत जी अथर्ववेदाची प्रत सांपडली तींत सांप्रत उपलब्ध असलेल्या अथर्ववेदाहून जास्त मजकूर असल्यामुळें तो मूळ अथर्ववेदाशीं सदृश असावा असें वाटतें. याही प्रतींत शाप, जादू इत्यादि नीच गोष्टींचा समावेश केलेला आहे.

ऋग्वेदांतून वर जे तुटक तुटक उतारे आह्मीं दिले त्यांवरून त्या धर्मग्रंथाचें स्वारस्य जसें व्यक्त व्हावें तसें होत नाहीं असा आक्षेप आपण घ्याल, याकरितां ऋग्वेदांतील पहिलेंच सूक्त संपूर्ण भाषांतररूपानें आपणांपुढें मांडतों :

१. "पुरोहित, यज्ञाचा देदीप्यमान ऋत्विज, होता, आणि संपत्तीतें अतिशयेंकरून देणारा अग्नि त्यास मी स्तवितों."

२. "अग्नि पूर्वींच्या ऋषींनीं तसाच नव्या ऋषींनीं स्तुत्य होय; तो देवांस येथें आणो."

३. "अग्नीच्या योगानें यजमान यशःसंपन्न आणि उत्तम वीर्यवान् पुत्रांनीं युक्त अशा धनदौलतीसच दिवसानुदिवस पावो."

४. "हे अग्नी, ज्या विघ्नरहित यज्ञासभोंतालीं तूं परिवेष्टन करून राहतोस तोच यज्ञ देवांप्रत प्रविष्ट होतो."

५. "अग्नि हा कुशल, कपटरहित आणि अतिशयेंकरून कीर्तिमान् असा होमसंपादक होय. तो देव अग्नि देवांसहित येथें येवो."

६. "हे बा अग्नी, तूं हविर्दान करणाराचें जें कल्याण करिशील तें, हे अंगिरा, खरोखर तुझेंच कल्याण होतें."

७. "हे रात्रीच्या वेळीं प्रकाशणाऱ्या अग्नी, प्रतिदिनीं आम्ही भक्तिपूर्वक नमन करीत तुझ्या संनिध येत असतों."

८. "जो तूं यज्ञांचा राजा, धर्मकृत्याचा परम देदीप्यमान रक्षक आणि आपल्या स्वतःच्या घरीं मोठा होणारा असा होस."

९. "म्हणून हे अग्नी, जसा पिता पुत्राला सुगम असतो तसा तूं आम्हांप्रत हो: आमच्या कल्याणास्तव आम्हांबरोबर राहा."[1]

---

[1] राव बहादूर शंकर पांडुरंग पंडित यांच्या वेदार्थयत्नांतून वरील उतारा घेतला आहे.

ऋग्वेद संहितेंतील वरील सूक्त वाचल्यावर बायबलांतील एखादें गीत पहावें म्हणजे त्या दोहोंत जें विलक्षण महदंतर आहे तें आपल्यास सहज कळून येईल.[१]

वैदिक ग्रंथांचा दुसरा भाग ब्राह्मणें होत. त्यांविषयीं विशेष निरूपण करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं; कारण बुद्धिकौशल्य व लेखनशैली या दोहोंचा त्यांत अभाव दिसून येतो, एवढेंच केवळ नव्हे तर त्यांत येथून तेथून सर्व बालिश प्रकार भरलेला आहे.[२] संहितेची गोष्ट अगदींच वेगळी आहे. वैदिक ग्रंथांत संहिता मात्र श्रेष्ठ होय.

ब्राह्मणें व आरण्यकें (अरण्यांत रचलेले किंवा अरण्यांत वाचण्यासाठीं रचलेले ग्रंथ) हीं वेगवेगळीं आहेत असें स्पष्टपणें दाखविलेलें नाहीं. उपनिषदांत कर्ममार्गाविषयीं विचार मुळींच नसून केवळ ब्रह्मज्ञानाविषयीं विचार मात्र केला आहे. उपनिषदांची संख्या बरीच मोठी आहे तरी तीं सर्वच विशेष योग्यतेचीं नसून, त्यांपैकीं दहा किंवा बारा मात्र फार महत्त्वाचीं आहेत. त्यांतील बहुतेकांचा अर्थ गूढ असल्यामुळें तो लावण्यास सोपें नाहीं. उपनिषदांचा अर्थ ज्या ठिकाणीं समजतो तेथें अद्वैतमत प्रतिपादिलेलें दिसून येतें. उपनिषदांची रचना बहुतेक पद्यांत असून त्यांत तत्त्वविचार फारसा नाहीं; इतकेंच केवळ नाहीं तर कविता देखील असंगतवार रचलेली दिसते. उपनिषदें म्हटलीं म्हणजे शुद्ध भाकडकथा आहेत असें अमेरिकेंतील येल कालेजाचे विद्वान् ग्रंथकार प्रोफेसर व्हिटनी साहेब म्हणतात. प्रोफेसर गो साहेब म्हणतात कीं उपनिषदें ज्या काळीं रचलीं गेलीं तो काळ रानटी स्थितींतला असून ज्यांनीं तीं लिहिलीं ते लोक अवनतीप्रत पावलेले होते.

वरील वैदिक धर्माची केलेली चर्चा व वेदांतील उतारे वाचल्यावर त्याहून निराळें त्या धर्माचें खंडन करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. त्याचें खरें स्वरूप प्रकट करितांक्षणींच त्याचें निराकरण होतें, व अधिक बोलण्याचें कारणच उरत नाहीं. तशांत, वैदिक हिंदु धर्म हल्लीं प्रचारांतही नाहीं. आमच्या धर्माचें खरें स्वरूप काय तें वेदांत आहे अशी हिंदु लोकांस जरी घमंड आहे तरी वेदोक्त हिंदु धर्माकडे निरखून इतरांहून हिंदु लोकांसच अधिक आश्चर्य वाटलें पाहिजे.

वेद ईश्वरप्रणीत आहेत याविषयीं हिंदु धर्मग्रंथांतून मुळींच प्रमाण नाहीं, व यदाकदाचित् असल्यास तें क्षणभरही टिकणार नाहीं, तथापि वेद ईश्वरप्रणीत आहेत हें स्वयंसिद्धच आहे असें पुष्कळ लोक समजतात.[३] फार काय सांगावें? जीं प्रमाणें सादर करण्यांत येतात तींच मुळीं संशयात्मक असल्यामुळें कांहींच निर्णय ठरवितां येत नाहीं.

---

[१] "केवल लेखनशैलीच्या संबंधानें पाहूं गेलें तरी बायबलांतील गीतें वेदसूक्तांहून अति श्रेष्ठ आहेत असें व्यक्त होतें," असें प्रोफेसर कोवेल साहेब ह्मणतात.

[२] भट्ट मोक्ष मूलर साहेब सुद्धां कबूल करितात कीं "पोकळ पांडित्य व निवळ असमंजसपणा यांत दुसरा कोणताही ग्रंथ ब्राह्मणांची बरोबरी करूं शकणार नाहीं."

[३] तर्कसंग्रहाप्रमाणें भाषणाचे दोन प्रकार आहेत, एक वैदिक व दुसरा लौकिक. जें ईश्वरानें उच्चारलें तें वैदिक असून प्रमाणभूत मानितात. यास पुरावा काय ह्मणाल तर केवळ

ब्रह्म्यानें सृष्टि निर्माण करतेवेळीं वेद प्रगट केले असें वारंवार ह्मणतात; तथापि त्याबद्दल पुरावा देण्यांत येत नाहीं. वेदांचे ठायीं सर्वज्ञत्व आहे म्हणून सर्वज्ञ जो परमेश्वर त्याची ही कृति आहे असा पुष्कळ हिंदु ग्रंथकारांचा अभिप्राय आहे, परंतु वेदांचें सर्वज्ञत्व सिद्ध करण्याच्या भरीस ते पडत नाहींत.[१]

या विषयाची परिसमाप्ति करण्यापूर्वी वेदांतील कांहीं मुख्य मुख्य गोष्टी अर्वाचीन हिंदु धर्मानें अजिबात वगळून टाकल्या आहेत असें ह्मणणें आह्मांस प्राप्त होतें. त्यांकडे दुर्लक्ष्य केल्यामुळें त्या धर्माची मोठी हानि झाली आहे. अशा गोष्टींपैकीं मुख्य ह्मटली ह्मणजे यज्ञयागाची होय.

यज्ञयागादि कर्में.

वेद ज्या काळीं रचले त्या वेळेस यज्ञयागादि कर्मांचे बहुविध प्रकार बरेच पूर्णतेस आले होते असें दाक्तर होग साहेब यांनीं जें प्रतिपादन केलें आहे त्यावरून असें सिद्ध होतें कीं यज्ञयागादि कर्मांचा प्रचार फार पुरातन कालापासून आहे.[२] प्रत्यक्ष वेदांत यज्ञयागादि कर्मांस "धर्मसंबंधी आद्यकर्म" असें ह्मटलें आहे. (ऋग्. १:१६४-४३.)

वेदांत यज्ञापासून होणाऱ्या प्राप्तीविषयीं फार गौरवानें वर्णन केलें आहे. हिंदु लोकांची जात्या अतिशयोक्तीनें वर्णन करण्याकडे प्रवृत्ति असल्यामुळें यज्ञ म्हणून जें आद्य कर्म त्याचें स्तोम वेदांत विशेषतः माजविलें असावें. तथापि यज्ञयाग फार पुरातन कालापासून चालत आल्यामुळें त्याची इतकी महती वेद रचणारांस वाटली असावी हें खचीत. यज्ञयागास हें जें महत्त्व वेदांत आहे त्यावरून कित्येक विद्वानांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं अति पुरातन काळीं ईश्वरानें जें ज्ञान मनुष्यास स्वतः करून दिलें त्याचा यज्ञयाग हा विशिष्ट भाग असावा व पुढें कालांतरानें बाकीचें ज्ञान नष्ट होऊन यज्ञयाग मात्र प्रत्यंतर रूपानें राहिला. या महत्त्वाच्या विषयाकडे विद्वान् हिंदु लोकांनीं लक्ष्य पुरविल्यास त्यांच्या श्रमांचें सार्थक्य झाल्यावांचून रहाणार नाहीं. या विषयाचें त्यांनीं अवश्य परिशीलन[३] करावें असें आह्मी ह्मणतों. वैदिक धर्मांत ज्या ज्या ह्मणून कल्पना व लालसा व शंका दर्शविल्या आहेत त्या सर्वांचें समाधानपूर्वक निराकरण बायबलांत केलें आहे असें आह्मीं खातरीनें ह्मटल्यास वावगें होणार नाहीं.

कालांतरानें वेदान्त मत व बौद्ध धर्म यांचा प्रसार होऊन प्राचीन ऋषींचे हे गहन विचार उत्तरोत्तर अस्तंगत झाले. ह्मणून प्रस्तुत काळच्या हिंदु लोकांनीं वेदकालानंतर

---

हें ह्मणणें याच्यापलीकडे कांहीं नाहीं. ध्वनि अनादिसिद्ध आहे ह्मणून वेदही अनादिसिद्ध आहेत असा कोटिक्रम मीमांसा सूत्र २९ यांत जैमिनि यानें लढविला आहे!

१ See *Aphorisms of the Vedanta* (Ballantyne's Edit.), p. 8.

२ ऐतरेय ब्राह्मण, उपोद्घात पृ. ७, ९.

३ डॉक्टर के. एम्. बानर्जी यांचें *Relation between Christianity and Hinduism* हें पुस्तक अवश्य पहावें.

झालेल्या ऋषि ह्मणवून घेणारांवर भरंवसा ठेवूं नये. मूळच्या ऋषींनीं यज्ञयागास "यज्ञोहि श्रेष्ठतमं कर्म;" (तैतिरी ब्राह्मण ३.२,१,४) याचा अर्थ—अति उत्तम कर्म ह्मटलें ह्मणजे यज्ञ, व "यज्ञो वै भुवनस्य नाभिः (ऋग्. १:१६४,३४) याचा अर्थ ब्रह्मांडचक्राची नाभि यज्ञ आहे, अशा श्रेष्ठ, श्रेष्ठ संज्ञा देऊन जें त्यांविषयीं त्यांनीं लिहिलें आहे तें मननपूर्वक वाचावें अशी आमची त्यांस शिफारस आहे.[१]

# भाग तिसरा.

## हिंदु धर्मांतील तत्त्वज्ञान.

### षड्दर्शनें किंवा सहा शास्त्रें. त्यांचें सामान्य स्वरूप.

हिंदु धर्मांतील तत्त्वज्ञानाचें विस्तारानें निरूपण करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं; तसेंच, त्यापैकीं विवक्षित भाग सदोष किंवा निर्दोष हें ठरविण्याच्या भानगडींत आह्मी पडत नाहीं. या सर्वांत उपयुक्त असें जें न्यायशास्त्र तें हिंदु धर्मास अनुकूल असेल असें ह्मणावें तर तसें नसून ख्रिस्ती धर्मास प्रतिकूलही नाहीं. या षड्दर्शनांपैकीं ज्यांकडून हिंदुस्थानांतील विद्वान् लोकांचीं मनें कलुषित होण्याचा संभव आहे व जीं ख्रिस्ती धर्मास प्रतिकूलही आहेत त्यांविषयीं प्रस्तुत विचार कर्तव्य आहे.

हिंदु तत्त्वविचाराच्या शाखांस दर्शनें हें नांव असून त्यांच्या सहा शाखा आहेत. यांत कित्येक मतें सर्वसामान्य आहेत. त्यांस सूत्रें म्हणतात. या षड्दर्शनांचीं नांवें व कर्ते याप्रमाणें आहेत:

| | | |
|---|---|---|
| न्यायशास्त्र | कर्ता | गौतम किंवा अक्षपाद. |
| वैशेषिक ,, | ,, | कणाद ,, कणभक्ष. |
| सांख्य ,, | ,, | कपिल. |
| योग ,, | ,, | पतंजलि. |
| मीमांसा ,, | ,, | जैमिनि. |
| वेदान्त ,, | ,, | बादरायण. |

याशिवाय तत्त्वविचारावर हजारों ग्रंथकारांनीं ऊहापोह केला आहे. मूळ सूत्रें व त्यांवरील अर्वाचीन भाष्यें यांत नेहमीं फार विरोध आहे.

या सहा शास्त्रांचे तीन वर्ग करण्याचा परिपाठ आहे. न्याय व वैशेषिक या दोन शास्त्रांत स्वल्प भेद आहे. सांख्य व योग या दोहोंची सांगड घालतां येत असून पहिल्यांत (सांख्य) नास्तिक वाद व दुसऱ्यांत (योग) आस्तिक वाद सांगितला आहे. मीमांसेखालीं पांचवें व सहावें शास्त्र येत असून त्यांस पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा

[१] माजी माधवराव मोरेश्वर कुंटे ह्मणतात कीं "वेदांतील कोणतेंही सूक्त वाचून पाहिलें तर त्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें यज्ञाशीं संबंध पोंचतो." प्राचीन हिंदु लोकांचीं यज्ञयागादि कर्में हींच त्यांच्या उन्नतावस्थेचें आदि तत्त्व आहे असें ते ह्मणतात.

अशीं अनुक्रमें नांवें दिलीं आहेत. वेद संहितेंत जीं यज्ञयागादि कर्मे सांगितलीं आहेत त्यांचें विवेचन पूर्वमीमांसेंत केलें असून उत्तरमीमांसेंत उपनिषदांतील अद्वैत मार्गाचा विचार केला आहे.

षड्शास्त्रांच्या अनेक विशेष शाखा करितां येतात; हें जरी खरें तरी कित्येक मतें त्या सर्वांत सारखीं आहेत. हीं सामान्य लक्षणें आतां सांगतों[१] :

१. मीमांसाशास्त्राखेरीज इतर शास्त्रांतून मुक्तिप्राप्त्यर्थ मार्ग सांगितले आहेत (देह, तृष्णा, ज्ञान इत्यादिकांपासून आत्म्याची सुटका तीस मुक्ति ह्मणावें.)

२. अविद्या किंवा अज्ञान हें आत्मा बद्ध होण्यास मूळ कारण आहे असें मानिलें आहे.

३. तसेंच सत्कृत्यें व दुराचार हीं दोन्ही आत्म्याच्या बंधनास कारण होतात असें मानिलें आहे. कारण दुराचारापासून पापसंभव व त्यामुळें आत्म्यास क्लेशानुभव होणें हें जसें आहे तद्वत् सत्कृत्यांपासून पुण्यप्राप्ति व त्यामुळें सुखानुभव अशी सरणी आहे. आत्म्यास मोक्ष मिळण्यापूर्वी सुखदुःखाचीं फळें सर्वथैव भोगलींच पाहिजेत.[२]

४. केवळ पूर्ण ज्ञान झाल्यानेंच मोक्षप्राप्ति होते.[३] मन, शरीर व इंद्रियें इत्यादिकांहून आपण भिन्न आहों असें आत्म्यानें जाणणें हेंच पूर्ण ज्ञान. मन संस्कृत मनस् म्हणजे जाणणें. मनाच्या द्वारें आत्म्यास ज्ञानप्राप्ति होते ह्मणून मन हें ज्ञानप्राप्तीचें साधन होय. ज्यास पूर्ण ज्ञानप्राप्ति होते तो मरणसमयीं शरीर व मन या बंधांतून मुक्त होऊन त्यास सुषुप्ति (गाढ निद्रा) प्राप्त होते. ही अवस्था प्राप्त झाल्यावर आत्म्यास सुखदुःखाचें भान रहात नाहीं.

५. आत्मा अनाद्यनंत आहे.

६. अनेक जन्म परिभ्रमण केल्यावर शेवटीं आत्म्यास मोक्षप्राप्ति होते.

७. जग प्रकृतीपासून झालें आहे, म्हणजे प्रकृति हें उत्पत्तीचें उपादान कारण आहे.

८. सृष्टि अनादिकालापासून आहेच आहे.[४] वारंवार तिचा लय झाला म्हणजे तत्त्वांस तत्त्वें मिळालीं, तथापि त्या तत्त्वांचें पुनः एकीकरण होऊन नवी सृष्टि बनते. तथापि अनादिकालापासून ही सृष्टि कोणत्या तरी रूपानें अस्तित्वांत आहे.

---

[१] *A Rational Refutation of the Hindu Philosophical Systems* या नांवाचें उत्तम पुस्तक रे० नीलकंठ शास्त्री गोरे यांनीं लिहिलें आहे तें पाहावें.

[२] "अवश्यमेव भोक्तव्यं कृतं कर्म शुभाशुभं" ह्मणजे बऱ्या वाईट कृतकर्मांचा भोग अवश्य भोगलाच पाहिजे. हें प्रसिद्ध वचन कोठून निघालें हें निश्चयानें सांगतां येत नाहीं.

[३] ज्ञानान्मुक्ति असा सांख्यशास्त्राचा मथितार्थ आहे.

[४] वेदान्ताप्रमाणें सृष्टि ही केवळ आभासमय आहे, ह्मणजे खरी नाहीं.

९. सर्व शास्त्रांस वेद[१] काय तो प्रमाणभूत व निर्दोष ग्रंथ आहे. स्मृति, पुराणें इत्यादिकांचा वेदांशीं विरोध येत नसल्यास तीं देखील त्यांस (दर्शनकारांस) मान्य आहेत.

वेदांत काय आहे हें सांगणें ह्मणजे त्या ग्रंथांचें खंडन केल्याप्रमाणेंच आहे, हें यापूर्वीं आह्मीं प्रतिपादन केलेंच आहे. तीच गोष्ट षड्शास्त्रांस लागू पडते. म्हणून प्रस्तुत विषयावर फारशी चर्चा न करितां खालीं सांगितलेल्या उपक्रमानें निर्वाह होईल असें आह्मांस वाटतें :

१. षड्शास्त्रांत परस्पर विसंगतपणा फारच दिसून येतो.[२]

२. षड्शास्त्रांतील विचारसरणी अजिबात चुकीची आहे; कारण कांहीं गोष्टी स्वयंसिद्ध मानून कांहींस उपनिषदांचा आधार दिला आहे. तसेंच उपनिषदें ईश्वरप्रणीत आहेत हें कित्येक ठिकाणीं गृहीत केलें असून कित्येक ठिकाणीं जे त्याबद्दल पुरावे दिले आहेत ते फारच अग्राह्य आहेत. याचें विवरण मागें केलेंच आहे.

३. षड्दर्शनांत सृष्ट पदार्थज्ञान ओतप्रोत भरलेलें असून ठिकठिकाणीं तें पूर्णपणें दोषमय आहे. उदाहरणार्थ, न्यायशास्त्रांत स्वप्नाची कल्पना जी बसविली आहे ती ध्या.

४. बीज किंवा प्रकृति यांशिवाय वस्तुमात्रांचा संभव नाहीं हा सिद्धांत हिंदु शास्त्रांत सामान्यत्वेंकरून गृहीत केला आहे. यामुळें जगाची उत्पत्ति ईश्वरापासून असावी किंवा तसें नसेल तर तें अनादि असावें; या दोहोंतून कोणतें तरी एक अनुमान घेणें प्राप्त होतें.

ज्या तत्त्वावर हा सर्व व्यूह रचिला आहे तें तत्त्व सप्रमाण सिद्ध केलें नसून केवळ गृहीत ह्मणून धरलें आहे आणि तें सिद्ध करणें शक्यही नाहीं.

---

[१] या ठिकाणीं **वेद** ह्मणजे उपनिषदें होत.

[२] वेदान्तांत केवळ बालिश बडबड आहे असा दोषारोप सांख्य शास्त्राचा जो कर्ता कपिल त्यानें आणिला आहे. वेदान्त तर केवळ वेषधारी बौद्ध धर्म असून वेदान्ती निर्लज्ज व निःशंक नास्तिकशिरोमणि आहेत असा पूर्वमीमांसेचा अभिप्राय आहे. तसेंच उलटपक्षीं न्याय व मीमांसा शास्त्रांवर नास्तिकपणाचा दोषारोप वेदान्ती आणितात. Dr. K. M. Banerjea.

कणाद, गौतम, जैमिनि, कपिल व बृहस्पति या सर्व ऋषींस पद्मपुराणांत नास्तिक ठरविल्यामुळें सहा शास्त्रांपैकीं चार शास्त्रें व बृहस्पतीचे ग्रंथ हे सर्व नास्तिक ठरले. बृहस्पति हा चार्वाकादि ग्रंथकारांत प्रमुख ह्मणून मानितात.

हिंदु धर्मग्रंथांत श्रेष्ठ मानलेली अशी जी भगवद्गीता तीस अथर्ववेद मान्य नाहीं. बाकीचे तीन वेद जरी भगवद्गीतेस त्याज्य नाहींत तथापि मि० तेलंग यांच्या मताप्रमाणें तेही गीतेनें वस्तुतः गुंडाळून ठेविले आहेत. वेदोक्त आचरणानें मनुष्यास उत्तम गति प्राप्त होण्यास अडचण येते असा गीतेचा अभिप्राय आहे.

वेदान्ताखेरीज इतर सर्व शास्त्रांस निंद्य असें जें अनेक जन्ममरण मत तें ग्राह्य आहे.

प्रकृति व आत्मा यांसंबंधानें सर्व शास्त्रांत घोंटाळा दिसून येतो. तो असा कीं आत्म्याला व्याप्ति असून तो प्रकृतीस प्रत्यक्ष लागून आहे असेंही कधीं कधीं विधान केलेलें आहे. हिंदु शास्त्रांतील कित्येक तत्त्वें फारच अनर्थकारक आहेत. कर्माविषयीं जें हिंदु शास्त्रांत सांगितलें आहे त्याचेंच उदाहरण घ्या. मनुष्याचें सार्थक्य होण्यास जितकें दुष्कर्म विघातक तितकेंच सत्कर्मही आहे अशी समजूत असल्यामुळें हिंदु लोकांस कोणतेंही काम करण्यास उमेद न येऊन अखेरीस ते कल्पनातरंगांत बुडून जातात.

## २. वेदान्त.

प्रस्तुतकाळीं वेदान्त मताचा प्रसार या देशांत फारच झालेला आहे.

वेदान्त म्हणजे वेदांचा आशय. ही संज्ञा या शास्त्राला योग्य नाहीं कारण सर्व वेदान्त मत उपनिषदें व तदंगभूत शारीरिक सूत्रें यांपासून निघालेलें आहे.[१] वेदसंहिता व उपनिषदें या दोहोंचीं परस्पर भिन्न मतें आहेत हें यापूर्वीच सांगितलें आहे.[२]

वेदान्त मताचें काय स्वरूप आहे याविषयीं फार प्राचीन कालापासून वाद चालत आला आहे. सर ग्रेव्हस् हाटन नामक विद्वान् ग्रंथकार ह्मणतो कीं "हें मत जरी कोणास पूर्णपणें समजलें तरी तें समजून सांगण्यास भाषा कोती पडेल इतकें तें कठीण आहे. याकरितां वेदान्त ह्मणजे काय हें समजून सांगणें फारच अशक्य झालें आहे."

वेदान्त विषयावर जे प्राचीन ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत जीवात्मा व बाह्य सृष्टि यांचें अस्तित्व एका तऱ्हेनें कबूल केलें आहे. परंतु त्यांनंतर जे ग्रंथ झाले त्यांस हें अस्तित्व बिलकुल मान्य नाहीं. तथापि गो नामक विद्वानाचें मत असें आहे कीं मायावाद फार प्राचीन उपनिषदांतून देखील ओतप्रोत भरला आहे.

हल्लीं प्रचलित असलेलें वेदान्त मत कशा प्रकारचें आहे तें वेदान्तसारांतील पुढील उताऱ्यांवरून चांगलें लक्ष्यांत येईल.

"जीवं ब्रह्मैक्यं" ह्मणजे जीव व देव हे एकच आहेत. सर्व वेदान्त ग्रंथांचें सार हेंच

---

१ वेदान्तसार तिसरें प्रकरण पहा.

२ उपनिषदें व शारीरिकसूत्रें (संख्या ५५५) यांशिवाय वेदान्त मतास शंकराचार्यांचे ग्रंथ आधारभूत आहेत. शंकराचार्यांच्या मताचें परीक्षण दाक्तर ब्रुइनिंग यांनीं फार काळजीपूर्वक केलें आहे, व त्याचें गुणदोषविवेचन दाक्तर मुइर साहेबांनीं ता० १ सेप्टेंबर १८७१ च्या ॲकाडेमी नामक पत्रांत केलें आहे, व त्यांत शंकराचार्यांचे ग्रंथ स्वमतविरोधी आहेत हें स्पष्टपणें व्यक्त केलें आहे. भगवद्गीतेस वेदान्ताचीं मुख्य मुख्य मतें मान्य आहेत. सदानंदांनीं वेदान्तसार ह्मणून जो ग्रंथ केला आहे त्यांत वेदान्त मताचें सर्व सार आहे. दाक्तर बालंटाइन यांनीं वेदान्तसाराचें जें भाषांतर केलें आहे त्यांतूनच वरील उतारे घेतले आहेत. कर्नेल जेकब साहेबांनीं या ग्रंथाचें इंग्लिश भाषांतर नुक्तेंच छापून प्रसिद्ध केलें आहे.

आहे. तत्त्वमसि ह्मणजे तें (ब्रह्म) तूं आहेस आणि अहं ब्रह्म ह्मणजे मी ब्रह्म (देव) आहें, या दोन वचनांचें वारंवार अनुसंधान केलें आहे.

ईश्वरास अद्वितीयं असेंही वारंवार ह्मटलें आहे. पुढील वचन सुप्रसिद्ध आहे:

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः; ह्मणजे, ब्रह्म काय तें सत्य, जग मिथ्या असून जीव व ब्रह्म हीं एकच आहेत. यांशिवाय कांहीं एक नाहीं. तसेंच, सर्वं खल्विदं ब्रह्म ह्मणजे हें सर्व विश्वच ब्रह्म आहे असेंही ह्मटलें आहे:

देवाला ब्रह्म ही संज्ञा असून त्यामध्यें तीन गुणांची व्याप्ति आहे. ते गुण येणेंप्रमाणें: सत् (अस्तित्व), चित् (ज्ञान) व आनंद ह्मणूनच परमेश्वरास सच्चिदानंद ह्मणतात. तोच केवळ सत्य असून बाकी सर्व मिथ्या आहे. तथापि अज्ञानामुळें किंवा मायेमुळें इतर आहे असें भासतें.

अज्ञानास सत् किंवा असत् या दोन्ही स्थिति संभवत नाहींत. अज्ञान ह्मणजे केवळ ज्ञानाचा अभाव इतकेंच नव्हे तर ज्ञानास जें प्रतिकूल तें अज्ञान असून तें त्रिगुणात्मक आहे म्हणजे तीन गुणांनीं किंवा पाशांनीं बद्ध आहे.

आवरण व विक्षेप असे अज्ञानाचे दोन प्रभाव आहेत. आवरणामुळें आत्म्यास आपल्याहून देव भिन्न आहे असें वाटतें व विक्षेपामुळें बाह्य सृष्टि दृग्गोचर होते. विक्षेपाच्या योगानें हवी ती वस्तु इतकेंच नव्हे तर सर्व ब्रह्मांड कल्पनेनें उत्पन्न करतां येतें.

चैतन्य (देव) अज्ञानांत मग्न झाल्यावर त्यापासून आकाश, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून जल व जलापासून पृथ्वी निर्माण झाली.

आत्म्याला जागृति, स्वप्न, सुषुप्ति व चतुर्थ किंवा शुद्धज्ञान अशा चार अवस्था आहेत. जागृतींत मनुष्य गाढ अज्ञानांत असतो. स्वप्नावस्थेंत अज्ञान कांहीं अंशानें कमी होतें. सुषुप्तींत त्याहून जास्त अज्ञान नाहींसें होतें, व सर्व अज्ञानाचा लोप चतुर्थावस्थेंत होतो.[१]

बहुतेक हिंदु शास्त्राप्रमाणें ब्रह्म जेव्हां जागृतावस्थेंत असतें तेव्हां तें तीन मुख्य देवतांच्या रूपानें प्रगट होतें व तत्कालीं प्रकृतीचा विस्तार होण्यास आरंभ होतो. पण हें मत वेदान्त शास्त्रास मान्य नाहीं. त्याच्या मतें ब्रह्माशिवाय प्रकृति वगैरे यांस मुळींच अस्तित्व नसून, तीं केवळ अज्ञानानें विद्यमान अशीं भासतात. वेदान्ताप्रमाणें चित् व आनंद यांनाच मात्र अस्तित्व आहे.

भगवद्गीतेंत परमेश्वराविषयीं जें लिहिलें आहे तें वेदान्ताहूनही विशेष चमत्कारिक आहे: उदाहरणार्थ, गीतेंतील पुढील वचनें पहा: गीता अ० ९:१९ सदसच्चाहम् ह्मणजे मी सत् (असणें) व असत् (नसणें) असें दोन्हीही आहें. गीता १३: १२ परंब्रह्मनसत्तन्नासदुच्यते. म्हणजे श्रेष्ठ जें ब्रह्म तें सत् किंवा असत् असें दोन्हीही ह्मटलें जात नाहीं.

---

[१] वेदांत सूत्रें ३२, ३३, ३४, ३५ हीं पहावीं. यांशिवाय परमेश्वराचा निर्देश शिवं, शांतं, अद्वैतं, व चतुर्थ या शब्दांनीं वेदान्तसारांत केलेला आहे.

ज्ञानप्राप्ति करून घेणें अत्यावश्यक आहे असा वेदान्ताचा मुख्य कटाक्ष असून तत्पुष्टिकरणार्थ असें ह्मटलें आहे : " आत्मज्ञान झालें कीं दुःखविमोचन होतें."

"ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति" म्हणजे जो ब्रह्म जाणतो तो ब्रह्मच होतो. वेदान्तसार सूत्र १८.

ज्यानें आद्यंत जो परमेश्वर त्यातें जाणिलें त्याचीं कर्मे नष्ट होतात. वेदान्तसार सूत्र १४३.

निर्विकल्पक ध्यान सर्वांत श्रेष्ठ मानिलें आहे. ह्या ध्यानास जो लागला त्यास विषय व हेतु हे मुळींच नसतात. तो आपले ठायीं " अहं ब्रह्म " ह्मणजे मी देव असें मानितो. ध्यानाची परमावधि कोणताही हेतु न धरण्यानें म्हणजे स्वतःविषयीं सुद्धां कोणताही हेतु नसल्यानें होते.

हिंदु शास्त्रांविषयीं सामान्यत्वेंकरून यापूर्वी चर्चा करण्यांत आली आहे. आतां विशेषतः वेदान्त शास्त्राविषयीं चर्चा करूं. ती येणेंप्रमाणें :

१ मनुष्याच्या ज्ञानाचीं जीं मूलतत्त्वें त्यांसच वेदान्त मोडून काढतो; ह्मणजे नैसर्गिक ज्ञानाचा पाया जी स्वानुभूति तसेंच इंद्रियजन्य ज्ञान हीं वेदान्त मतानें अजिबात ढांसळून टाकलीं आहेत. या दोन मार्गांनीं प्राप्त होणारें ज्ञान वेदान्तमतें विश्वसनीय नाहीं.

२ वेदान्त मतानें नीति व अनीति मुळींच झुगारून दिली आहे; कारण त्या मताप्रमाणें ब्रह्म काय तें सत्य व शुद्ध, व पापच जर नाहीं तर तें होणार कोठून ? पाप आहे असा भास अज्ञानामुळें होतो. खरें खोटें व बरें वाईट हा भेदाभेद वेदान्तास मुळींच मान्य नाहीं.

वेदान्त मतांतील तत्त्वांस अनुसरून अनेक ठिकाणीं उपदेशपर वचनें दिलीं आहेत.

भगवद्गीता अध्याय १८: ४८ या ठिकाणीं ह्मटलें आहे तें असें : " सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्." याचा अर्थ असा आहे कीं मनुष्य ज्या कुळांत जन्मला आहे त्या कुळांतील आचार सदोष असतांही त्याप्रमाणें त्यानें वर्तन करणें जरूर आहे. तो टाकतां कामा नये.

गीता अध्याय २ श्लोक १ ते ३ या ठिकाणी अर्जुन आपल्या आप्तविषयांवर शस्त्र धरण्यास प्रवृत्त होईना ह्मणून कृष्णानें त्यास नादान व अनार्य म्हणून त्याचा निषेध केला आहे.

पुनः, गीता अध्याय १८ श्लोक १७ यांत ह्मटलें आहे कीं ज्याचे ठायीं मी कर्ता हा भाव नाहीं व त्याचा संस्कार ज्याचे बुद्धीवर झालेलाही नाहीं तो लोकांना मारून देखील न मारल्याप्रमाणें आहे.

३ वेदान्त मतानें धर्माची राळ करून टाकली आहे. ईश्वर व मनुष्य यांच्या परस्पर संबंधांचें खरें ज्ञान होणें यांतच खऱ्या धर्माचें बीज आहे. नम्रता, देवावर भार, त्याची भक्ति, त्याच्याविषयीं पूज्यभाव, त्याची उपासना, आज्ञापालन, पापाचा पश्चात्ताप या सर्व गोष्टी खऱ्या वेदान्त्यास केवळ मूर्खपणाच्या व अशक्य आहेत.

पापाच्या कचाट्यांतून व दोषांतून मुक्त होण्याची इच्छा एकीकडे सारून वेदान्ती अहंभावापासून मुक्त होण्याची इच्छा धरितो.

वेदान्ती ईश्वरास सच्चिदानंद म्हणतात हें यापूर्वी सांगितलेंच आहे. एवढेच गुण ईश्वराचे ठायीं दर्शविल्यानें तो देव असूं शकत नाहीं. कारण तो न्यायी, पवित्र, उत्तम व दयाळू अशा अनेक गुणांनीं परिपूर्ण आहे.

४ वेदान्त स्वमताशीं विरोधी आहे. तें असें: जर ईश्वर सच्चिदानंद स्वरूप आहे तर चित् म्हणजे ज्ञान हें ज्या ठिकाणीं आहे तेथें ज्ञाता व ज्ञेय हें असणें जरूर आहे. परंतु वेदान्त्यास हे भेद मान्य नाहींत.

तसेंच, वेदान्त मताप्रमाणें आत्मा अनादिकालापासून ब्रह्मरूपी आहे. असें जर आहे तर आत्मा ब्रह्मपदाप्रत जातो या वेदान्तमताचा अर्थ काय? आतां आत्मा ब्रह्मपदाप्रत जातो याचा अर्थ आत्म्यानें स्वतःस ब्रह्म ह्मणून ओळखिलें असें जर ह्मणावें तर तेंही संभवत नाहीं, कारण आत्म्याची अज्ञानापासून मुक्तता झाली ह्मणजे त्यास चेतनेचा अभाव होतो असेंही ह्मटलें आहे. "ब्रह्मैव सत् ब्रह्मैव भवति" ह्मणजे आत्मा मुळीं ब्रह्म तो पुढें ब्रह्मच होतो अशा दुर्बोध भाषेनें वेदान्ती सर्वच घोंटाळा करून टाकतात.

५ वेदान्त मताचा झोंक व्यावहारिक नीति प्रवृद्ध करण्याकडे आहे, अशी जी वेदान्त्याची प्रतिज्ञा आहे तिजकडे आह्मीं दुर्लक्ष्य केलें हा आरोप आमच्यावर न यावा ह्मणून त्यांचें मत त्यांच्याच शब्दांनीं व्यक्त करावें हें बरें.

विषय व हेतु यांचा भेदाभेद न धरून जी ध्यानधारणा ती मनुष्याचा मुख्य हेतु पूर्ण होण्यास साधन आहे, म्हणजे अशा प्रकारच्या ध्यानानें परमेश्वराचें व आपलें ऐक्य आहे हें ज्ञान प्राप्त होतें. हें साधण्यास पुढील प्रकार योजिले पाहिजेत; म्हणजे, १ संयम, २ नियम, ३ आसन, ४ प्राणायाम, ५ इंद्रियावरोध, ६ एकाग्रता, ७ चिंतन, व ८ समाधि.[1]

संयमांत हिंसा, अनृत व चौर्य यांपासून अलिप्त राहाणें याचा समावेश होतो. श्वासोच्छ्वास घेणें, नेत्रांनीं पहाणें, व कर्णांनीं ऐकणें इत्यादि क्रिया वरील हिंसादि पातकांप्रमाणेंच समजणें यांत वेदान्तमताची कमाल झाली आहे!!

एखादें झाड किंवा दगड कर्मरहित असल्यामुळें तींही मनुष्याहून नीतिदृष्टया श्रेष्ठ आहेत, ही वेदान्तमताची नीति![2] वेदान्तमताविषयीं अधिक विस्तारानें लिहिण्याचें अगत्य दिसत नाहीं. या मतास शंकराचार्यांची देखील अनुमति पूर्णपणें होती असें आह्मांस वाटत नाहीं, तर मग इतरांविषयीं विचारावयासच नको. विशेषेंकरून सांप्रतकाळीं असल्या मतास थारा मिळणें बिलकुल शक्य नाहीं. वेदान्तमताची परिभाषा फारच भ्रामक आहे. ती सोडून देऊन निव्वळ वेदान्ताचें परीक्षण केलें तर तें नास्तिक किंवा केवलेश्वर मत आहे असें दिसून येईल. याकरितां अर्वाचीन वेदान्तवाद्यांनीं सत्यनिष्ठ होऊन वेदान्तमताचें खरें,

---

[1] वेदान्तसार सूत्र १२७.

[2] नीळकंठशास्त्री गोरे वेदान्ताविषयीं या प्रकारें ह्मणतात: "ज्यांची प्रवृत्ति पापाचरणाकडे आहे त्यांस वेदान्तमतानें चांगलेंच उत्तेजन मिळतें. त्यांस दुष्टपणाचा अतिरेक झाल्यानें कांहींच वाटत नाहीं." *Rat. Ref.*, p. 277.

खरें स्वरूप प्रगट करावें. तात्पर्य हेंच कीं नास्तिक किंवा केवलेश्वर मतांहून वेदान्तमत विशेष अप्रतिपाद्य आहे. क्षणभंगुर, पापी व दुःखी अशा मनुष्यानें वेदान्ती होऊन मी ब्रह्म आहें असें ह्मणावें हा त्याचा मोठाच अधमपणा होय. याहून अधमपणा ईश्वर नाहीं असें ह्मणून नास्तिक होण्यांत देखील नाहीं.

## ३ अवशिष्ट दर्शनें.

वेदान्तमताचें विवेचन जसें विस्तारानें केलें तसें इतर शास्त्रांविषयीं करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. तथापि मुख्य मुख्य दर्शनांविषयीं दोन शब्द लिहिणें इष्ट दिसतें. कपिल ह्मणून जो महाप्रख्यात तत्त्ववेत्ता झाला तो सांख्यशास्त्राचा कर्ता. वेदांत हवनादि कर्मे सांगितलीं असून त्यांपासून खरें ज्ञान उपलब्ध होत नाहीं ह्मणून कपिल वेदांस अपवित्र ह्मणतो. प्रकृति मूळारंभीं स्वयंभू व अनादि आहे, तसेंच आत्मा प्रकृतीहून भिन्न असून अनादि आहे व त्यास खरें ज्ञान प्राप्त झाल्यावर तो प्रकृतीपासून व दुःखापासून मुक्त होतो असें कपिलऋषीचें मत आहे.[१] हें मत नास्तिक आहे इतकें सांगितलें असतां पुरे. त्याचें पृथक् खंडन करण्याचें उरलेंच नाहीं. स्वतः हिंदु लोक यास निरीश्वर सांख्य असें म्हणतात.[२]

सांख्य शास्त्र.

मनुष्याच्या खऱ्या कर्तव्याविषयीं सांख्यशास्त्रांत कांहींच सांगितलें नाहीं. कपिलाचार्याच्या समजुतीनें उपासना निरर्थक असून सर्व काय तें ध्यान मुख्य आहे. मनुष्याला जात्या, ईश्वरीसाहाय्य पदोपदीं पाहिजे असून सांख्यशास्त्रांत येथूनतेथून तर्कज्ञान व बुद्धिवाद भरलेला आहे, तेव्हां त्याकडून मनुष्याचें समाधान कसें व्हावें ?

सांख्यशास्त्रानंतर पतंजलीचें योगशास्त्र प्रादुर्भूत झालें. त्यास "ईश्वरसांख्य" ही संज्ञा दिलेली आहे. अशी भूषणार्ह संज्ञा त्यास असूनही त्यांत मंत्रतंत्र, जादूटोणा असे असंख्य वेडेचार भरलेले आहेत.[३] योग्यानें ध्यानस्थ होऊन, विशेष प्रकारचें आसन, इंद्रियावरोध, प्राणायाम इत्यादि केल्यानें तो सर्वज्ञ, हत्तीसारखा बळकट, सिंहासारखा धीट, वायूप्रमाणें चपळ, आकाशांत उडणारा, व समुद्र व पृथ्वी यांच्या गर्भांत प्रवेश करण्यास समर्थ असा होतो.

योगशास्त्र.

---

[१] See Davies's *Hindu Philosophy* (1881).

[२] ईश्वरासिद्धेः ह्मणजे ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं असें कपिलाचें एक सूत्र आहे. खंड १ अध्याय ९२ या सूत्राचे पाठोपाठ जीं दोन सूत्रें लिहिलेलीं आहेत तीं याहून विशेष नास्तिकमतदर्शक अशीं आहेत. कपिलाचीं मतें नास्तिक नाहींत हें सिद्ध करण्याची पोकळ खटपट कित्येक ग्रंथकारांनीं केली आहे. परंतु जो बोलूनचालून नास्तिक तो आस्तिक कसा ठरणार? See *Calcutta Review*, October, 1871.

[३] बार्थ नांवाचा विद्वान् ग्रंथकार ह्मणतो कीं योगसूत्रांचा प्रयोग मनोभावानें करूं लागल्यास मनुष्य बहकून जाऊन त्यास वेड लागेल. याशिवाय दुसरी कांहींएक फलप्राप्ति त्यास होणार नाहीं.

याप्रमाणें सर्वांत मोठें जें योगशास्त्र त्याच्यांत असा पोरकटपणा शिरून त्यापासून नास्तिक व सर्वेश्वर पंथ यांनीं उचल खाल्ली आहे.

सर्व शास्त्रांत न्यायशास्त्र काय तें विशेष आक्षेप न घेण्याजोगें आहे असें ह्मणतात. प्राचीन काळचें न्यायशास्त्र ईश्वरवादी होतें किंवा नाहीं याविषयीं संशय आहे.[१]

न्यायशास्त्र.

तथापि त्यानंतर जे न्यायशास्त्रांत फेरफार झाले त्यांत ईश्वरास व्यक्ति असें मानलें असून त्याचे ठायीं ज्ञान, इच्छा व कर्तृत्वशक्ति हे गुण वसतात ह्मणून कबूल केलें आहे. तरी त्यांत दोष आहेत ते आहेतच; कारण त्यांत ईश्वराच्या नैतिक गुणांविषयीं किंवा सृष्टीची उत्पत्ति व स्थिति यांविषयीं मुळींच उल्लेख नाहीं. पण या गुणांव्यतिरिक्त देव मानावा तर तो केवळ नामधारी ईश्वर होणार आहे. न्यायशास्त्राप्रमाणें देखील मनुष्याचें इतिकर्तव्य काय तें दुःखापासून मुक्त होण्यांत आहे व दुःखमुक्त होण्यास कर्मत्याग झाला पाहिजे; मग तें कर्म चांगलें असो किंवा वाईट असो. षड्शास्त्रांविषयीं एका विद्वान् ग्रंथकारानें ह्मटलें आहे तें असें: "सहा शास्त्रांपैकीं फक्त पतंजलीचें योगशास्त्र ईश्वरी सूत्रास मानणारें आहे असें दिसतें. यावरून असें दिसतें कीं या शास्त्रमार्गाप्रमाणें चालणाऱ्यास धर्म, कर्म, नीति इत्यादि गोष्टींचा विधिनिषेध राहाणें शक्य नाहीं."[२]

भगवद्गीता.

एकंदर सर्व संस्कृत ग्रंथांत भगवद्गीतेचा हिंदु लोकांवर जबरदस्त पगडा असून तिची भाषा प्रौढ व चटकदार आहे. पूर्वींच्या सर्व शास्त्रांचा सार त्यांत आहे व त्या सर्वांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न जरी गीतेंत केला आहे तरी त्यांत विशेष यश आलेंसें दिसून येत नाहीं.

गीतेवर एम्. कझीनसाहेब यांनीं जो अभिप्राय लिहिलेला आहे तो वाचण्यासारिखा आहे. हे साहेब शांतवृत्तीचे असून मोठे रसज्ञ पंडित आहेत. गीतेविषयीं त्यांचा अभिप्राय या प्रकारचा आहे:

"भगवद्गीतेंत सांगितलेला दैविक मार्ग ह्मणजे वेदान्त भयंकर व मनाला भुरळ घालणारा, विलक्षण रौद्र स्वरूपानें दर्शविलेला अशा प्रकारचा असल्यामुळें तो वाचल्यावर मनुष्य अगदीं भयचकित होऊन गेला असेल यांत संशय नाहीं; इतकेंच नाहीं तर आपण किती क्षुद्र प्राणी आहों असेंही त्यास वाटल्यावांचून राहिलें नसेल. कलाकौशल्यांत कितीही प्रवीण होऊन मनाची कल्पना त्याजबरोबर अनियंत्रित धावली तरी मनोराज्याची इमारत फार झालें तर पर्वतप्राय होऊं शकेल; पण त्यापुढें काय! कारण कला किती झाली तरी पंगू ती पंगूच. गीतेंत सांगितलेला देव सर्व ब्रह्मांडमय असल्यामुळें मनुष्यास आपली

---

[१] न्यायशास्त्र आस्तिकवादी नाहीं असें डाक्तर बानरजी यांचेंही मत आहे.

[२] हा अभिप्राय प्रख्यात संस्कृतभाषाभिज्ञ डाक्तर जान म्यूर यांचा आहे. त्यांचा *North British Review* अंक ४९ यांतील निबंध पहा. पृष्ठ २२४.

अत्यल्पता वाटून ईश्वरीसत्तेच्या कल्पनेनें मनुष्य किती दडपून गेला असेल बरें! अशा प्रकारच्या कल्पनेनें मनुष्य अगदीं निराश होऊन कोणतीही हालचाल करण्यास आपण समर्थ व स्वतंत्र नाहीं असें त्यास वाटूं लागतें व यामुळें शेवटीं मनुष्य नीतिभ्रष्ट होतो. या प्रकारें मनुष्य सर्व तऱ्हांनीं स्वतःस तुच्छ मानणारा झाल्यावर, आपल्या पूर्वकर्मांचें सिंहावलोकन करून त्यांजविषयीं कौतुक करणें हें त्याच्या मनांत सुद्धां येणार नाहीं. असा विटलेला मनुष्य इतिहासासारख्या महत्त्वाच्या विषयास पराङ्मुख झाल्यास आश्चर्य तें कोणतें!" वरील टीका खरमरीत तर खरीच पण ती विशेष कडक ह्मणतां येत नाहीं. एकंदरीनें षड्दर्शन वगैरे शास्त्रांनीं हिंदुस्थानांतील अभिरुचि, कलाकौशल्य, स्वातंत्र्य, राजकीय सुधारणा, व नीति इत्यादिकांचा विकास होऊं न देतां ते गुण जागच्याजागीं थंड झाले, व यामुळें मनुष्याची बुद्धि संकोचित होऊन त्याला इतिहासासारखा विषय हातीं घेणें अगदीं अशक्य झालें.

आतां या विषयाची परिसमाप्ति करणें इष्ट दिसतें. आमच्या मनावर या विषयाचा काय संस्कार झाला हें थोडक्यांत सांगतों. हिंदुस्थानांतील तत्त्वज्ञानाचा इतिहास प्राचीन ग्रीस देशांतील तत्त्वज्ञानाच्या इतिहासासारखाच आहे. (ग्रीक धर्म ह्मणून जें प्रकरण मागें दिलें आहे तें पहावें.) हिंदुस्थानांतील तत्त्ववेत्ते फार शीघ्र बुद्धीचे व गहन विचारी होते हें आह्मांस मान्य आहे. परंतु ईश्वरी व मानवी प्रकृतिगुण तसेंच मनुष्याची गति व इतिकर्तव्यता यांची वाट लावण्याच्या भरीस ते जेव्हां पडले तेव्हां ते तोंडघशीं पडल्याचें आपण पहातों. या तत्त्ववेत्त्यांनीं तर्क इतका चालविला कीं त्यापासून पुढें फारच अनर्थ झाला. वेडेचारांनीं भरलेले, निराधार व परस्परविरोधी असे असंख्य पंथ या देशांत निर्माण झाले. या पंथांनीं मनुष्याला निरुत्साह केलें इतकेंच नाहीं तर त्याच्या ठायीं जो कांहीं प्रेमाचा व सद्गुणाचा अंश होता त्यावर कटाक्ष धरून त्यास निर्वाण ह्मणजे नाहींसें होणें हीच काय ती सद्गति अशी त्याची प्रवृत्ति केली. ह्मणजे हिंदुस्थानांतील तत्त्वविचार निव्वळ निराशेचा आहे. परंतु खरा धर्म कांहीं निराशेचा नाहीं. "आशेचा देव" असें ईश्वरास बायबलांत मोठ्या प्रौढीनें ह्मटलें आहे. याचा अर्थ असा कीं सूर्यापासून जसा प्रकाश तद्वत् ईश्वरापासून आशा निघालेली आहे. "जगानें ज्ञानाच्या योगानें देवाला जाणिलें नाहीं." हिंदु लोकांची आतां पक्की खातरी झाली असावी कीं स्वतःच्या ज्ञानाच्या प्रकाशानें कांहीं एक फलप्राप्ति नसून परमेश्वराच्या कृपेनेंच ती साध्य होते ह्मणून त्यांजविषयीं कृतज्ञ भाव धरून हजारों वर्षांचा हेका त्यांनीं आतां सोडून द्यावा हें चांगलें. परंतु ते विचार तसें करतील काय?[१]

**आपला मित्र—.**

---

[१] परिशिष्ट ७ पहा.

# पत्र चौदावें.

## महमदी धर्माचें परीक्षण.

महमदी धर्म काय आहे?—**त्याजविषयीं बाह्य प्रमाण**—महमदाचें चरित्र व कुराणाचा इतिहास हीं अनिश्चित आहेत—कुराण अस्सल असल्याचें सिद्ध होणें अशक्य—महमद व त्याचे चमत्कार यांचा अन्योन्य संबंध—जे चमत्कार महमदाचे ह्मणून मानतात त्यांचें परीक्षण—महमदाचें ह्मणून मानलेलें भविष्यकथन—महमदी धर्माचा त्वरित प्रसार हेंच त्याचे खरेपणाचें प्रमाण, या मताचें खंडन—कुराण केवळ अप्रतिम असल्यामुळें त्यास अद्भुत चमत्कार ह्मणतां येत नाहीं.

**अंतःप्रमाण**—कुराणांतील परस्परविरोधी गोष्टी—बायबल व कुराण या दोहोंत मेळ नाहीं.—महमदाचे आगमनाविषयीं कुराणांत ख्रिस्ताचें भविष्यकथन—कुराणांत नवीन ह्मणून कांहींच नाहीं—तत्त्वज्ञानाशीं कुराणाचा विरोध—त्याची असहिष्णुता—त्यांतील मतें अपूर्ण व सदोष आहेत—महमदाचें गुणदोषविवेचन—महमदी धर्माचें स्थूलमान—उपसंहार.

**प्रिय मित्र—,**

महमदी धर्मास अनुकूळ असा जो पुरावा आणण्यासारखा आहे त्याविषयीं आतां आपण विचार करूं. या धर्माचा आरंभ व अनेक देशांतून याचा विलक्षण रीतीनें त्वरित प्रसार कसा झाला या गोष्टींचा विचार केला असतां फारच मौज वाटते. हिंदु धर्म पहावा तों तो फक्त या देशालाच काय तो लागून आहे; परंतु महमदी धर्माची तशी गोष्ट नाहीं. तो एशिआ व आफ्रिका या दोन खंडांतच पसरला आहे इतकेंच नाहीं तर त्याचे बरेच अनुयायी यूरोप खंडांत देखील आहेत[1]; तर मग हा महमदी धर्म आहे तरी काय याची चौकशी केली पाहिजे. खुद्द महमदानें स्थापन केलेला महमदी धर्म व हल्लीं प्रचारांत असलेला महमदी धर्म या दोहोंत जी तफावत आहे ती लक्ष्यांत आणणें अवश्य आहे. कारण तसें न केल्यास, महमदाविषयीं आपला गैरसमज होण्याचा संभव आहे. हल्लीं प्रचारांत असलेल्या महमदी धर्मांत अनेक वेडेचार आहेत व ते महमदाच्या पदरीं बांधणें रास्त होणार नाहीं.

महमदी धर्माचीं जीं मतें आहेत त्या सर्वांचा समावेश कुराणांत केलेला नाहीं.

१ कुराण, २ दंतकथा, ३ प्राचीन गुरुजनांची सम्मति, ४ सादृश्य संबंधाचें अनुमान असे महमदी धर्मास चार आधारस्तंभ आहेत असें सांगतात.

म्यूरसाहेबांनीं महमदाचें चरित्र लिहिलेलें आहे त्यांत एके ठिकाणीं त्यांनीं ह्मटलें आहे तें असें:

---

[1] वेस्ट इंडिज बेटांत, विशेषतः त्रिनिदाद एथें जे हिंदुस्थानांतील मजूर गेले आहेत त्यांत हिंदु व मुसलमान यांचा बराच भरणा आहे.

१९

" सुनी पंथाच्या लोकांच्या ज्या दंतकथा आहेत त्यांस सुनत असें ह्मणतात. त्यांचे मुख्य भाग सहा आहेत; यांपैकीं सर्वांत जो जुना भाग त्यांतील दंतकथांचा संग्रह महमदाच्या मृत्यूनंतर दोनशें वर्षांनीं करण्यांत आला. शिया पंथाचे लोक या सर्व दंतकथा अमान्य करून त्यांच्याऐवजीं त्यांनीं आपले पांच दुसरे कथासंग्रह जमविले आहेत. शिया लोकांच्या या दंतकथा फारच अलीकडच्या असून त्या सुनतप्रमाणें भरंवशाच्या नाहींत." या कथा केवळ शिआ पंथास धरून आहेत.

महमदी धर्माचा मुख्य आधारस्तंभ ह्मटला ह्मणजे कुराण होय. हा आधार काढून घेतल्यास त्या धर्माची सर्व इमारत ढासळल्यावांचून रहाणार नाहीं.

## बाह्यप्रमाण.

१. महमदाचें चरित्र व कुराणाचा इतिहास यांविषयीं प्रथम शोध केला पाहिजे.

या कामीं पहिल्या घांसासच मक्षिकापात! लेन नामक विद्वान् अरबी भाषाभिज्ञानें इ. स. १८४३ या वर्षी " कुराणांतील निवडक वेंचे " नांवाचा एक ग्रंथ केला त्यांत तो ह्मणतो, "यूरोपांत आज मित्तीला महमदाच्या इतिहासाचे जे जे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत त्यांहून तत्संबंधानें विशेष माहिती मिळेल तोंपर्यंत महमदानें जीं जीं कृत्यें केलीं त्यांत त्याचा हेतु कोणता होता हें आपणांस निश्चयात्मक न ठरवितां आल्यामुळें आमचा ग्रह अन्यथा होण्याचा संभव आहे."

महमदाचें चरित्र अनिश्चित आहे.

वील, कासिन डी परसिव्हल, स्प्रेंगर व सर विलियम म्यूर आदीकरून विद्वानांनीं जरी महमदी धर्मावर फार उत्तम उत्तम ग्रंथ लिहिले आहेत तरी प्रस्तुतही वर लिहिल्याप्रमाणेंच स्थिति आहे; कारण महमदाच्या चरित्रासंबंधानें जे कित्येक आक्षेप होते ते अद्याप कायम आहेत.

एशिआ खंडांत जे महमदाचे चरित्रकार होऊन गेले त्या सर्वांत अबदुल फेदा हाच अधिक विचारी होता असें ह्मटलें पाहिजे. परंतु तो महमदानंतर सातशें वर्षांनीं ह्मणजे इ. सनाच्या १४व्या शतकांत झाला, व त्यानें ज्या ग्रंथाधारें महमदाचें चरित्र लिहिलें त्या ग्रंथांचे लेखक महमदाशीं समकालीन नसून त्यानंतर शंभर सवाशें वर्षांनीं झाले. या कारणामुळें अबदुल फेदा यानें लिहिलेलें चरित्र प्रमाणभूत मानितां येत नाहीं. मग त्याच्यापुढें पंधराव्या शतकांतील मिरखोंड व त्यानंतर सोळाव्या शतकांतील अलजनाबी या चरित्रकारांचें महत्त्व कांहींच नाहीं. मुसलमान ग्रंथकार नेहमीं तवारी नामक चरित्रकाराचाच हवाला देत असतात; परंतु त्यानें लिहिलेल्या गोष्टी दोनशें वर्षांपूर्वींच्या आहेत; कारण तो इ. स. ९२२च्या सुमारास मृत्यु पावला.[१] आतां आपण तवारीच्याही थोडें मागें जाऊं; ह्मणजे आपल्यास महमदाचे अव्वल चरित्रकारांचीं नांवें आढळतात—१. इबू हिशाम—याचा

[१] गिब्बननें तवारी यास अरबस्थानांतील लिवी हें नांव दिलें आहे. लिवी हा प्रसिद्ध रोमन इतिहासकार होय.

मृत्युकाल हिजरी शक २१३. २ वाकीडी,[१] जन्मकाल हिजरी शक १३० व मरणकाळ २०७. ३ इब्नसाअद, यास वाकीडीचा चिटनवीस किंवा कातिब अलवाकिडी असें ह्मटलें आहे. याचा मृत्युकाल हिजरी शक २३०.

यावरून पहातां महमदाच्या समकालीन जे ग्रंथकार झाले त्यांतील एकानेंही महमदाचा वृत्तांत लिहिला नाहीं. यदाकदाचित् कोणीं कांहीं लिहिला असल्यास तो हल्लीं उपलब्ध नाहीं इतकेंच नाहीं तर महमदाच्या मृत्यूपासून शंभर वर्षांच्या आंत जें कांहीं कोणीं त्याच्याविषयीं लिहिलें असेल तें आज तारखेला पहावयास मिळत नाहीं ही मोटी लक्ष्यांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे, व इजमुळें महमद कोणत्या प्रकारचा असून त्यानें काय काय केलें तें मुळींच निश्चयात्मक सांगतां येत नाहीं.

महमदाचे पहिले पहिले चरित्रकार यांनीं त्याजविषयीं माहिती कोठून मिळविली याचा शोध करणें हें महत्त्वाचें आहे; खुद्द कुराणांत नाहींत अशा गोष्टी या चरित्रकारांनीं निव्वळ दंतकथांवरून घेतल्या आहेत. सांगोसांगीं चालत आलेल्या शें सवाशें वर्षांच्या दंतकथा फार बारकाईनें तपासल्या पाहिजेत. कदाचित् त्या खऱ्या असतील किंवा खोट्याही असूं शकतील; परंतु इतकें खरें कीं अशा गोष्टी कालांतरानें बदलून जाऊन अतिशयोक्तीनें भरलेल्या असतात. महमदाच्या चरित्रांतील कांहीं दंतकथा व कुराण यांमध्यें फारच विरोध असल्यामुळें त्या गोष्टी खोट्या आहेत हें उघड आहे. अलबुखारी[२] नामक गृहस्थानें या प्रकारच्या सुमारें सहा लक्ष दंतकथा शोधून काढल्या आहेत, तेव्हां त्या किती झपाट्यानें निघून चहूंकडे पसरल्या असाव्या याचें अनुमान सहज करितां येईल. त्याच्या मतें या सर्व दंतकथांपैकीं काय त्या चार हजार मात्र भरंवशालायक आहेत. यांपैकीं निम्यादेखील कोणी यूरोपिअन परीक्षक खऱ्या मानणार नाहीं.

कुराण अस्सल आहे काय?

वस्तुस्थिति अशी असल्यामुळें महमदाच्या चरित्रांतील मुख्य मुख्य गोष्टी समजण्याकरितां आह्मांस कुराणाकडे वळावें लागतें हें साहजिक आहे. परंतु कुराणाकडे जाऊनही मनाची पूर्ण खातरी होत नाहीं. कारण स्वतः महमदानें लिहिलेलें कुराण व हल्लीं प्रचलित असलेलें कुराण एकच आहे असें शाबीत करणें कठीण आहे. कुराण ह्मणजे महमदानें तेवीस वर्षें आपल्या शिष्यवर्गास केलेला उपदेश. तो त्या शिष्यांपैकीं कित्येकांनीं पठन केला व कित्येकांनीं ताडपत्रें, चर्मपत्रें, शिला यांवर व कित्येकांच्या मतें स्कंधास्थीवर[३]

---

[१] वाकिडी व इब्न साअद यांचे ग्रंथांतून माहिती पूर्ण भरलेली आहे. हे ग्रंथकार प्रामाणिक जरी आहेत तरी ते जसे गुणदोषविवेचक असावेत तसे नाहींत.

[२] हा बुखारा एथील राहाणारा ह्मणून त्यास हें नांव प्राप्त झालें असावें. त्याचें खरें नांव अबू अबदल्ला महमद होतें. त्यानें बहुत वर्षें अनेक देशांत प्रवास करून या दंतकथा गोळा केल्या.

[३] गिब्बन अध्याय १ पृ. २६४. (Milman's Ed.)

लिहून ठेवला. हे सर्व लेख महमदाचे मरणसमयीं सरसकट एका पेटींत[१] पडले होते. महमदाच्या बहुतेक सर्व शिष्यांनीं यांपैकीं बहुतेक भाग मुखोद्गत केला होता; व त्याच्या हयातींत कुराणाचे कांहीं अध्याय नमाज करतेवेळीं नियमानें ह्मणत असत. पुढें दोन वर्षांनीं मुखोद्गत असलेले व लिहून ठेवलेले सर्व अध्याय एकत्र करण्याविषयीं अबू बकर यानें हुकूम फरमावला. यावरून कुराणाचे सर्व भाग एकत्र करणारा अबू बकरच होता अशी कित्येकांची समज झालेली आहे.[२] कुराणाच्या ठिकठिकाणच्या निरनिराळ्या प्रतींत निरनिराळे पाठभेद आहेत असें ऑथमन नामक खलीफाच्या नजरेस आल्यावरून त्यानें पुढें सतरा वर्षांनीं चार पंच नेमून त्यांस कुराणाच्या तपासणीचें काम सांगितलें. ही तपासणी, हफजा म्हणून जी एक महमदाची बायको होती तिच्या ताब्यांत असलेली तिच्या बापाची ह्मणजे अबू बकर याची मूळची कुराणाची प्रत, तिजवरून करावी असें त्यानें या चार पंचांस फरमाविलें होतें.[३]

नंतर या दुरुस्त केलेल्या कुराणाच्या अनेक प्रती करून दूर दूर ठिकाणीं पाठविण्यांत आल्या व जुन्या हस्तलिखित प्रतींचा नाश केला.

यावरून हें सिद्ध होतें कीं मूळचें महमदाचें कुराण आज तारखेस नाहीं. त्यांत अबू बकर व ऑथमन यांनीं हात घालून बरीच सुधारणा केली आहे.

शिया पंथाचे मुसलमान लोक असें ह्मणतात कीं ऑथमन खलीफानें कुराणाचा एक चतुर्थांश ह्मणजे सुमारें दहा अध्याय अजिबात गाळून टाकले.[४]

वरील विवेचनावरून दोन मुद्याचीं अनुमानें निघतात. पहिलें असें कीं महमदाचे चरित्राविषयीं बराच घोंटाळा आहे. कारण मुसलमान इतिहासकार त्याविषयीं खातरी-लायक लिहीत नाहींत हें मागें सांगितलेंच आहे. बरें, कुराणाकडे पहावें तों निखालस खरा भाग सांपडण्यास तीच अडचण पडते. दुसरें अनुमान, जर महमदानें देवाचें शास्त्र प्रगट केलें असें ह्मणावें तर त्यांत खोडाखोडी केलेली दृष्टीस पडते; असें कां असावें? त्यांत कांहीं गोष्टी पदरच्या घातल्या असाव्यात व कांहीं गाळून टाकल्या असाव्यात असें झालें नसेल हें कशावरून?

परंतु एकंदरीनें पहातां हल्लींचें कुराण बहुतेक अंशीं महमदानें लिहिलेल्या कुराणा-सारखेंच आहे; तथापि त्यानें आपले हयातींतच कुराणांत बरेच महत्त्वाचे फेरफार वेळोवेळीं केले असावे असें दिसतें.

---

१ सेल साहेबाचें कुराण. उपोद्घात पृ. ७७ पहा.

२ सेल साहेबाचें कुराण उपोद्घात. पृ. ८६.

३ हफजा इच्या ताब्यांत असलेल्या मूळच्या प्रतींत ज्या कित्येक गोष्टी होत्या त्या बदलून टाकल्या असाव्या असें दिसतें. सेलचें कुराण उपोद्घात पृ. ७८ पहा.

४ या बगरहुकूम गाळलेल्या दहा अध्यायांपैकीं एक अध्याय दबिस्तान नामक ग्रंथांत आहे. शिया व ट्रायर यांनीं दबिस्तानचा तर्जुमा केलेला पहाणें. भाग २ पान ३६८.

कुराणाकडे पाहूं गेलें असतां त्यांत एकच ब्रह्मघोटाळा करून ठेवलेला आहे यामुळें महमदाविषयीं त्यावरून माहिती मिळविण्यास मोठीच पंचाईत पडते. त्या ग्रंथांत विषयवार व्यवस्थेचा पूर्ण अभाव आहे. प्रत्येक वाक्य स्वतंत्र रीतीनें पहातां मूळचें अस्सल असावें असें वाटतें; परंतु तेंच पूर्वापार संबंधानें पाहिलें ह्मणजे आपण अगदीं घोंटाळ्यांत पडतों. ह्मणून कोणत्याही गोष्टीविषयीं जें कांहीं ह्मटलें आहे त्याची क्रमवार व्यवस्था समजणें हें अत्यावश्यक आहे. जेव्हां दोन वाक्यांचा परस्परविरोध असतो तेव्हां त्यांतलें अखेरचें कायमचें कोणतें हें कळणें जरूर आहे.

२ तर मग महमदानें निवेदन केलेलें कुराण तेंच आपणांजवळ आज आहे असें आपण मानूं, परंतु तसें मानल्यानेंही कुराणाचा कर्ता आपण देवाचा पैगंबर आहों असें जें ह्मणत होता त्यास प्रमाण काय?

महमदाच्या चरित्रास काय तो आधार कुराणाचाच हें आपणांस कळून आलेंच आहे.

महमदाचे हातून चमत्कार घडले नाहींत.

कुराणांत अद्भुत चमत्कारांविषयीं पुष्कळ ठिकाणीं लिहिलें आहे; परंतु ते चमत्कार महमदानें केले अशा अर्थाचें एकही वाक्य कुराणांत सांपडत नाहीं. उलटें चमत्कार न केल्याचीं कारणें दर्शविणारीं अनेक वाक्यें सांपडतात व कित्येक वाक्यांत मला चमत्कार करण्यासाठीं पाठविलें नाहीं असें स्पष्ट ह्मटलें आहे; सुरा १३ यांत देव महमदाशीं या प्रकारें बोलत आहे: "काफर ह्मणतात, 'तुझ्या प्रभूकडून तुला कांहीं खूण मिळाल्याशिवाय आमचा विश्वास बसणार नाहीं. तुला उपदेश करण्याकरितांच पाठविलें आहे. तुला चमत्कार करण्याचा अधिकार नाहीं.'" सुरा १७ यांत देवाच्या मुखांत शब्द घातले आहेत ते असे:

"तुला चमत्कार करण्याकरितां पाठविण्यास आमची कांहीं हरकत नाहीं. परंतु पूर्वींच्या लोकांनीं सर्व चमत्कार झूट मानले." तर या गोष्टीवर जास्त चर्चा करण्याची जरूर दिसत नाहीं, कारण सरळ मनानें जो कोणी कुराण वाचील त्यास आमच्या ह्मणण्याची यथार्थता दिसून येईल.

तथापि आमच्या पैगंबरानें अद्भुत चमत्कार केले असें पुष्कळ मुसलमान ग्रंथकारांनीं ह्मटलें आहे. परंतु ज्याअर्थीं खुद्द महमद हें नाकारितो त्याअर्थीं या ग्रंथकारांचें ह्मणणें वायफळ आहे.

(१) असें जरी आहे तरी कित्येक टीकाकारांच्या मतें खुद्द कुराणांत जे अद्भुत चमत्कार सांगितले आहेत त्यांविषयीं थोडा बहुत विचार करावा हें बरें. त्यांपैकीं सर्वांत प्रसिद्ध ह्मटला ह्मणजे चंद्राचीं शकलें झालीं हा होय. त्याविषयीं सुरा २४ यांत वर्णन आहे तें असें:

चंद्राचीं शकलें.

"न्यायाची घटका जवळ येऊन ठेपली आहे; व चंद्राचीं शकलें झालीं आहेत; परंतु जर ते खूण पहातात किंवा पाहातील तर ते एकीकडे वळतात किंवा वळतील व ह्मणतील कीं 'काय हा मोठा चमत्कार!'"

अ. या वाक्यांच्या अर्थाविषयीं मुसलमान ग्रंथकारांत बराच मतभेद आहे. या ठिकाणीं महमदानें कवित्वाच्या प्रकारानें पुढें कालांतरानें होणारी गोष्ट वर्तमानभूतकालांत सांगितली आहे. हा प्रकार यहूदी व अरबी भाषांत केलेला नेहमीं आढळतो. ह्मणून न्यायकाळ प्राप्त होण्यापूर्वीं तो सुचविण्यासाठीं चंद्राचें विदारण होईल इतकाच महमदाच्या बोलण्याचा भाव असावा. या अर्थास पुष्टीकरण कुराणांतील पुढल्याच वाक्यानें मिळतें. हा अद्भुत चमत्कार घडला असें जर खरोखरीं महमदाचें ह्मणणें असतें तर त्यावर भरंवसा ठेवला नाहीं हें महापातक आहे असें त्यानें वारंवार ह्मटलें असतें.

ब. दुसरें असें कीं चंद्राचीं शकलें आपण केलीं असें महमद ह्मणत नाहीं. यदाकदाचित् हा चमत्कार घडला असें जरी ह्मटलें तरी त्यावरून ईश्वराचा प्रभाव सिद्ध होत असून महमदास यत्किंचित्‌ही मोठेपणा मिळत नाहीं.

क. आता हें उघड आहे कीं चंद्राचीं शकलें हीं न्यायाच्या दिवसाची खूण म्हणून सांगण्यांत आलें आहे. पण जर चंद्राचीं शकलें महमदाचे वेळीं म्हणजे सुमारें बाराशें वर्षांपूर्वीं झालीं असें ह्मणावें तर तीं न्यायाच्या दिवसाची खूण आहेत असें कसें ह्मणतां येईल? कारण न्यायाचा दिवस तर अद्याप आला नाहीं.

(२) दुसरा प्रसिद्ध चमत्कार म्हटला ह्मणजे "महमदाचा एक रात्रीचा प्रवास" हा होय. याविषयीं कुराणांत सुरा १७ या ठिकाणीं लिहिलें आहे तें असें: "ज्यानें आपल्या रसूलास मक्केच्या पवित्र देवळांतून फार दूरच्या यरूशलेम येथील देवळांत रात्रीचे वेळीं उचलून नेलें तो स्तुत्य असो." महमदाला एका रात्रींत सात अस्मानांतून वरतीं नेऊन देवाच्या सन्निध बसविलें व त्याच रात्रीं पुनः मक्केस परत आणून सोडलें अशी कथा कित्येक मुसलमान ग्रंथकारांनीं लिहून ठेवलेली आहे. परंतु याविषयीं कुराणांत एक अक्षर देखील सांपडत नाहीं. खुद्द महमद यासंबंधानें जें कांहीं म्हणतो त्यावरून तर हा अद्भुत चमत्कार ठरत नाहीं. झोंपेंत अमूक काम आपण केलें किंवा अमक्या ठिकाणीं आपण गेलों असें आपण नेहमीं म्हणतों; तद्वत्‌च महमदाच्या बोलण्याचा भाव असावा असें दिसतें. हें मत पुष्कळ मुसलमानांचें[१] आहे इतकेंच नाहीं तर त्या रात्रीं महमद आपला बिछाना सोडून कोठें गेला नाहीं असें हफ्जा ह्मणून जी एक महमदाची बायको होती तिचें ह्मणणें आहे, व या तिच्या ह्मणण्यास खरोखर जास्त किंमत आहे. महमद हा मानसिक भ्रमणांत पडल्यामुळें त्या रात्रीचें स्वर्गारोहण स्वप्नांतील किंवा प्रत्यक्ष होतें याचें त्यास भान राहिलें नाहीं हें संभवतें, किंवा लोकांस फसविण्याचा त्याचा हेतु नसून कदाचित् त्याच्या कल्पनेचा तरंग असा धावला असावा कीं ही गोष्ट प्रत्यक्षच आहे. अशी चूक पुष्कळांची झालेली आहे.

एका रात्रीचा प्रवास.

---

[१] हा प्रत्यक्ष प्रवास नसून महमदास स्वप्नांत केवळ भास झाला असावा असें फार जुन्या ग्रंथकारांचें मत पडतें. म्यूर भाग २ पृ० २२१.

दुसरें असें कीं या रात्रीच्या प्रवासाच्या खरेपणाविषयीं प्रमाण पाहिलें तर केवळ एकट्या महमदाचेच सांगण्यावरून आहे. तर अशा मुद्यावर ज्याचा तो केवळ एकच साक्षीदार व तोही स्वतःच्या वतीनें सांगणारा असल्यामुळें त्या एकट्यावर कितपत भरंवसा ठेवावा?

पिशाचांनीं (जिन) मुसलमानी धर्म स्वीकारला.

(३) "एके वेळीं महमद कुराण वाचीत असतांना भुतांच्या टोळीनें तें ऐकून त्यांची त्यावर श्रद्धा बसली. पुढें त्यांनीं कुराणाचा उपदेश आपल्या इतर भुतांस केला." सुरा ४६,७२.[१] ही कुराणांतील चमत्कारिक कथा मुसलमान लोक अद्भुत चमत्कार ह्मणून सांगत असतात. देवदूत व मनुष्यें या दोहोंच्या दरम्यान पिशाचयोनि कल्पून तीस जिन (पिशाच्च) असें ह्मणतात. जलालुद्दीन म्हणून एक विद्वान् मुसलमान ग्रंथकार ह्मणतो कीं जिन ही सैतानाची संतति असून देवदूतांत व यांच्यांत भेद काय तो इतकाच कीं यांच्यांत प्रजोत्पादन असल्यामुळें यांचीं स्वतःचीं मुलेंलेंकरें आहेत.

या चमत्कारापासून कांहींएक शाबीद होत नाहीं; पण उलटें हा चमत्कार घडला यास पुरावा काय व जिन ह्मणून जी योनि सांगितली ती आहे हें कशावरून? या बाबतींत एकट्या महमदाचें बोलणें आह्मांस कबूल करितां येत नाहीं. कदाचित् स्वप्नांत त्यास ही गोष्ट दृग्गोचर झाली असेल, परंतु त्याच्या स्वप्नाशीं आपल्यास काय कर्तव्य आहे?[२]

या गोष्टीविषयीं याहून अधिक लिहिण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. महमद पैगंबर होता हें यावरून सिद्ध होत नाहीं. ख्रिस्ताला देवदूतांनीं पाहिलें यावरून तो जगदुद्धारक ठरतो असें ख्रिस्ती लोकांचें ह्मणणें नाहीं. ज्या चमत्कारांवरून एखादी गोष्ट ठरवायाची आहे ते चमत्कार चार चौघांत प्रसिद्धपणें झालेले असून त्यांजविषयीं शंकेला तिळमात्र जागा नसली पाहिजे.

बाद्र एथील जय अद्भुत चमत्कार नाहीं.

(४) बाद्र एथील लढाईत महमदानें जो जय मिळविला तो कुराणांतील एक चमत्कार आहे असें मुसलमान लोक मानितात. त्या प्रसंगीं महमदाकडचे फक्त ३१९ लोक असून शत्रूचे लोक सुमारें एक हजार होते. कुराण, सुरा २ व ७ यांत देवानें महमदाचे कुमकेस प्रथम एक हजार व मागाहून तीन हजार देवदूत पाठविले असें सांगितलें आहे.[३] या लढाईत शत्रूकडचे सत्तर व मुसलमानांकडचे फक्त चौदा ठार झाले.

---

[१] Sale's Kuran, vol. i., p. 262.

[२] "ख्रिस्त दूतांच्या दृष्टीस पडला" हें जें ख्रिस्ताविषयीं बायबलांत लिहिलेलें आहे तें वरील गोष्ट लिहितांना महमदाचे नजरेपुढें होतें असें सहज कोणासही वाटल्यावांचून रहाणार नाहीं, परंतु दोहोंत किती फरक आहे? जगाच्या उद्धारकानें जें महत्कार्य केलें तें देवदूतांनीं लक्ष्यपूर्वक अवलोकन केलें. परंतु कुराणांत ह्मटलें आहे कीं सैतानाची प्रजा जी जिन ती आपल्या पापाच्या क्षमेसाठीं मुसलमान झाली!

[३] Sale's Kuran, Vol. i. pp. 207 and 54.

या लढाईच्या हकीकतीवरूनच ती खोटी ठरते. कशी ह्मणाल तर शत्रूकडील १,००० लोकांचा पराभव करण्याकरितां ४,००० देवदूत व ३१९ मुसलमान लोक नको होते. शिवाय, एकाही मुसलमानानें त्या वेळीं देवदूत पाहिल्याचें ऐकिवांत नाहीं.

दुसरें असें कीं देवदूतांच्या मदतीशिवाय जरी ३१९ मुसलमानांनीं शत्रूच्या १,००० लोकांचा पाडाव केला तरी त्यांत नवल करण्यासारखा पराक्रम तो कोणता? इतिहासांत याहून जास्त पराक्रमाचे विजय आढळतात.

कुराणांत महमदाचे जे अद्भुत चमत्कार ह्मणून सांगितले आहेत ते इतकेच आहेत. यावरून तो पैगंबर होता हें मुळींच ठरत नाहीं हें उघड आहे.

महमदानें भविष्य कथन केलें नाहीं.

२ अद्भुत चमत्कारांचे वस्तुतः दोन भाग आहेतः ज्यांत शक्तीचा प्रभाव दिसून येतो व ज्यांत ज्ञानाचा प्रभाव दिसून येतो ते. मनुष्याच्या ज्ञानाला अगम्य अशीं अनेक भविष्यें पूर्णता पावल्यानें ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त ठरलें आहे असा ख्रिस्ती लोकांचा खातरीपूर्वक अभिप्राय आहे. तर भविष्य कथन करण्याची शक्ति महमदांत होती कीं काय याविषयीं आपण आतां शोध करूं.

(१) माझ्या ठायीं भविष्यकथन करण्याची शक्ति आहे असें खुद्द महमदानें ह्मटलेलें कुराणांत कोठेंही आढळत नाहीं, तथापि त्याचे अनुयायी कुराणांतील वरींच वाक्यें भविष्य-सूचक आहेत ह्मणून सांगतात. त्यांपैकीं कांहीं महत्त्वाच्या वाक्यांचें आतां आपण परीक्षण करूं:

(२) सुरा ३०: "देशांतल्या अगदीं जवळच्या भागांत ग्रीक लोक पराभव पावले आहेत, पण या पराभवानंतर थोड्या वर्षांच्या आंतच ते जिंकतील."

महमदाला ईश्वरी प्रेरणा होती याचें प्रमाण वरील वाक्य होय असें मुसलमान लोक नेहमीं मोठ्या आव्हतेनें सांगतात, परंतु ते होऊन कबूल करितात कीं या वाक्याचे कित्येक प्रतींत पाठभेद आहेत. एका प्रतींत हेंच वाक्य लिहिलें आहे तें असें: "ग्रीक लोकांनीं पराभव केला परंतु त्यांचा पराभव होईल." अरबी भाषेंत स्वराचे नुक्तयांमुळें या प्रकारचे अर्थभेद होतात. त्यामुळें ग्रीक लोकांचा पराभव व ग्रीक लोकांनीं केलेला पराभव असे दोन्हीही अर्थ केले असतां खरे ठरतात. असो; ही गोष्ट बाजूला ठेविली तरी ग्रीक लोकांचे शत्रु कोण होते, ही लढाई कोठें व केव्हां झाली यांविषयीं तरी मुसलमान मुसलमानांतच एकवाक्यता कोठें आहे? कित्येकांच्या मतें परशिअन लोक व कित्येकांच्या मतें अरब लोक हे ग्रीक लोकांचे शत्रु होते. ही लढाई कोठें झाली याविषयीं देखील असाच गोंधळ आहे. कित्येक मेसेपोटेमिया, कित्येक अरबस्थान व कित्येक पालेस्टाईन अशीं रणभूमीचीं ठिकाणें निरनिराळीं सांगतात. परंतु जरी या सर्व शंकांची निवृत्ति झाली तरी देखील या वाक्यांत नवल करण्याजोगें भविष्यकथन मुळींच नाहीं. या वाक्यांत थोड्या वर्षांच्या आंत ह्मणजे पांच दहा वर्षांत कांहीं गोष्ट घडणार आहे इतकेंच काय तें महमदानें अगदीं संदिग्धपणानें ह्मटलें आहे, व त्यावरून त्याची

दूरदृष्टि व शहाणपण हीं मात्र व्यक्त होतात. अशा प्रकारचें भविष्य कोणालाही सांगतां येईल. उदाहरणार्थ, काबूलची लढाई घ्या. या ठिकाणीं इंग्रजांच्या सैन्याचा सर्वस्वीं फडशा उडविलेला पाहून कोणीही सहज अनुमान करील कीं इंग्रज लोक पुनः काबूलावर स्वारी करून शत्रूचें पारिपत्य करतील. कारण बापड्या अमीरानें इंग्रज लोकांच्या प्रचंड सैन्यापुढें टिकाव कसा धरावा? आपल्या अनुयायांची पाठ थोपटावी असा महमदाचा हेतु होता; इराणी किंवा अरबी लोक हे मूर्तिपूजक असल्यामुळें त्यांचा नायनाट होऊन ख्रिस्ती धर्माचे ग्रीक लोक यशस्वी व्हावेत अशी त्याची इच्छा होती. याशिवाय, इराणचें राज्य रानटी लोकांचें, आपआपसांत[१] कलह करणारे व परदेशस्थांशीं वैरभावानें वागणारे अशा लोकांचें असल्यामुळें सुधारलेल्या ख्रिस्ती ग्रीक लोकांना जयप्राप्ति व्हावी हें साहजिक आहे.

(३) अशा अर्थाचीं बरींच वाक्यें कुराणांत आहेत. त्यांपैकीं फार महत्त्वाचीं पुढील होत: (सुरा २४) "जे विश्वास ठेवतात व सत्कर्मे करितात ते या पृथ्वीवर काफरांच्या जागीं येतील असें देवाचें वचन आहे." (सुरा ४८) "देव प्रसन्न झाल्यास मक्केच्या पवित्र देवळांत तुमचें जाणें निर्भयपणें होईल." (सुरा २७) "ज्यानें तुला सदाचारसंपन्न होण्यासाठीं कुराण दिलें आहे तो तुला खरोखर घरीं मक्केस आणून पोहोंचवील."

कुराणांत भविष्यें आहेत अशी जी मुसलमानांची शेखी ती किती व्यर्थ आहे हें वरील उताऱ्यांवरून कळून येईल. प्रत्येक सरदार आपल्या सैन्यास उद्देशून भाषण करितांना त्यास वीरश्री व उमेद प्राप्त होईल अशींच भाषणें करीत असतो, व महमदावर आलेल्या प्रसंगांपेक्षां जास्त निकराच्या प्रसंगीं यशःप्राप्तीविषयीं पूर्वीच कथन केलेलीं व तदनुसार प्रत्ययास आलेलीं अशीं शेंकडों भविष्यकथनाचीं उदाहरणें आहेत. तथापि अशा भाषणांस भविष्य ही संज्ञा शोभत नाहीं. ग्रीक व लाटिन कवींच्या काव्यांतून कांहीं चकित होणारीं अनुमानें[२] दृष्टीस पडत असून तीं घडून आल्याचेंही प्रत्ययास आलें आहे ह्मणून त्या कवींस कोणीही ईश्वरप्रणीत भविष्यवादी ह्मणणार नाहीं.

बायबलाकडे पहातां त्यांतील भविष्यें त्याचें जीवनच होऊन बसलीं आहेत. कुराणाची तशी स्थिति नसून भविष्यें त्या ग्रंथास पुरावा आहेत असें सांगण्यांत येत नाहीं.

बरें, कुराणांत भविष्यें आहेत असें जरी मानलें तरी त्यांतील कांहीं खोटीं आहेत असें सहज दाखवितां येईल. उदाहरणार्थ, सुरा ४८ पहा; त्यांत असें लिहिलें आहे कीं "देवानें आपला पैगंबर सत्यधर्म देऊन पाठविला आहे व त्या धर्माचा पगडा सर्व धर्मांवर

---

[१] त्या काळीं इराणांत पुष्कळ ख्रिस्ती व यहूदी लोक असून त्यांपैकीं पुष्कळांस निर्दयपणानें जिवें मारिलें.

[२] सेनेका नांवाच्या रोमन कवीनें अमेरिका खंडाचा शोध लागेल असें भाकित केलें होतें असें ह्मणतां येईल.

बसवावा असा त्याचा हुकूम आहे." परंतु हें भविष्य खरें नाहीं असें कोणीही विचारी पुरुष कबूल करील. कारण, मुसलमानी धर्माचा प्रसार, वजन, त्या धर्मांतील लोकांचें ज्ञान व त्यांची नीति इत्यादिकांच्या मानानें पाहिलें म्हणजे त्याचें ख्रिस्ती धर्मावर वर्चस्व नाहीं. मुसलमानी धर्मापेक्षां ख्रिस्ती धर्माचा प्रसार मोठ्या झपाट्यानें होत आहे व मनुष्याच्या उन्नतीचें बीज त्या धर्मांतच आहे. आजकालचीं मोठमोठालीं राष्ट्रें ख्रिस्ती धर्मानुयायी आहेत, मुसलमानी नाहींत. मुसलमानी देशांतून सुधारणेचा रिघाव बाहेरून दपटशा असल्यावांचून होतच नाहीं.

४ महमदी धर्माचा उदय होतांच त्याचा प्रसार प्रारंभीं फार झपाट्यानें झाला हें तो ईश्वरदत्त असल्याचें प्रमाण आहे असें पुष्कळांचें ह्मणणें आहे.

मुसलमानी धर्माचा प्रसार त्याचे खरेपणाचें प्रमाण नाहीं.

कोणत्याही धर्माचा मोठ्या झपाट्यानें चोहोंकडे प्रसार झाला हें त्या धर्माच्या खरेपणाचें सबळ प्रमाण आहे असें कोणीही विचारी मुसलमान प्रतिपादन करणार नाहीं. उदाहरणार्थ, बौद्ध धर्म पहा. त्या धर्माचे लोक हल्लीं मुसलमानांपेक्षां जास्त आहेत; तथापि त्यामुळें तो यूरोप व अमेरिका एथील फार सुधारलेले व विद्वान् लोकांचा धर्म होण्याचा संभव आहे असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. कोणत्याही धर्माचा प्रसार होण्यास अनेक कारणें असतात. लोकांच्या रीतीभाती, त्यांची अभिरुचि व धर्मप्रसारार्थ योजिलेले उपाय इत्याद्यनेक गोष्टींवर धर्मप्रसार अवलंबून असतो.

त्या धर्माच्या क्षणिक प्रसाराचीं कारणें.

महमदी धर्माच्या प्रसाराचीं कारणें आतां सांगतों, त्यांवरून ही गोष्ट चांगली लक्ष्यांत येईल. (१) महमदी धर्मांत बराच सत्यांश आहे. ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म या दोहोंत पुष्कळ साम्य आहे हें यापूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. महमदी धर्मास ख्रिस्ती धर्म साधारणतः मान्य असून बायबलांतील बऱ्याच गोष्टी त्या धर्मांत आल्या आहेत. परमेश्वराचे ठायीं ज्ञान, शक्ति, अधिकार, दूरदृष्टि हे गुण असून तो एकच आहे हें मत कुराणास पूर्णपणें मान्य आहे. पुष्कळ धर्मांत परमेश्वराविषयींच्या कल्पना अस्पष्ट असल्यामुळें त्या त्या धर्माच्या लोकांच्या मनावर ईश्वराची दहशत फारशी नसते. त्यांच्या समजुतीनें देव ह्मणजे केवळ प्रकृति होय. महमदाची गोष्ट तशी नाहीं. ज्यास स्वेच्छेनें वागतां येतें अशी एक व्यक्ति ईश्वर आहे; तसेंच तो राजा असून हुकूम फरमावितो व ते हुकूम मानणें भाग आहे असें ईश्वराचें वर्णन महमदानें केलें आहे.

कुराणांत येशू ख्रिस्ताविषयीं मोठ्या आदरानें लिहिलेलें आहे. तो निष्पाप पैगंबर असून अखेरीस जगाचा न्याय तोच करील असें कुराण त्याविषयीं सांगतें. ही साक्ष फार महत्त्वाची आहे. ज्या धर्मांत अशा सत्य गोष्टींचा समावेश झालेला आहे त्या धर्मांत प्राबल्याचें व स्थैर्याचें बीज आहे असें ह्मटलें पाहिजे.

(२) तथापि भ्रष्ट झालेल्या मनुष्याच्या अभिरुचीला व मनोविकाराला महमदी धर्म प्रतिकूल नाहीं. या धर्मास ईश्वरी ज्ञान गूढ आहे, हें तत्त्व मान्य नसल्यानें तद्धर्मी मनुष्यास आपल्या बुद्धिवैभवाची शेखी चांगली मिरवितां येते. मनुष्याचें हृदय फारच भ्रष्ट होऊन ईश्वरपराङ्मुख झालें आहे असें या धर्मांत लिहिल्याचें कचित् आढळतें. मनुष्यानें आपल्या अंतर्यामीं जें पाप आहे त्याशीं झोंबी करणें, तसेंच त्यानें विनयसंपन्न व आत्मसंयमी असून स्वपराक्रमावर न टेंकणें इत्यादि कर्तव्यांचा या धर्मांत लवलेशही नाहीं. तेव्हां भ्रष्ट मनुष्यास हा धर्म पसंत व्हावा हें साहजिक आहे.

(३) या धर्माच्या प्रसारास महमदाचें वर्तन व स्थिति हीं बरींच कारण झालीं. महमद जरी मूळचा गरीब होता तरी ज्या कुळांत तो जन्मला तें अव्वल प्रतीचें असून त्यानें खदीजा नामक स्त्रीशीं विवाहसंबंध केल्यानें त्याची मक्केंत वजनदार लोकांत गणना झाली. तो विशाल बुद्धीचा व दृढनिश्चयाचा असल्यामुळें त्यास सहज आपली छाप लोकांवर ठेवतां आली. तशांत तो चलाख मनाचा व कल्पक असल्यामुळें आपल्या उदात्त कल्पनातरंगानें अरब लोकांस त्यास सहज हालवून सोडतां आलें.

(४) अरब लोकांच्या नैसर्गिक गुणांस महमदाचा धर्म अगदीं अनुरूप होता. या लोकांविषयीं प्रसिद्ध इतिहासकार हालमसाहेब ह्मणतो तें असें: “अरबस्थानचे लोक मूळचे कडवे असून लूट करण्यांत व नरडीचा घोट घेण्यांत अगदीं तरबेज होते. तशांत त्यांच्याच पैगंबरानें सर्व जगाचा फन्ना उडविण्यास नुस्ती मुभा नव्हे तर हुकूम फरमावल्यानें चहूंकडे हाहाकार उडाला हें साहजिक आहे.” बर्कहार्ड तर या लोकांस “चोरांचें राष्ट्र” ह्मणतो. फक्त लढाई मारून लोकांस जिंकणें ही हांव, मग तींत धर्माचें बीज असो वा नसो, मनुष्यास फ़ारच चेतना उत्पन्न करणारी आहे, आणि याच कारणामुळें शिकंदरबादशाह, जिंगीसखान, तैमूरलंग, नेपोलियन असे असे योद्धे प्रचंड युद्धसंग्राम करिते झाले. मुसलमानांनीं आरंभीं ज्या लढाया मारिल्या त्या धर्मप्रसारार्थ होत्या. त्याच तोडीच्या लढाया यूरोपांतील लोकांनीं केल्या त्या क्रुसेड नांवाच्या होत. या लढाया ज्यांनीं मारल्या त्यांस शौर्य व कीर्ति यांची हांव होती इतकेंच नाहीं तर त्यांस धर्मवेड देखील होतें. क्रुसेडच्या लढाया मारणारांनीं रणभूमीवर अप्रतिम शौर्य प्रगट केलें. मुसलमान लोक यूरोप खंडांतील देशामागें देश काबीज करीत चालले असतां त्यांचा व क्रुसेडच्या लोकांचा सामना होऊन मुसलमानांची पिच्छेहाट झाली व अखेरीस ख्रिस्ताचें थडगें त्यांच्या ताब्यांतून ख्रिस्ती लोकांनीं सोडवून घेतलें. इतकाच पराक्रम करून ते राहिले असें नाहीं. त्यांनीं एशिआ खंडांत राज्य स्थापन करून यूरोपिअन लोकांच्या पराक्रमाचा दिग्विजय लावला. क्रुसेडर लोकांचा हा पराक्रम[१] ख्रिस्ती धर्माचा खरेपणा शाबीद होण्यास कारण होत नाहीं व तीच गोष्ट मुसलमानी धर्मास लागू आहे.

---

[१] आमचें हें बोलणें फक्त त्यांच्या पराक्रमासंबंधानें आहे. त्यांनीं जीं अनन्वित कर्में केलीं त्यांबद्दल ते दोषार्ह आहेतच.

( ५ ) जे रणभूमीवर मरण पावतात त्यांस देव मोठें इनाम देतो या महमदी धर्माच्या सांगण्यानें मूळच्या क्रूर अशा अरब लोकांस धर्मवेडाचें मोठें भरतें आलें. स्वर्ग कोणाला नको आहे? व ज्या गोष्टीची आधींच हौस ती केल्यानें स्वर्गप्राप्ति होते असें अभयवचन मिळाल्यावर बिचाऱ्या अरब लोकांस दुधांत साखर पडल्यासारखें झालें.

ज्या ज्या विषयभोगांची कल्पना करतां येईल अशा विषयसुखांनीं परिपूर्ण असलेलें स्वर्ग कुराणांत सांगितलें आहे. अशा स्वर्गाची लालूच अरब लोकांस दाखविल्यानें ते मोठे योद्धे, धर्मवेडे, अति क्रूर व अजिंक्य बनले यांत नवल तें कोणतें?

( ६ ) महमदानें आपल्या लोकांस जो पदार्थ निषिद्ध ह्मणून सांगितला तो मद्य होय. जो इहलोकीं मद्यप्राशन करणार नाहीं त्यास तें स्वर्गांत मिळेल असें त्यानें सांगितलें. ज्या धर्मांत कोणत्याही गोष्टींचें बंधारण नाहीं त्याचा सहसा प्रसार होत नाहीं हें तत्त्व महमद जाणून होता. व यावरून तो मोठा चतुर असावा असें दिसतें. मनुष्याची जात्या धर्माकडे प्रवृत्ति असल्यामुळें ज्या धर्मांत बळी अर्पण करणें सांगितलें नाहीं तो धर्म खरा नाहीं असें त्यास स्वभावतः वाटूं लागतें. मुसलमान लोक रणभूमीवर जीव अर्पिण्यास तयार झाले असें जें आपण पहातों त्यांतलें इंगित तरी हेंच आहे.

अरब लोक हे मूळचे कडवे, तशांत त्यांस दारू पिण्याची मुभा दिली असतां ते मदोन्मत्त होऊन आपल्या दाबांत रहाणार नाहींत हें महमदास कळून चुकलें होतें, आणि या कारणामुळें मनुष्यानें दारू पिऊं नये हें कलम त्यानें कुराणांत घुसडलें.

( ७ ) महमदी धर्माचें बीज बळकट रुजण्यास आणखी जीं कारणें झालीं त्यांतील मुख्य मुख्य लेन साहेबांनीं आपल्या ग्रंथांत दिलीं आहेत तीं हीं: महमदाचे मुलकी व फौजदारी कायदे अरबस्थानांतील तात्कालीन समाजव्यवस्थेस अनुकूल होते. २ या कायद्यांनीं काजी वगैरे धर्माधिकाऱ्यांचा अधिकार संकुचित करून एकंदर सर्व लोक कायद्याचे दृष्टीनें एकसारखे मानले जाऊन त्यांस व्यवहारस्वातंत्र्य मिळालें. ३ लोकांवरील करांचा बोजा कमी करण्यांत आला. ४. महमदाचे कायदेकानू फार सुलभ, तसेच व्यापक असून संगतवार होते. ५. त्याकाळच्या मूर्तिपूजक, ख्रिस्ती, यहूदी व अरब लोकांत हरएक बाबतींत दुफळी होती इतकेंच नव्हे तर ते स्वेच्छाचारी असल्यामुळें महमदाचें चांगलेंच फावलें.

( ८ ) या गोष्टीला आणखी जी भर पडली ती ही होय कीं त्या काळीं अरबस्थान, इराण, एशिया मायनर, मिसर वगैरे देशांतून जे ख्रिस्ती लोक होते त्यांनीं ख्रिस्ताचा उपदेश व तत्त्वें अगदीं झुगारून दिल्यानें ते अतिशय भ्रष्ट झाले होते व त्यामुळें त्यांचा धर्म निःसत्त्व होऊन अगदीं डबघाईस आला होता. तसेंच, रोमन बादशाहीच्या पूर्वेकडील भागांत ह्मणजे ज्या भागाची मुख्य राजधानी कानस्तांतीनोपल हें शहर होतें तिकडे बायबलांत सांगितलेल्या शुद्ध धर्मांत वेडेवेडे चार शिरून तो अगदीं बिघडून गेला होता. अशा भ्रष्टलोकांस शासन उचित होतें ह्मणूनच देवानें महमद हा शासनरूपी फटका पाठवून त्यांचा समाचार घेतला असें कित्येक प्रस्तुत कालचे ख्रिस्ती लोक समजतात.

याशिवाय त्या काळच्या ख्रिस्ती लोकांत दुही व हाडवैर माजलें होतें; व त्यांचे शत्रु जे मुसलमान लोक ते अगदीं दाराशीं भिडले असून त्यांशीं सामना करण्याकरितां त्यांची जूट होणें मुष्कील झालें होतें. उदाहरणार्थ, मिसर देशच्या कापृ लोकांनीं ग्रीक लोकांच्या जुलमामुळें त्रस्त होऊन मुसलमान लोकांस देशांत येऊं दिलें, हें लक्ष्यांत घेण्यासारिखें आहे. या सर्व विचारांवरून महमदी धर्माचा प्रसार हा कोणत्याही प्रकारें अद्भुत चमत्कार ह्मणतां येणार नाहीं.

खुद्द कुराण अद्भुत चमत्कार नाहीं.

५. कुराण ईश्वरदत्त[१] असून मोठा अप्रतिम ग्रंथ आहे याबद्दल मुसलमान लोक जे पुरावे देतात त्यांचे परीक्षणाकडे आतां आपण वळूं. कुराणांत या गोष्टीचा वारंवार उल्लेख केलेला आहे. सुरा १० यांत या प्रकारें ह्मटलें आहे: "हें कुराण एका देवाशिवाय इतरांच्यानीं लिहवलें नसतें. सर्व सृष्टीचा प्रभु यानें तें पाठविलें आहे." सुरा १७ यांत "मनुष्यांनीं व पिशाचांनीं बुद्ध्या एकत्र जमून एकमेकांच्या सल्ल्यानें कुराणासारखें पुस्तक तयार करण्याचें मनांत आणिलें तरी त्यांच्या हातून तें घडणें शक्य नाहीं" असें ह्मटलें आहे. तसेंच, सुरा २ यांत या प्रकारें ह्मटलें आहे: "जें धर्मशास्त्र आह्मीं आपल्या रसूलाकडे पाठविलें त्याजविषयीं जर तुमची शंका आहे तर त्यांतील एका तरी अध्यायाप्रमाणें अध्याय तुह्मी तयार करा पाहूं."

कुराण हा अप्रतिम ग्रंथ आहे असें जें ह्मणण्यांत येतें त्याचा अर्थ इतकाच कीं त्यांतील विचार उदात्त किंवा भाषा सुंदर आहे किंवा हीं दोन्हीही उत्तम आहेत. मूळचें अरबी भाषेंतील कुराण जो कोणी वाचील त्यास त्यांतील विचार उदात्त आहेत किंवा नाहींत हें सहज ठरवितां येईल. शिवाय, कुराणाचा तर्जुमा लाटिन, इंग्लिश, उर्दु वगैरे भाषांतून झालाच आहे त्यावरूनही हें सहज कळून येईल. खरोखरीं कुराणांतील विचार उदात्त नाहींत असें म्हटलें असतां बाध येणार नाहीं. "कुराण हें भाकडकथा, उपदेश व शब्दपांडित्य यांनीं भरलेलें प्रचंड असंबद्ध काव्य आहे; यांतील विचार कधीं कधीं अति पोरकट व कधीं कधीं इतके थोर कीं तेणेंकरून मनुष्यास भ्रांति उत्पन्न होते;" हा कुराणाविषयींचा अभिप्राय प्रसिद्ध इतिहासकार गिब्बन[२] याचा आहे. गिब्बन साहेबाचा

---

[१] वही व इल्हाम ह्मणजे श्रेष्ठ व कनिष्ठ असे ईश्वरी प्रेरणेचे दोन प्रकार आहेत असें महमदी शास्त्रवेत्ते सांगतात. कुराणाची प्रेरणा ही वही किंवा श्रेष्ठ प्रतीची ह्मणतात, कारण कुराणांतील शब्द खुद्द देवाच्या तोंडचे आहेत. कुराणाची अव्वल प्रत स्वर्गांत असून गाब्रिएल नामक देवदूत तिच्यांतील थोडा थोडा भाग महमदास कळवीत गेला. गाब्रिएल दूत कुराण सांगता झाला. महमद तेंच बोलता झाला व त्यानंतर त्यानें तें आपल्या अनुयायांस जाहीर केलें.

[२] भाषेच्या संबंधानें गिब्बनचा हा अभिप्राय मोठ्या महत्त्वाचा आहे, कारण गिब्बन कांहीं लहानसान ग्रंथकार नाहीं.

हा दोषारोप कदाचित् फार कडक आहे असें कोणी ह्मणतील; परंतु यूरोपांतील कोणाही विद्वानास कुराणाचें फारसें आश्चर्य वाटत नाहीं. कुराणांतील बराच भाग बायबलांतून घेतलेला आहे; परंतु एकंदरीनें पहातां बायबल हें कुराणाहून अगदीं बालबोध, मनोवेधक व उदात्त आहे. कुराणांत खरें वाक्चातुर्य किंवा कवित्व नसून केवळ ओढून चंद्रबळ आणल्याप्रमाणें पोकळ पांडित्य आहे. जरी त्यांत मधून मधून चटकदार वाक्यें आहेत तरी त्याचा बहुतेक भाग अगदीं शुष्क व पुळपुळीत आहे[१]. कुराणाविषयीं या प्रकारचा अभिप्राय एकंदर सर्व यूरोपिअन विद्वानांचा असून मला वाटतें कीं सुशिक्षित हिंदु व पारशी लोकांचें देखील असेंच मत आहे.

आतां अरबी भाषेचें सौंदर्य, प्रभाव व स्वारस्य ह्यांची खुबी अरब लोकांशिवाय इतरांस मार्मिकपणानें कळणार नाहीं हें एक मोठें दुर्दैव आहे. सर्व अरब लोक तर कुराणाची भाषासरणी पाहून मोठ्या प्रेमानें माना डोलवितात. तथापि त्यांतल्यात्यांत विद्वान् मुसलमानांचे या संबंधानें आक्षेप आहेत. शिवाय, ज्या अरबी भाषेंत कुराण लिहिलेलें आहे ती भाषा हल्लीं प्रचारांतून नाहींशी झाल्यामुळें तिच्या गुणावगुणांचें परीक्षण करणें कठीण झालें आहे. कुराणाची गद्यात्मक रचना असून त्यांत प्रास व यमकें यांची रेलचेल करून सोडली आहे. ही तऱ्हा सिरियन ख्रिस्ती लोकांस एके काळीं फारच आवडत असे व तिचेंच अनुकरण महमदानें केलें असावें असें ह्मणतात; परंतु गद्यरचनेंत हा अनुप्रासाचा किंवा यमकाचा कवितेंतला प्रकार यूरोपांतल्या लोकांस पसंत नाहीं. तर या संबंधानें अरबी लोकांचें ह्मणणें खरें किंवा यूरोपियन लोकांचें ह्मणणें खरें, तसेंच हा प्रकार कुराणांत आहे ह्मणून तें अप्रतिम किंवा दोषार्ह आहे हें ठरविणें फारच कठीण आहे.

तथापि अरबी भाषेंतील सर्व ग्रंथांत कुराण हा ग्रंथ अप्रतिम आहे असें जरी मानलें तरी त्यावरून विशेष तें काय सिद्ध होणार? जगांतील सर्व भाषांतून एखादें तरी सर्व-मान्य असें पुस्तक असतेंच. ग्रीक भाषेंत होमरच्या तोडीचा कवी झाला नाहीं. मिल्टनची भाषाप्रौढी इंग्रजींत दुसऱ्या कवीस साधली नाहीं. संस्कृतांत कालिदासाचें काव्य व त्यांतील भाषासौंदर्य पाहून ती भाषा त्याचे घरीं पाणी भरीत होती असें ह्मणावें लागतें. यांवरून त्यांचे ग्रंथ ईश्वरदत्त आहेत असें मात्र ह्मणतां येणार नाहीं. तसेंच, महमद हा फार कुशाग्र बुद्धीचा असून त्याचे ठायीं वाक्चातुर्य इतकें उत्तम असे कीं लोकांचीं मनें आपल्याकडे ओढून घेण्यास त्याचा हातखंडा असे. परंतु या गुणांमुळें त्यास ईश्वरी प्रसाद असून तो पैगंबर होता असें मात्र सिद्ध होत नाहीं.

## अंतःप्रमाण.

वर जें आह्मीं महमदी धर्माचें विवेचन केलें तें "अंतःप्रमाण" या सदराखालींही येऊं

---

१ अरबी भाषाभिज्ञ प्रोफेसर नोलडेक ह्मणतात कीं महमद हा अरबी भाषेंत फारसा प्रवीण नव्हता.

शकेल. कुराण हा अप्रतिम ग्रंथ आहे हाच त्याजविषयीं कायमचा चमत्कार आहे असें मुसलमान लोकांचें मत असल्यामुळें त्याजविषयींचा ऊहापोह बाह्यप्रमाणदृष्ट्या आह्मीं केला. आतां खुद्द कुराणांत काय आहे याविषयीं विचार करूं.

कुराणांतले विरोध.

१. कुराणांत जे परस्पर उघड उघड विरोध आहेत त्यांविषयीं प्रतिकूळ मत होण्यास खातरीलायक कारण आहे. विद्वान् मुसलमान लोकांस कुराणाची ही स्थिति अवगत असल्यामुळें कुराणाचीं "दोन स्वरूपें" आहेत असें ते ह्मणतात. असें कां असें त्यांस विचारलें असतां ते ह्मणतात कीं देवानें प्रथम जे कायदे फरमावले त्यांपैकीं कांहीं पुढें रद्द करण्यांत आले. महमदाचें देखील तेंच ह्मणणें आहे. सुरा २ यांत ह्मटलें आहे तें असें:—"जें जें कलम आह्मी रद्द करूं किंवा तुला विसरावयास लावूं त्याऐवजीं त्याहून चांगलें किंवा तसेंच दुसरें कलम त्यांत नमूद करूं.[१] कुराणांतील पूर्व भागानें कधीं कधीं उत्तर भाग रद्द होतो असेंही विलक्षण मत कित्येकांचें आहे. उदाहरणार्थ, मद्य हें देवाच्या दयेची व शहाणपणाची देणगी आहे असें सुरा १६ यांत लिहिलें आहे तें असें:—"ताड वृक्षाचीं व द्राक्षीचीं फळें यांपासून तुह्मांस मादक व पौष्टिक दारू मिळते. ही जाणत्या लोकांकरितां एक खूणच आहे" परंतु सुरा २ यांत लिहिलें आहे तें असें:—दारू व जुगार यांविषयीं ते तुला विचारतील. दोहोंत पाप आहे व मनुष्याला कांहीं उपयोग आहे, परंतु उपयोगाहून पाप अधिक आहे असें उत्तर दे." तसेंच सुरा ५ यांत या प्रकारें ह्मटलें आहे: "खऱ्या भक्तांनो, खरोखर, दारू, जुगार, मूर्ति हीं सर्व अति निंद्य अशीं सैतानाचीं कामें आहेत." या ठिकाणीं पूर्व अध्याय उत्तर अध्यायांस रद्द करितात असें मानिलें आहे. एखादें विवक्षित कृत्य एके काळीं करण्यास सांगून लागलींच दुसरे वेळीं तें करण्याची मनाई ईश्वर करील हें संभवतें; परंतु एखादें आज खरें म्हणून फरमावून तेंच उद्यां खोटें ह्मणून ठरवील हें मात्र देवाच्या हातून होईलसें वाटत नाहीं.

कुराणांतील जे अध्याय मक्केंत लिहिले व जे मदिनेंत लिहिले त्यांत जें जमीन अस्मानाचें अंतर आहे तें सहज लक्ष्यांत येण्यासारखें आहे. मदिनेंतल्या अध्यायांत जास्त निर्दयपणा दिसून येतो.

अल जहेदी नामक विद्वान् गृहस्थ कुराणास शरीराची उपमा देऊन त्यापासून मनुष्य बनवितां येईल किंवा पशु बनवितां येईल असें ह्मणत असे.

२. जुना व नवा करार ईश्वरदत्त आहेत हें महमदास मान्य होतें व आपण स्थापि-

---

[१] सेल साहेबांच्या मतें अशीं रद्द केलेलीं कलमें निदान २२५हून तरी कमी नाहींत.

यहूदी व ख्रिस्ती लोकांस आपले पक्षास ओढून घेण्याकरितां महमदानें पहिल्यानें त्यांजविषयीं मोठ्या सामोपचारानें लिहिलें आहे. पण पुढें जेव्हां त्याची निराशा झाली तेव्हां तोच महमद अपशब्दावर आला.

कुराणाचा बायूबलाशीं विरोध.

लेल्या धर्मांची बायूबलाशीं पूर्णपणें एकवाक्यता आहे हें तो प्रतिपादन करीत असे.[१] तथापि वस्तुस्थिति अगदीं निराळी आहे. कुराण व बायूबल या दोहोंतील गोष्टी व उपदेश यांत परस्परविरोध इतका आहे कीं दोहोंचा मेळ घालणें अगदीं दुःसाध्य आहे. आतां कुराण व बायूबल हीं दोन्हीही खरीं असूं शकणार नाहींत. या दोन ग्रंथांतील परस्परविरोध पाहूं जातां असंख्य आहेत. त्यांतील कांहीं मासल्याकरितां खालीं देतों.

नोहाच्या पुत्रांपैकीं एक (टीकाकारांच्या मतें खनान) जलप्रलयांत बुडून मेला. (सुरा ११.) फारोच्या बायकोनें मोशाचा जीव वांचविला. (सुरा २८.) ज्या ठिकाणीं दोन समुद्रांचा संयोग झाला आहे त्या ठिकाणीं ऐंशीं वर्षांहून जास्त दिवस मोशे व यहोशवा प्रवासास गेले. (सुरा १७.) बायूबलांत असें मुळींच सांगितलेलें नाहीं. ईश्वराचें स्तोत्र गाण्यांत दाविदास पक्षी व पर्वत साथ करीत असत (सुरा २१.). वायु शलमोनाच्या अगदीं ताब्यांत होता. (कित्ता) शलमोनास त्याच्या गादीवरून हाकून लाविलें. (कित्ता) शलमोनाकरितां भुतांनीं इमारती बांधल्या; तसेंच, त्यांनीं पानबुड्यांचें काम केलें; तसेंच, कित्येकांच्या पायांत बेड्या असून ते शलमोनाकरितां खपत असत. (कित्ता) पक्ष्यांची व मुंग्यांची भाषा शलमोनास अवगत होती, व तीं त्याच्याशीं बोलत असत. (सुरा २२.) सुरा २७ यांत बिलकिसराणीची जी कथा सांगितली आहे तींत बराच गोंधळ करून सोडला आहे. ही कथा बायूबलांतील शबा राणीच्या कथेवरून घेतली असावी. हजारों मेलेले इस्राएल सजीव करण्यांत आले. (सुरा २.) एज्रा व त्याचें पाठाळ यांस मरून शंभर वर्षें झाल्यावर तीं पुनः सजीव करण्यांत आलीं. (कित्ता) ख्रिस्ताची आई मार्या ही इमरान (आमरान) याची मुलगी व अहरोनाची बहीण होती (सुरा १९.). येशूनें स्वर्गांतून एक चौरंग किंवा मेज खालीं आणविला. (सुरा ५.) हे वरील विरोध अल्प महत्त्वाचे असून मोठी तफावत आतां सांगतों; ती असी—महमद ह्मणतो कीं येशूला वधस्तंभावर चढविलें नसून तो न मरतां त्यास स्वर्गांत नेलें; (सुरा ४.) तसेंच, येशू हा देवाचा पुत्र नाहीं. (कित्ता)

आणखी, "अहो इस्राएलाच्या संतानांनो, माझ्यामागून कोणी एक अहमद नांवाचा प्रेषित येईल हें शुभवर्तमान मी तुम्हांस कळवितों," असें येशूनें ह्मटलें ह्मणून सुरा ६१ यांत महमदानें लिहिलें आहे तें सर्वथैव खोटें आहे. (अहमद व महमद धात्वर्थानें एकच आहेत.)

---

१ अलिकडले मुसलमान लोक यहूदी शास्त्र व ख्रिस्ती शास्त्र हीं बरींच दूषित झालेलीं आहेत असा गिल्ला करितात, तथापि हीं दोन्ही शुद्ध आहेत हें पूर्णपणें सिद्ध करितां येतें. मुसलमानांनीं हा खोटा दोषारोप केल्यानें आपल्या पक्षाचें गौणत्व मात्र व्यक्त केलें आहे. खुद्द कुराणाची तशी गोष्ट नाहीं. त्यांत बायूबलाविषयीं सर्व ठिकाणीं मोठ्या आदरानें लिहिलेलें आहे. बायूबलांतील तत्त्वें छपवून त्यांचा विपरीत अर्थ केला आहे अशा प्रकारचा कटाक्ष यहूदी व ख्रिस्ती लोकांवर कुराणाचा आहे, त्यांच्या धर्मग्रंथांवर नाहीं.

हे विरोध अत्यंत महत्त्वाचे आहेत. मनुष्यांच्या पापांकरितां ख्रिस्त मेला नाहीं असें जर ह्मटलें तर ख्रिस्ती धर्माचा पाया अगदीं ढांसळला व नव्या करारांत येथून तेथून खोट्या व घातक गोष्टी भरलेल्या आहेत असें ह्मणावें लागेल. बायबल खरें असल्याविषयीं ज्यांची खातरी झाली आहे ते महमदी धर्मास ईश्वरदत्त ह्मणून सहसा मानणार नाहींत.

३. महमद ह्मणून कोणी पैगंबर पुढें अवतरणार आहे असें भविष्यकथन बायबलांत मुळींच नसल्यामुळें महमदाच्या धर्मसंस्थापनेच्या अधिकारास मोठा धक्का बसतो. बायबलाच्या खरेपणाविषयीं महमदाची पूर्ण खातरी होती. महमद ह्मणतो त्याप्रमाणें जर तो मोठा पैगंबर होता तर अशा प्रख्यात पुरुषाच्या अवताराविषयीं बायबलांत भविष्य नसावें ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. जुन्या करारांत येशू ख्रिस्ताविषयीं असंख्य भविष्यें कथन केलेलीं आहेत. मग महमदास जर देवानें पाठविलें असें म्हणावें तर नव्या करारांत त्याजविषयींचीं भविष्यें मुळींच नसावींत हें कसें? महमद हें जाणून होता, व ह्मणूनच त्यानें बनावट भविष्य नव्या करारांत घुसडलें. वर दिलेल्या उताऱ्यांतील शेवटला उतारा ह्मणजे अहमदाच्या येण्याविषयींचा नव्या करारांत मुळींच नाहीं. त्या उताऱ्याशीं सदृश असें वाक्य फक्त योहान १४:१६ यांत आहे. या ठिकाणीं आपल्या शिष्यांस "पॅरॅक्लीटॉस" ह्मणजे सांत्वन करणारा पाठविण्याचें आश्वासन ख्रिस्ताचें आहे. या ठिकाणीं ग्रीक भाषेंतील "पॅरॅक्लीटॉस" शब्दाच्या जागीं "पेरिक्लिटॉस" हा शब्द योजिला तर त्याचा अर्थ **प्रख्यात** असा होतो व तोच अर्थ अहमद किंवा महमद या शब्दांचाही होऊं शकेल. पण या प्रकारें बनावट शब्द मूळांत घुसडून अर्थ फिरविल्यानें बायबलांतील भविष्य कोण्याही इसमास लागू पडण्याचा संभव आहे. परंतु "पॅरॅक्लीटॉस" ह्मणजे पवित्र आत्मा असा उघड अर्थ करून ख्रिस्तानें आपल्या शिष्यांस सांगितलें आहे ह्मणून संशयाला जागा बिलकुल रहात नाहीं. महमदाच्या शिष्यवर्गानें आपल्या गुरूविषयीं बायबलांतून अनेक भविष्यें शोधून काढलीं आहेत; परंतु त्यांनीं केलेला अर्थ अगदीं पोरकट आहे. उदाहरणार्थ, गीत ५०:२ महमदास कसें लागू केलें आहे तें पहा. या ठिकाणीं **परिपूर्ण शोभा** या शब्दांचा सिरियिक भाषेंत **प्रख्यात मुकुट** असा अर्थ होतो; व त्याचें अरबी भाषेंत भाषांतर केलें असतां **अक्लिला-महमूद** असें होतें ह्मणून हें गीत महमदास लागू करितात.[1]

तसेंच, अनुवाद ३३:२ हें वाक्य मोशे, ख्रिस्त व महमद यांस मुसलमान लोक लावतात.[2]

बायबलांत महमदाविषयीं भविष्यें मुळींच नाहींत.

---

[1] गीत ५०:२ यांत "परिपूर्ण शोभेचा" या अर्थाचे हीब्रू शब्द मिखलाल यॉफी असे आहेत; या शब्दांचें महमद या शब्दाशीं मुळींच सादृश्य नाहीं व यदाकदाचित् असतें तरी त्यापासून कांहींच निष्पन्न झालें नसतें.

[2] मुसलमान लोक ह्मणतात कीं सीनाय् डोंगरावरून मोशयानें नियमशास्त्र दिलें. सेईर डोंगर ख्रिस्ताच्या संबंधानें व पारान डोंगर महमदासंबंधानें या वाक्यांत सांगितला आहे. परंतु सेईर डोंगराशीं ख्रिस्ताचा व पारान डोंगराशीं महमदाचा बिलकुल संबंध नाहीं.

यांहून जास्त उतारे देण्याचें प्रयोजन नाहीं. यांशिवाय महमदाविषयीं जीं अवांतर भविष्यें मुसलमान लोक बायूबलांतून काढून दाखवितात तीं अशींच हातचलाखीचीं आहेत.

कुराणांत नवीन कांहीं नाहीं.

४. कुराणाला मोठा प्रतिकूळ पुरावा ह्मटला ह्मणजे त्यांत कांहीं नवीन तत्त्व प्रकाशित केलेलें नाहीं हा होय. साऱ्या ऐकलेल्याच गोष्टी त्यांत भरलेल्या आहेत व त्याही बहुतेक बायबलांतूनच घेतलेल्या आहेत. परंतु बायबलांतील देवत्र्यैक्यत्व व प्रायश्चित्त इत्यादि महान् तत्त्वें महमदानें वगळल्यानें बायबलाच्या मुख्य खऱ्या स्वरूपांत मोठा बिघाड करून टाकला आहे. कुराणाचा बहुतेक भाग यहूदी लोकांच्या दंतकथांवरून घेतलेला आहे. तसेंच, कुराणांत जे प्रस्तुत वेडेचार दृष्टोत्पत्तीस येतात ते महमदाच्या कल्पनेचे नसून त्यानें ते कित्येक पाखंडी ख्रिस्ती लोकांच्या दंतकथांवरून घेतले असावेत. कुराणांतील कांहीं भाग झोरोआस्ट्रिअन (पारशी) लोकांच्या मतांनीं व कांहीं भाग मूर्तिपूजक अरबांच्या मतांनीं भरलेला आहे. एकंदरीनें पहातां, कुराणांत अथपासून इतीपर्यंत परक्यांचें अनुकरण केलेलें आहे, स्वयंभू ह्मणून कांहींच नाहीं.[1]

कुराणाचा ज्योतिषादि शास्त्रें व तत्त्वज्ञान यांशीं विरोध.

५. ज्योतिषादि शास्त्रें, तत्त्वज्ञान व सारासार विचार या सर्वांशीं न जुळणाऱ्या अशा अनेक गोष्टी कुराणांत आहेत. त्यांतील कांहीं मासल्याकरितां सांगतोः—(१). सूर्य मावळतांना काळ्या चिखलांत जातो (सुरा १८). या गोष्टीचा शोध धुलकरनैन[2] (ह्मणजे कित्येकांच्या मतें शिकंदर बादशहा) यास लागला व तो सूर्य उगवतो त्या ठिकाणीं गेला. या गोष्टी पृथ्वी वर्तुलाकार आहे व तिला गति आहे या मतांच्या अगदीं विरुद्ध आहेत. उल्कापाताची उपपत्ति या प्रकारें सांगितली आहे. भुतें

---

[1] डॉक्टर स्प्रेंगर साहेब ह्मणतात कीं अरबस्तानांत यहूदी व ख्रिस्ती लोकांची वस्ती बरीच मोठी होती हेंच ईश्वरी स्वरूपाचें खरें ज्ञान त्या लोकांत पसरण्यास मुख्य कारण झालें. महमद तरुण असतांना त्याची व नजराणचा बिशप कॉस व ओम्मया आदीकरून प्रसिद्ध पुरुषांची गांठ पडली. यांनीं त्याच्या मनांत देव एक आहे हें तत्त्व चांगलें बिंबविलें, व अशा थोर पुरुषांच्या सहवासानें त्याच्या मनावर उत्तम संस्कार झाला. तथापि "इसलामी धर्माचा उत्पादक महमद नव्हे तर यच्चयावत् तत्कालीन अरब लोकांची धर्म सुधारण्याची प्रवृत्ति होय असें स्प्रेंगर साहेब ह्मणून रहातात इतकेंच नाहीं, तर कुराणांत जितकें ह्मणून अति निंद्य आहे तें सर्व महमदाच्या दुर्वर्तनाचें व दुष्ट बुद्धीचें फल होय" असा फटका तो महमदास मारल्यावांचून रहात नाहीं. परिशिष्ट ८ पाहावें.

[2] धुलकरनैनची ही सर्व आख्यायिका इतिहासाशीं मुळींच जुळत नाहीं. सर्व मुसलमान लोक त्यास शिकंदर ह्मणून समजतात, पण त्याजविषयींच्या कोणत्याच गोष्टी शिकंदराशीं बिलकुल जुळत नाहींत. तर मग हा होता तरी कोण? साऱ्या इतिहासांत अशा पुरुषाचा उल्लेख कोठेंही नाहीं.

चोरून स्वर्गांतील गोष्टींचा कानवसा घेतात ह्मणून त्यांजवर केलेला जो ज्वालांचा वर्षाव तो उल्कापात होय. आकाशांतले बुरूज (ह्मणजे कित्येकांच्या मतें राशिचक्र) यांचें भुतांपासून संरक्षण व्हावें ह्मणून त्यांवर दगडांचा वर्षाव होत असतो (सुरा १५). पृथ्वी अचल आहे, व ती स्थिर रहावी ह्मणून तिजवर पर्वत टाकून दिलेले आहेत. (सुरा १६, ३१). मिसर देशाच्या सुपीकतेला पर्जन्य कारण असून नील नदीच्या पुराशीं तिचा मुळींच संबंध नाहीं. (सुरा १२). (२). दैव किंवा नशीब असल्याविषयीं महमद पूर्ण खातरीनें सांगतो.

कुराणांत नशिबाचे संबंधानें जें लिहिलें आहे त्याविषयीं सेल साहेब या प्रकारें ह्मणतात :

"मुसलमान लोकांस जीं विश्वासप्रकरणें कुराणांत सांगितलेलीं आहेत त्यांतील सहावें मुख्य कलम असें आहे कीं बऱ्या वाइटाची पूर्वयोजना परमेश्वरानें करून ठेविली असून ती कधीं ह्मणून बदलणार नाहीं. जें कांहीं या जगांत प्रस्तुत काळीं आहे किंवा पुढें होईल, मग तें चांगलें असो वा वाईट असो, तें सर्व ईश्वरेच्छानुरूप घडतें; तें कधीं बदलणार नाहीं व तें देवानें अनादिकालापासून आपल्या दप्तरीं नोंदून पक्कें केलें आहे. हर एक व्यक्तिमात्राच्या बारीक सारीक सर्व गोष्टींत, त्याचें बरें किंवा वाईट होणें या सर्वांची पूर्वयोजना गुप्तपणें परमेश्वरानें आधींच करून ठेविली आहे इतकेंच नाहीं तर त्याचें इमान किंवा बेइमान, आज्ञापालन किंवा उल्लंघन, व त्यामुळें मरणोत्तर सदैव सुख किंवा दुःख हें सर्व आधींच ठरवून टाकिलें आहे; ही दैवाची किंवा पूर्वयोजनेची व्यवस्था कोणासही आपल्या दूरदृष्टीनें किंवा ज्ञानानें बदलतां येणार नाहीं; असा हा शास्त्रसम्मत सिद्धांत आहे. आपले इष्ट हेतु सिद्धीस नेण्याकरितां महमदानें या सिद्धांताचा कुराणांत बराच उपयोग केल्यानें धर्मप्रसारार्थ जिवावर उदार होऊन न भितां लढण्याचें प्रोत्साहन त्याच्या शिष्यांस प्राप्त झालें."

नशिबावर हवाला टाकणें हें तात्त्विकदृष्ट्या खोटें असून त्यामुळें व्यवहारांत अनर्थकारक परिणाम घडतात, व त्यामुळेंच सर्व पापाचरणाचें प्रत्यक्ष कारण ईश्वरेच्छा होऊन बसते. यांतील खरें तत्त्व हें आहे कीं परमेश्वराला कोणतीही गोष्ट आगाऊ कळते आणि त्यामुळें तिचें निराकरण तो करतो.

(३). अनेक बायका करण्याची परवानगी जी कुराणांत आहे तिजमुळें त्या ग्रंथास मोठा बाध येतो. ही सर्वांशीं घातुक चाल अगदीं त्याज्य आहे असें अनुभवांतीं बुद्धिमानांनीं ठरविलें आहे. अनेक बायका केल्यानें मनुष्य नीतिभ्रष्ट होतो इतकेंच नाहीं तर सुधारणेंत त्याची प्रगति होणेंही शक्य नाहीं. असें असूनही कुराणांत एके वेळीं एकदम चार बायका करण्याची मुभा आहे व त्यांचा घटस्फोट नवऱ्यानें मर्जीस येईल तेव्हां केल्यास व दुसऱ्या बायका त्यांऐवजीं घेतल्यास चालेल असें सांगितलें आहे. यांशिवाय वाटेल तितक्या वेश्या कोणीं ठेवल्यास त्यास कुराणाची कांहीं हरकत नाहीं.[1]

[1] महमदाचा नातू हसन यानें कमींत कमी सत्तर बायकांचा घटस्फोट केला.

(४). स्त्रियांस कसें वागवावें याविषयीं कुराणांत जें कांहीं सांगितलें आहे तें फारच निंद्य आहे. खरोखर महमदी धर्मांत स्त्रियांशीं जो हरएक प्रकारचा व्यवहार सांगितला आहे तो हिंदु धर्म किंवा पारशी धर्म यांतील व्यवहाराहून फारच कनिष्ठ आहे. अनेक बायका करण्याची मोकळीक महमदी धर्मानें दिल्यामुळें तद्धर्मी लोकांत वेश्यांचा व्यवहार व घटस्फोट करण्यास पूर्ण स्वातंत्र्य मिळालें; तेणेंकरून त्यांच्यांत विषयासक्ति फारच प्रदीप्त झाली. त्या योगानें स्त्रियांची खरी योग्यता व फार महत्त्वाची अशी जी कुटुंबव्यवस्था तिचें मुसलमानांत मातेरें झालें आहे. शिवाय, स्त्रियांस समाजांत येण्याची मनाई केल्यामुळें त्यांच्या सहवासानें पुरुषांवर जे इष्ट परिणाम घडावयाचे त्यांस मुसलमान लोक मुकले. ह्मणूनच त्यांच्यांत उद्दामपण व दुर्वर्तन यांचा संचार झाला. अरबस्तानांत महमदाचे पूर्वी स्त्रियांची प्रतिष्ठा जास्त होती. ती सर्व त्यानें घालविली. म्यूर साहेब ह्मणतात, "स्त्रिया चारचौघांत येण्याचें बंद पडलें व प्रसंगानुसार त्या जर आल्या तर त्यांस बुरखा घेऊन तेथून पलायन करणें भाग पडे. स्त्रिया समाजांत असल्या ह्मणजे त्या समाजास जी एक प्रकारची शोभा, सौंदर्य व सौजन्य हीं प्राप्त होतात त्या सर्वांस अरब लोक मुकले."

दासीची स्थिति तर विचारूंच नका. त्या बिचारीला कोणत्याही प्रकारचा हक्क महमदानें ठेवला नाहीं.

६. कुराणांत लोकांचा छल करण्याचें जें तत्त्व आहे त्यावरून तो ग्रंथ ईश्वरप्रणीत नाहीं असा सबळ पुरावा मिळतो. कुराणाची भाषा फार उग्र व दांडगाईची आहे. हा प्रकार विशेषतः उत्तर भागांत चांगला दिसून येतो. "जे कोणी आमचे चमत्कार खोटे मानतील त्यांस आह्मी खचीत नरकाग्नींत होरपळण्याकरितां टाकून देऊं. त्यांची चामडी भाजून गेल्यावर त्यांस अधिक पीडा व्हावी ह्मणून त्यांस आह्मी नवी चामडी देऊं." सुरा ४. अशीं भयंकर वाक्यें कुराणांत अनेक ठिकाणीं आहेत.

कुराणाचें उग्र स्वरूप.

कुराणांत नरकाचें जें वर्णन आहे तें भयंकर तर आहेच, परंतु त्यांत बऱ्याच अकटोविकट गोष्टी असल्यामुळें तें वर्णन अतिशय कंटाळवाणें झालें आहे. यावरून चिरकाल नरकवासाचीं दुःखें वर्णन करण्यांत महमदास फार आनंद व मौज वाटते हें जरी उघड आहे, तरी ही फार दुःखाची गोष्ट आहे. आपला शत्रु नरकांत पडून त्यास जों जों तेथील यातना जास्त होतात तों तों तें पाहून महमदास आनंदाचें भरतें येतें व आपण शत्रूवर जय मिळविला असें वाटूं लागतें.

थोर मनाचे पुरुष जे असतात त्यांस शत्रूंची दैना पाहून दया यावी व त्यांचें अंतःकरण सद्गदित व्हावें तसा कांहीं प्रकार महमदाचे ठिकाणीं नव्हता. ख्रिस्ताचे वर्तनांत याहून किती महदंतर! त्याच्या शत्रूंनीं जेव्हां त्यास वधस्तंभावर चढविलें तेव्हां ती अघोर यातना तो सोशीत असतां त्यानें आपले शत्रूंकरितां या प्रकारें प्रार्थना केली: "हे

बापा, त्यांस क्षमा कर, कारण ते काय करीत आहेत हें त्यांस समजत नाहीं." लूक २३ : ३४.

तरवारीच्या जोरावर महमदानें आपल्या धर्माचा फैलाव केला व हें त्यानें निःशंकपणें कबूल केलें आहे. महमदाचा युद्धसंग्राम सर्व शारीरिक बळावर होता. सुरा २२ यांत असें लिहिलें आहे : " देवाच्या खऱ्या धर्माप्रीत्यर्थ लढा, कारण तसें करणें तुह्मांस योग्य आहे." असे उद्गार कुराणांत अनेक ठिकाणीं आहेत. महमदानें एकंदर सत्तावीस स्वाऱ्या केल्या व अठ्ठेचाळीस लहानसहान लढाया मारल्या असें अबूल फेदा ह्मणतो.

परधर्मी लोकांविषयीं मुसलमानांत जी क्रूरता दिसून येते तीस महमदाचा उपदेश व त्याचें तदनुसार वर्तन हीं कारणभूत झालीं आहेत. कुराणावर जों जों जास्त विश्वास त्या मानानें हा द्वेषभाव कमजास्त दिसून येतो.[१] ज्या ज्या लोकांस मुसलमानांनीं जिंकिलें त्यांच्याशीं यांचें वर्तन नेहमीं अन्यायाचें व क्रूरतेचें असून प्रसंगविशेषीं अगदीं पशुवत्ही झाल्याचें आपण पहातों. आफ्रिकेंतील लोकांस गुलाम करून जो कहर झाला तो सर्वश्रुत आहेच. या अघोर कृत्यांत शिरोमणि काय ते मुसलमानी अरब लोक होते.

जीं जीं अनन्वित कर्में आम्ही करतों त्यांस आमच्या धर्मानें पूर्ण मोकळीक दिली आहे असें ते मानितात.

७. कुराणांतील मतांत न्यूनाधिक्य बरेंच असून त्यांतील अनेक मुद्दे चुकीचे आहेत.

**कुराणांतील मतें निर्दोष नाहींत.**

परमेश्वराचें खरें स्वरूप कुराणांत प्रगट केलेलें नाहीं; तसेंच, परमेश्वर किती पवित्र आहे याचा उलगडा त्यांत केलेला नाहीं व परमेश्वराच्या प्रीतीचें लक्षण त्यांत दिसून येत नाहीं. कुराणाच्या समजुतीनें जे खरे भक्त आहेत त्यांशीं देखील देव मित्रभावानें वागत नाहीं. कुराणांतील देव एखाद्या जुलमी राजाप्रमाणें असून तो सर्वशक्तिमान् असल्यामुळें या विश्वांतील सर्व लोकांस गुलामाप्रमाणें वागवितो.

पापाचें खरें ह्मणजे अति घोर स्वरूप व त्यामुळें मनुष्यमात्र किती भ्रष्ट झाला आहे याचें सविस्तर वर्णन कुराणांत नाहीं.

पापासाठीं प्रायश्चित्ताचें अगत्य आहे हें मत कुराणास मान्य नाहीं. अर्थात् पापाबद्दल प्रायश्चित्त असणें ही गोष्ट मनुष्याच्या तर्कानें बसविलेली नसल्यामुळें ती कुराणांतून वगळलेली आहे यांत नवल नाहीं. अंतःशुद्धीविषयीं पहावें तों कुराणास तिची फारशी जरुरी दिसत नसून तीसंबंधानें जें कांहीं सांगितलें आहे तें तसेंच सदोष आहे. परंतु ज्ञानानें संस्कृत झालेली आमची बुद्धि आह्मांस असें सांगते कीं अंतःशुद्धि झाल्याशिवाय परमे-

---

[१] इ० स० ६३६ या सालीं कडेशिआची लढाई झाली तींत इराणी लोकांचा अगदीं पराभव करून त्यानंतर मुसलमानांनीं जीं क्रूर कर्में केलीं त्यांविषयीं सर विलियम म्यूर या प्रकारें लिहितात: "महमदी धर्मानें दयेला फांटा दिला व अघोर कृत्य करण्याचें बायकांमुलांस देखील शिकविलें."

श्वराची योग्य सेवा आमचे हातून घडणार नाहीं व आह्मी खरे सुखीही होणार नाहीं. हें आदितत्त्व महमदास बिलकुल अवगत नव्हतें असें दिसतें.

देवावर व मनुष्यमात्रावर प्रेम याचा बराच गोंधळ कुराणांत केलेला आहे. ज्याप्रमाणें आत्म्याशिवाय शरीर त्याप्रमाणें प्रेमाशिवाय धर्म व्यर्थ आहे. कुराणांत देवाच्या ठायीं जे गुण सांगितलेले आहेत त्यांवरून मनुष्याच्या मनांत त्याजविषयीं प्रेमभाव उत्पन्न होत नसून त्यास देवापुढें नम्र होणें केवळ त्याच्या दहशतीनें प्राप्त होतें.

परोपकारबुद्धि व तदनुसार आचरण हीं कुराणांत उपदेशिलेलीं नाहींत व त्याची कल्पना देखील कुराणांत नाहीं.

महमदाचें दुर्वर्तन.

८. महमद देवाचा पेगंबर नव्हता अशाविषयीं सबळ पुरावा शोधण्यास फार लांब जाणें नको. खुद्द त्याचें वर्तन याविषयीं मजबूत पुरावा आहे. महमदाइतका बुद्धिमान् पुरुष सांपडणें कठीण, तसेंच त्याच्याइतका नीतिभ्रष्ट सांपडणेंही दुर्मिळ. इशमाएल इब्न अली नामक मुसलमान ग्रंथकार ह्मणतो कीं महमद स्त्रियांचा व सुगंधि पदार्थांचा फार शोकी होता असें त्यानें होऊन कबूल केलें आहे. उतार वयांत तो स्त्रीलंपट होऊन अखेरपर्यंत तो तसाच राहिला. त्यानें एकंदर पंधरा बायका केल्या, त्यांपैकीं त्याचे मरणसमयीं नऊ जीवंत होत्या.[१] महमद फार संशयखोर असे. अरब लोक बोलून चालून खुनशी, परंतु महमदाची त्यांच्यावर कडी होती. कारण तो अतिक्रूर व दीर्घद्वेषी असे. कुराणांत अनेक ठिकाणीं फार क्रूर उपदेश सांगितला आहे असें इतिहासकार गिबन यानें जें लिहून ठेविलें आहे त्याशीं अनुरूपच महमदाचें वर्तन होतें.[२]

---

[१] यांशिवाय महमदाच्या दोन वेश्या होत्या असें अबुल फेदा ह्मणतो.

[२] सगळ्या कुराणांत ख्रिस्ताला ह्मणून दोष ठेविल्याचें आढळून येत नाहीं, ही विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. महमदी धर्मास जे पैगंबर मान्य आहेत त्या सर्वांत फक्त येशूच निष्पाप होय. खुद्द महमदानेंही पाप केलें असें कुराणांत लिहिलें आहे. (सुरा ४०: १७ व ४७: २१.)

स्प्रेंगर साहेबांनीं पुष्कळ परिश्रम करून जो शोध काढला आहे त्यांत महमदास अनुलक्षून जें वर्णन आहे तें या ठिकाणीं सादर करणें इष्ट दिसतें :

“ महमदाची वृत्ति नेहमीं खिन्न असून तो फारच भित्रा असे. तो इतका देवभोळा होता कीं दुष्ट स्वप्न पडल्यास त्यापासून आपल्यास कांहीं बाधा न व्हावी ह्मणून तो डाव्या खांद्याकडे तोंड करून तीन वेळां थुंकत असे. तो कवि होता व त्याची कल्पनाशक्ति देखील फारच तरतरीत होती. व्यवसाय, हिम्मत, दृढनिश्चय, दीर्घोद्योग हे गुण त्याच्यांत चांगले वसत होते. तसाच तो मोठा धूर्त होता. परंतु ज्या गुणानें तो विशेष प्रसिद्धीस आला तो गुण ह्मटला ह्मणजे त्याचा धर्मोन्माद होय. त्यायोगें त्याच्या हातून फारच अनन्वित कर्में घडलीं.”

जर महमद पैगंबर नव्हता तर त्यास धर्मवेडानें ग्रासलें असावें किंवा तो महाठक असावा अशी त्याजविषयीं शंका उद्भवते. हे दोन्हीही[1] गुण त्याच्या ठिकाणीं असूं शकतील. त्याची कल्पनाशक्ति फारच तीव्र असून तो गर्विष्ठ व स्वार्थपरायण होता. या दोन्ही गुणांचें सम्मेलन त्याचे ठायीं परमावधीचें होतें. लोकांस ठकविण्याचा हेतु धरून महमदानें आपला विभु रचण्यास आरंभ केला असें म्हणतां येणार नाहीं. कारण अरब लोकांतील मूर्तिपूजेचा उच्छेद करावा हा त्याचा काय तो मूळचा संकल्प व म्हणूनच गेब्रिएल दूतानें आपल्यास दर्शन दिलें असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें होतें. परंतु त्यानंतर ईश्वरी प्रेरणेचे ह्मणून जे जे प्रकार झाले त्यांत त्याची जाणूनबुजून लबाडी होती असें म्हटल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं. कारण इष्ट हेतु सिद्धीस नेण्याकरितां हवी ती योजना केल्यास दोष नाहीं अशी त्याची समजूत असावीसें वाटतें. लवकरच त्याची मोठेपणा मिळविण्याची हौस अनिवार होऊन उत्तरोत्तर त्याच्या गुणांचा ऱ्हास होत चालला.[2] मक्केंत असतां महमद जितका नीतिमान् व पापभीरु होता तितका तो मदिना एथें गेल्यावर राहिला नाहीं.

महमदी धर्मांतील विरोध.

९. महमदी धर्माचें खरें स्वरूप मोठ्या प्रौढ भाषेनें एका विचारी ग्रंथकारानें लिहून ठेविलेलें आहे तें असें: "या धर्मांत पैगंबर सांगितलेला असून त्याच्या हातून अद्भुत कर्में घडलेलीं नाहींत. तसेंच, ह्यांत धर्मगौप्य ह्मणून कांहीं नाहीं; व ह्यांत नीतिबोध आहे खरा, तथापि त्यांत प्रेमलक्षण मुळींच नाहीं. अशी या धर्माची स्थिति असल्यामुळें तद्धर्मी लोकांस रक्तपात करण्याची हौस व विषयवासना यांनीं सर्वस्वीं घेरलें." अलीकडे महमदास तारणारा ह्मणून मानूं लागले आहेत, पण या समजुतीस कुराणाचा आधार बिलकुल नाहीं. परंतु त्यास तारणारा जर ह्मणावें तर प्रायश्चित्तावांचून तो तारणारा कसा होऊं शकेल? मनुष्य पतित झाला आहे हें खरें तथापि ईश्वरासन्निध उभें रहाण्याची योग्यता त्याच्यांत आहे ह्मणून ज्या धर्मानें त्याचें पापविमोचन होऊन तो शुद्ध व आशीर्वादित होईल अशा धर्माचें अगत्य त्यास आहे. पण महमदी धर्म तसा नाहीं हें फार दुःखानें ह्मणावें लागतें.

---

[1] लॉर्ड बेकन ह्मणतो, "ज्यांचा ठकबाजीचा व्यवसाय असतो ते बहुशः स्वतःसच फसवितात. कालेंकरून त्यांस आपला खोटेपणा खरा भासूं लागतो."

[2] तथापि महमदाला एक प्रकारचा विकार होता हें विसरतां कामा नये. स्प्रेंगर साहेब ह्मणतात कीं "महमद कांहीं वेळपर्यंत शुद्ध वेडा झाला होता व तो वेडाच्या लहरींत बराच वेळपर्यंत तटस्थ बसत असे. हें वेड गेल्यावर त्यानें मी पैगंबर आहें असें चहूंकडे जाहीर केलें. होतां होतां हें वेड धुन्यावर गेलें." म्यूर साहेब ह्मणतात कीं "त्याचा पुष्कळ वेळां आत्महत्या करण्याचा मानस होता." महमदास वेड लागलें होतें ह्मणून त्याजवरील ठकबाजीचा दोषारोप शाबीत होत नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे.

हा धर्म सुधारणेस प्रतिकूल आहे.

१०. मुसलमानी धर्माची सुधारणेस मोठी आडकाठी आहे. ख्रिस्ती धर्माची गोष्ट तशी नाहीं. त्या धर्माची पूर्ण अनुकूलता, सुधारणा व खरें ज्ञान यांची प्रगति होण्याकडे आहे. (पत्र आठवें पहावें.) मुसलमानी धर्माची गोष्ट तशी नाहीं. त्या धर्मानें सुधारणेची वाढ खुंटवली आहे; ह्मणजे इ० स० सातवे शतकांत अरब लोकांत जी सुधारणा झाली ती झाली, त्यापुढें कांहीं नाहीं; ह्मणून कुराणांतील सुधारणेची मजल तेथपर्यंतच येऊन भिडली आहे. त्याहून पुढें मुसलमान लोकांस जाणें शक्यच नाहीं. ही इयत्ता ठरल्यामुळें रानटी लोकांनीं मुसलमानी धर्म स्वीकारल्यास तेथपर्यंत त्यांची मजल येऊन पोहोंचते. त्याच्यापुढें त्यांची गति होण्यास मार्गच नाहीं. कित्येक ग्रंथकार महमदी धर्माची सुधारणा होणें शक्य आहे अशी कल्पना करितात, पण त्यांच्या लक्ष्यांत हें येत नाहीं कीं इसलामी धर्माची सुधारणा केल्यास त्या धर्माचें मूळचें स्वरूप मुळींच रहाणार नाहीं. हज्ज (मक्केची यात्रा), अनेक बायका करण्याची चाल, अमर्याद वेश्यागमन, मर्जीस वाटेल तेव्हां घटस्फोट, गुलामगिरी इत्यादि दुराचारांस दोष देणें ह्मणजे कुराणास दोष देणें प्राप्त होईल हें त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं असें सर विलियम म्यूर साहेब ह्मणतात.

तसेंच, कुराणाचें विशेष लक्षण असें आहे कीं त्यास धर्मभेद मुळींच खपत नाहीं. विचारस्वातंत्र्यास त्या धर्मानें इतकें हद्दपार केलें आहे कीं जर करितां कोणी तो धर्म सोडून परधर्मी होईल तर त्यास देहांत शिक्षा सांगितली आहे.

महमदी धर्मावलंबी राष्ट्रांची स्थिति.

११. खुद्द ख्रिस्ताचें वर्तन ख्रिस्ती धर्माच्या खरेपणाचें प्रमाण आहे म्हणून नेहमीं सांगण्यांत येतें. पण याशिवाय त्या धर्माच्या खरेपणाचा दुसरा पुरावा ख्रिस्ती राष्ट्रांच्या प्रस्तुत स्थितीनेंही दाखविण्यांत येतो. या दुसऱ्या पुराव्याविरुद्ध कधीं कधीं असा आक्षेप आणतात कीं ख्रिस्ती राष्ट्रें देखील चांगलीं नाहींत. त्यांच्यांत दुराचार नाहीं काय? यास उत्तर असें आहे कीं ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें ख्रिस्ती ह्मणविणाऱ्या राष्ट्रांस पूर्णपणें समजलीं नसल्यामुळें त्यांचे वर्तनांत बराच कमीपणा दिसून येतो. तथापि एकंदरीनें पहातां हरएक व्यवहारांत इतर राष्ट्रांवर त्यांची सरशी आहे. इकडे मुसलमानी राष्ट्रांची स्थिति अवलोकन करितां कुराणाची लागलींच परीक्षा होते. पालग्रेव नांवाच्या ग्रंथकारानें अरबस्तानांत बराच प्रवास करून चांगला लौकिक मिळविला आहे. तो असें ह्मणतो कीं "जेव्हां अरबस्तानांतून कुराण व मक्का यांचा मागमूस नाहींसा होईल तेव्हांच महमद व कुराण यांच्या योगानें मागसलेले अरब लोक ऊर्जित दशा पावतील." आतां आपण हंगेरियन व तुर्की लोक यांची एकमेकांशीं तुलना करून पाहूं—तुर्की लोक मुसलमान धर्मानुयायी व हंगेरिअन ख्रिस्ती धर्मानुयायी—दोघेही एकाच ह्मणजे तुरेनियन वंशांतले असूनही धर्मानें त्यांच्यांत किती महदंतर करून टाकिलें आहे! इसलामी लोकांच्या जुलमी अमला-

मुळें पुष्कळ सुपीक प्रांतांची धूळधाण होऊन गेली आहे. या गोष्टीचा प्रत्यय पहाणें असल्यास इराण, एशिआ मायनर, सिरिया, आफ्रिकेचा उत्तरभाग इत्यादि प्रांतांची पूर्वस्थिति व मुसलमानी अंमलानंतरची स्थिति पाहिली असतां खातरी होईल. हें आमचें ह्मणणें कित्येकांस पसंत नसून ते खलिफांचे कारकीर्दींतील बगदाद शहरचें वैभव व स्पेन देशांतील मूर लोकांचे पराक्रम या गोष्टी आमच्या नजरेस आणून आमचे डोळे दिपवूं पहातात, परंतु त्यांनीं इतिहासांतील खऱ्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य केलें असें ह्मणणें प्राप्त होतें. मुसलमान लोकांत शास्त्रीय ज्ञान व ग्रंथसंग्रह जो कांहीं आहे तो कुराणास न जुमानतां केलेला आहे.[1] बगदादच्या दरबारांत जे जे ह्मणून नामांकित पुरुष होते ते सर्व खिस्ती, यहूदी, किंवा पारशी होते व स्पेन देशांतील मूर लोकांच्या कारकीर्दींतील विश्वविद्यालय जें कारडोवा एथें स्थापन झालें होतें त्यांतील मोठमोठे अध्यापक खिस्ती व यहूदीच होते. तसेंच, बगदाद एथें जेव्हां सुधारणेचा कळस झाला त्या वेळीं कुराणास कोणीही मानीत नव्हतें.

महमद व त्याचें कुराण हीं दोन्हीही सन्मानास पात्र नसून त्यांस ईश्वरी प्रेरणा होती हें सर्व निराधार आहे असें या पत्रांत जें विवेचन केलें आहे त्याहून विशेष लिहिण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. प्रस्तुत काळीं जो महमदी धर्म चालू आहे त्याजविषयीं चर्चा करण्याचें आह्मांस कारण नाहीं. महमदानें प्रथम जो मूळ धर्म स्थापन केला त्यांत जी पोरकट दंतकथांची व प्रचारांची भेसळ केली आहे तिच्या योगें अगदीं अज्ञानी लोक फसण्याचा संभव आहे; तथापि ज्यांच्याकरितां हें पुस्तक करण्याचा संकल्प केला आहे असे जे हिंदुस्थानांतील तरुण सुशिक्षित लोक त्यांस महमदी धर्माची ही स्थिति पाहून सखेदाश्चर्य वाटल्यावांचून रहाणार नाहीं. मुसलमान लोकांच्या दंतकथांचा मासला दाखविण्याकरितां महमदाच्या सुप्रसिद्ध रात्रीच्या प्रवासाची हकीकत या ठिकाणीं देण्याचा आमचा विचार होता; परंतु अशा वेडगळ गोष्टींची हकीकत देऊन वेळेचा अपव्यय करणें मनास प्रशस्त वाटेना. कारण त्या गोष्टींत मूर्खपणा आहे इतकेंच नाहीं तर खुद्द परमेश्वरास बट्टा लागण्याचा प्रकार आहे.

ज्या राष्ट्रांतील लोकांचा विश्वास आजपर्यंत मक्केच्या महमदावर होता तो सर्व विगलित होऊन त्यांस नाजोरी येशूकडे वळण्याचा सुदीन लवकर प्राप्त होवो. कारण तोच सन्मार्ग दाखविणारा भविष्यवादी आहे. इतकेंच नाहीं तर त्यांच्या पापाकरितां प्रायश्चित्त

---

[1] वास्तविक पहातां अरबी लोकांनीं शास्त्रीय शोध केल्याचें ऐकिवांत नाहीं. मुसलमान लोकांत जीं शास्त्रें व तत्त्वविचार प्रचलित होते ते बहुतेक ग्रीक, सिरिअन, यहूदी व इराणी लोकांपासून घेतलेले असावेत. कारण त्यांत अरब लोकांच्या कल्पना व खुबी मुळींच दिसून येत नाहीं. (G. H. Lewes' History of Philosophy, vol. ii pp 34, 36.)

करणारा व त्यांच्याकरितां निरंतर मध्यस्थी करणारा धर्मगुरु तोच आहे. तसेंच, त्यांचें संरक्षण करणारा व त्यांच्यावर राज्य करणारा तो राजा आहे. महमदाच्या राज्या-सारिखें त्याचें राज्य नाहीं, कारण तें इहलोकचें नसून परलोकचें आहे, व तो विजयश्री मिळविण्याकरितां त्यांस बोलावीत आहे. ही विजयश्री कशावर ह्मणाल तर अंतःकरणांतील इहलोकचीं पापें व दुःखें यांवरील होय. या सर्वांचें निराकरण करणारा त्यावांचून अन्य कोणी नाहीं.[१]

**आपला मित्र—.**



[१] परिशिष्ट ८ पहा.

# पत्र पंधरावें.

## हल्लींचे इतर प्रचलित धर्म.

बौद्धधर्म—जैन धर्म—कबीरपंथ—सीख धर्म—पारशी लोकांचा धर्म—चिनी धर्म.

**प्रिय मित्र—,**

जे मुख्य मुख्य धर्म हल्लीं लुप्त झालेले आहेत त्यांविषयींचें निरूपण यापूर्वी ११व्या पत्रांत केलेंच आहे. एके कालीं त्या धर्मांचें प्राबल्य फार असून हल्लीं ते लयास गेले आहेत व त्यांच्या पुनरुज्जीवनाची आशाच उरली नाहीं. त्यांच्या ठिकाणीं हल्लीं ख्रिस्ती धर्म स्थानापन्न होऊन त्यांच्यांत जो कांहीं सत्यांश होता तो सर्व ख्रिस्ती धर्मांत आलेला आहे. तथापि या सत्यांशास गुरफटून असलेले जे अनेक दोष त्यांत होते ते चट सारे नष्ट झाले आहेत. प्राचीन काळीं डेल्फी आदीकरून क्षेत्रांचें मोठें प्रस्थ माजलें होतें, परंतु त्यांस सांप्रत काळीं कोणी विचारीतही नाहीं.

आतां दुसरे प्रचलित धर्मांविषयीं विचार कर्तव्य आहे तथापि हिंदु किंवा मुसलमानी धर्मांप्रमाणें त्या धर्मांचें सूक्ष्म रीतीनें विवेचन करण्याचें कारण दिसत नाहीं. हीं पत्रें मुख्यत्वेंकरून हिंदु व मुसलमान लोकांकरितां लिहिलीं आहेत. ह्मणून या पत्राच्या शिरोभागीं सांगितलेल्या धर्मांविषयीं लांबलचक विवरण केल्यास त्यांस तें रुचणार नाहीं व फायदेशीरही होणार नाहीं. पारशी लोकांस आह्मीं विसरतां कामा नये. मुंबई इलाख्यांत त्यांची वस्ती बरीच असून हरएक गोष्टींत त्यांचें पाऊल बरेंच पुढें आहे. यास्तव त्यांच्या धर्मांविषयीं दोन शब्द लिहिणें जरूर आहे.

### बौद्ध धर्म.

बौद्ध धर्मी लोक फार आहेत असा चुकीचा समज पुष्कळ लोकांचा आहे. परंतु खरे बौद्ध धर्मी लोक फार झाले तर दहा कोटि भरतील. त्यांच्यांत मतभेदांचा बराच घोंटाळा आहे. त्यांत मुख्य दोन भाग आहेत. सिंहलद्वीप, ब्रह्मदेश व सयाम यांतील बौद्ध धर्मी लोकांत जरी पुष्कळ अंशीं परस्परांत मतभेद आहे तरी त्यांचा एकवर्ग केल्यास चालेल. दुसऱ्या वर्गांत तिबेट, चीन व जपान या उत्तरेकडील राष्ट्रांचा समावेश होतो. या राष्ट्रांत मूळचें बौद्ध धर्माचें स्वरूप अगदीं बदलून गेलें आहे.

बुद्ध ह्मणून कोणी पुरुष होऊन गेला किंवा नाहीं याविषयीं विद्वान् लोकांस शंका आहे. जरी बुद्धाचा खातरीलायक इतिहास आज उपलब्ध नाहीं, तरी बुद्ध होऊन गेला असें आह्मांस खास वाटतें. त्याचें खरें नांव सिद्धार्त होतें व "बुद्ध" या शब्दाचा धात्वर्थ "ज्ञाता" असा आहे. तो फार कोवळ्या मनाचा असावा असें त्याच्या चरित्रा-वरून दिसून येतें. त्याच्या शिक्षणाचा सर्व रोंख शब्दपांडित्याकडे नसून तदनुसार आचरण घडलें पाहिजे याकडे होता. सर्व जग ओतप्रोत दुःखानें भरलेलें आहे असें

जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां या दुःखाचा परिहार कसा होईल या विचारांत तो पडला. ह्मणून सर्व लहानथोरांस ममतेनें वागविणें हाच माझा धर्म असें तो ह्मणूं लागला.

जन्मास येणें म्हणजेच दुःख भोगणें असें तो मानीत असे. दुःखाचें मूळ काय तें लोभांत आहे याकरितां लोभ नष्ट झाला ह्मणजे दुःख त्याबरोबर सहजच नाहींसें होईल. खरा हेतु, खरे विचार, खरें बोलणें, खरें वागणें, खरा उद्योग, खरें धैर्य, व खरें ध्यान यांहींकरून लोभ घालविला पाहिजे.

हिंसा, चौर्य, व्यभिचार, मिथ्या भाषण, व मादक पेय हीं पांच इतकीं निषिद्ध मानलीं आहेत कीं जर करितां एकाद्या प्राण्याची हत्या झाली तर तो खून समजला पाहिजे. तसेंच, मद्याचा एक थेंब चाखला असतां भयंकर पातक झालें असें समजतात.

आत्मा व परमात्मा (ईश्वर) या दोहोंचेंही अस्तित्व बुद्धास मान्य नव्हतें. देव ह्मणून कोणी नाशिवंत प्राणी आहेत व प्रकृति आहे असें तो मानीत असे.

कर्म ह्मणून कांहीं आहे असें तो मानीत असे, म्हणजे प्राणी मेल्यावर पूर्वजन्मांतील कर्माप्रमाणें त्यास पुढील जन्मीं फलप्राप्ति होते. हें मत फारच अयोग्य आहे.

निर्वाणप्राप्ति झाली ह्मणजे मनुष्यास त्यापलीकडे मिळविण्याचें कांहीं राहिलें नाहीं अशी बौद्ध धर्माची समजूत आहे. निर्वाण शब्द ब्राह्मण ग्रंथांतून घेतलेला असून त्याची अनेक अर्थीं योजना केलेली आहे. धात्वर्थानें पहातां या शब्दाचा अर्थ "मालवलेली ज्योति" असा आहे. कधीं कधीं याचा अर्थ बौद्ध ग्रंथांत वांच्छा नष्ट करणें इतकाच मात्र आहे, आणि त्यामुळें त्याचा अर्थ "समूळ नाश" असाच घेतला पाहिजे असें नाहीं. तथापि केव्हां केव्हां तोही त्याचा अर्थ होतो व त्या वेळेस त्यास परिनिर्वाण ह्मणतात. परिनिर्वाण ह्मणजे देहभान नाहींसें होणें इतकेंच नव्हे तर सर्वस्वीं स्वतःला विसरणें हें होय.

मनुष्यानें सर्व आप्तविषय सोडून देऊन संन्यासी होणें किंवा भिक्षु होणें हाच काय तो मुक्तीचा मार्ग बौद्ध धर्मास अवगत आहे. एकांतवास चांगला असें बुद्धानें प्रतिपादन केल्यामुळें जनसमूहाचे तारणाचा मार्ग त्यास दाखवितां आला नाहीं. जनसमूहाचें महत्त्व त्यानें अगदींच कमी करून सर्वसंगपरित्याग करावा असें त्यानें प्रतिपादन केलें आहे.

या प्रकारें बौद्ध धर्माचें मूळचें स्वरूप आह्मीं थोडक्यांत दिलें आहे. सिंहलद्वीप व दक्षिणेकडील इतर देशांतून या धर्माचें मूळचें स्वरूप बरेंच बदललें आहे; तथापि उत्तरेकडील देशांतून या धर्माचें इतकें रूपांतर झालें आहे कीं तो एक अगदीं नवीनच धर्म बनून राहिला आहे. दक्षिणेकडील धर्मग्रंथांस हीन यान (लघुचक्र) व उत्तरेकडील ग्रंथांस महा यान (महा चक्र) अशीं नांवें आहेत. उत्तरेकडील बौद्ध धर्मांत कालांतरानें ईश्वरवादी व अनेकेश्वरवादी मतें शिरलीं. तसेंच, जादूटोण्याचा प्रकारही त्यांच्यांत शिरला.

सिंहलद्वीप, ब्रह्मदेश व सिंधुनदाच्या आसमंतांतील प्रदेश यांत बौद्ध धर्म हल्लीं चालू आहे; परंतु हिंदुस्थानांत तो नाहीं ह्मटला तरी चालेल. या धर्माच्या लोकांचा छळ

होऊन तो धर्म नाहींसा झाला कीं काय अशी शंका नेहमीं अनेक लोकांस येते. परंतु तसा प्रकार मुळींच झाला नसून तो धर्म आपोआप लयास गेला. बौद्ध धर्म लयाला जाण्यास जीं अनेक कारणें झालीं त्यांपैकीं ब्राह्मणांचें बौद्ध लोकांवर बुद्धिमत्तेंत श्रेष्ठत्व हें एक होय. हे लोक त्या धर्माचे कट्टे शत्रु होते; बौद्ध धर्मग्रंथांची भाषा फारच ओंगळ आहे, व त्यांतील विषयही तसेच निंद्य आहेत. कित्येक ग्रंथांतून इतका अनीतीचा[१] प्रकार भरला आहे कीं ते हातांत सुद्धां धरवत नाहींत. हा ओंगळ प्रकार पाहून बरनूफ नामक विद्वानास इतका तिटकारा आला कीं त्यानें हे ग्रंथ वाचण्याचें सोडून दिलें: ही फारच दुःखाची गोष्ट आहे. कालांतरानें आपल्या शिष्यांची स्थिति इतकी बिघडेल हें जर बुद्धास पूर्वींच कळलें असतें तर त्याच्याइतकें दुसऱ्या कोणासही वाईट वाटलें नसतें. कारण तो सज्जन होता हें आह्मी जाणून आहों. हिंदु लोकांत पुष्कळ सत्पुरुष होऊन गेले हें खरें, परंतु त्या सर्वांत हा अद्वितीय होता. त्याचा तो सौम्य स्वभाव व स्वार्थ-त्याग पाहून पुष्कळ लोक त्यास माना डोलवितात हें जरी खरें, तरी त्याच्या उपदेशांत अनीतीचें तत्त्व आरंभापासून होतें असें ह्मटल्यावांचून आह्मांस रहावत नाहीं. कारण त्याशिवाय असा परिणाम होणें संभवत नाहीं.

## २. जैन धर्म.

जैन धर्माची माहिती आम्हांस फारशी नाहीं, कारण या धर्माचीं बरींच पुस्तकें अद्याप प्रसिद्ध व्हावयाचीं आहेत व जीं थोडींबहुत आज मितीस उपलब्ध आहेत त्यांची योग्यताही फारशी नाहीं.

बौद्ध धर्म व जैन धर्म हे एकाच काळीं उदयास आले असावे असें सकृद्दर्शनीं दिसतें खरें, तथापि जैन धर्म बौद्ध धर्माच्या पूर्वींचा आहे असें वाटतें. बौद्ध धर्मानें जशीं या देशांतील लोकांचीं मनें वळविलीं तशीं कांहीं जैन धर्मानें वळविलीं नाहींत याचें कारण पाहूं गेलें असतां हेंच आहे कीं बुद्ध हा फार दयार्द्र अंतःकरणाचा होता. जैन लोकांचे साधु पुरुष पहावेत तर ते जसे कांहीं इहलोकचे नाहींतच, व यामुळें त्यांचें बोलणें समजण्यास कठीण पडून लोकांचें प्रेम त्यांजवर बसलें नाहीं.

जैन लोकांस वेद मान्य नाहींत. त्यांचे आगम म्हणून पंचेचाळीस ग्रंथ आहेत. त्यांतील जुने जुने ग्रंथ प्राकृतांत आहेत.

जैन धर्माचा प्रसार मुख्यत्वेंकरून वर्द्धमान नांवाच्या पुरुषानें केला. त्यास महावीरही ह्मणतात. पार्श्वनाथ त्याचे पूर्वी होऊन गेला असें वाटतें. जैन लोकांच्या गुरूंस जीन किंवा तीर्थंकर असें म्हणतात.

ते एकंदर चोवीस झाले. तेच पुढें देव बनले व त्यांची पूजाअर्चा लोक करूं लागले. वस्तुतः जैन लोक नास्तिक आहेत. जग अनादि असून सृष्टिसंभव परंपरेनें चालला आहे

---

[१] जर कोणीं बौद्ध धर्माचे सर्व ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें धाडस केलें असतें तर तो गुन्हेगार ठरून शिक्षेस पात्र झाला असता, असें भट्ट मोक्ष मुल्लर ह्मणतात.

असें ते मानितात. मनुष्याला आत्मा आहे असेंही ते मानितात. बौद्ध धर्मास हें मत सम्मत नाहीं. निर्वाण म्हणजे समूळ नाश असा जैन लोकांचा समज नाहीं.

प्राचीन काळचे जैन लोक नग्न हिंडत असत. जैनांत दिगंबर व श्वेतांबर असे दोन पंथ आहेत. दिगंबर पंथाचे लोकांनीं नेहमीं नग्न असावें असें जरी आहे तरी हल्लीं यतिच काय ते तसें वागतात व ते देखील विशेषेंकरून जेवतांना नग्न होतात.

मनुष्यानें उदार, सौम्य, भक्तिमान् व पापकर्माबद्दल पश्चात्तापी असलेंच पाहिजे हीच काय ती त्यांच्या नीतिशिक्षणाची मजल. "अहिंसा परमो धर्मः" हेंच काय तें त्यांच्या धर्माचें मुख्य तत्त्व आहे. सर्व प्राण्यांस जीव ह्मणजे आत्मा आहे; वनस्पतीला देखील जीव आहे असें कित्येक मानितात; ह्मणून न जाणून सुद्धां झालेली अगदीं क्षुद्र प्राण्याची हिंसा हें महत्पाप आहे असें ते मानितात.

जैन धर्माचे प्राचीन ग्रंथ अगदीं कुचकामाचे आहेत. तथापि नऊशें वर्षांमागें संस्कृत भाषेंत ते आपले ग्रंथ लिहूं लागले; त्या दिवसापासून त्यांचे हातून विद्येच्या कामीं चांगलीच जनसेवा झाली असें ह्मणावें लागतें.

## ३. कबीरपंथ, शीक लोकांचा धर्म.

हिंदु धर्मांत सुधारणा करणारे जे पंथ झाले ते हे होत असें कित्येक समजतात; परंतु पुष्कळ गोष्टींत हे पंथ हिंदु धर्माशीं अगदीं विरुद्ध आहेत.

कबीरानें जातिभेद मोडून टाकून प्रसिद्धपणें ब्राह्मणांचा गर्व व ढोंग हीं उघडकीस आणलीं व त्यांच्या शास्त्रांची निर्भर्त्सना केली. मूर्तिपूजा करणें हें पातक आहे असें तो समजत असे. तरी देवळें त्यास नको होतीं असें नाहीं. तीं फक्त प्रार्थनेच्या जागा आहेत असें तो म्हणे. मनुष्यानें सर्वसंगपरित्याग करून ध्यानस्थ रहावें असें तो सांगत असे. संस्कारयुक्त शुद्धि व पूजेचे बाह्योपचार यांत अर्थ नसून मनुष्यानें शुद्ध नीतीनें वागलेंच पाहिजे असा त्याचा कटाक्ष होता. सर्व प्राणी पवित्र असून गुरूचें माहात्म्य या पंथांत फार आहे. या पंथाची ईश्वराविषयींची समज एकेश्वरी पंथाप्रमाणें देखील नव्हती. कबीराप्रमाणेंच नानक होऊन गेला. त्यानें पंजाबी भाषेंत आपल्या धर्माचें पुस्तक लिहिलें आहे. त्यास ग्रंथ म्हणतात. तें विशेष योग्यतेचें नाहीं. त्यांत मूर्तिपूजेचा निषेध, नीतीचें वर्तन, व अनन्यभावें गुरुभक्ति हीं सांगितलीं आहेत. हा धर्म अद्वैतमतवादी आहे.

शीक लोकांचा मूळारंभीं धर्माकडे कल होता, परंतु पुढें त्यांचा मुसलमानांनीं छल केल्यावर ते योद्धे बनून आपल्या शत्रूंचे कट्टे द्वेष्टे झाले. शीक लोकांस त्यांची तरवार व ग्रंथ हीं दोन्ही फार पूज्य आहेत.

## ४. पारशी लोकांचा धर्म.

मुंबई इलाख्यांत पारशी लोकांची संख्या फारशी जरी नाहीं तरी त्यांची बरोबरी करणारे दुसरे लोक थोडे आहेत. या धर्माचा आरंभ इराणांत झाला असून तद्धर्मी लोक

त्या देशांत फारच थोडे आहेत, व जे आहेत त्यांस बराच छळ सोसावा लागत आहे. मुसलमान लोकांच्या तडाख्यापुढें यापूर्वींच किरमान व याजीद येथूनही हा धर्म नाहींसा झाला असता, पण तेथें तो अद्याप टिकाव धरून राहिला आहे.

पारशी धर्माकडे पाहातां असें दिसून येतें कीं त्याचा मूळच्या हिंदु धर्माशीं फारच जवळचा संबंध आहे; पुढें कालांतरानें या दोन्ही धर्मांत महदंतर पडलें. पारशांचें धर्म-पुस्तक "आवेस्ता" म्हणून आहे. प्राचीन काळीं इराणांत विद्येचा प्रसार कसा झाला होता त्याची अटकळ या ग्रंथावरून करितां येते. हा ग्रंथ फार झालें तर बायबलाएवढा असून त्यांत भाग आहेत ते असे: १ यस्न; २ वांदिदाद; ३ विसपरद, ४ यष्ट; पांचव्या भागांत कांहीं लहानसहान स्तोत्रें व पंचांग दिलें आहे.

यस्न या शब्दाचा अर्थ अर्पण असा होतो. या भागांत अर्पण करितेवेळीं जीं स्तोत्रें ह्मणावीं लागतात त्यांचा संग्रह केलेला आहे. या भागाचे पांच मुख्य पोटभाग आहेत त्यांस गाथा ह्मणतात.

वांदिदाद यांत धर्मसंबंधी नियमांचा समावेश केलेला आहे. गाथा एकेश्वरवादी आहेत. ईश्वरस्वरूप द्विगुणात्मक आहे हें मत वांदिदाद यांत सांगितलें आहे, व अव-शिष्ट भागांत बहुदेवमत प्रतिपादन केलेलें आहे. प्रोफेसर स्पिजेल यांचें मत असें आहे कीं पारशी लोक मूळारंभीं एकेश्वरीमताचे होते.

पारशांचें मुख्य दैवत ह्मटलें ह्मणजे आहुरमझ्द आहे. त्यालाच हल्लीं होरमझ्द हें नांव दिलें आहे. त्याचे सहा स्वर्गांतले मंत्री आहेत. त्यांस अमशस्पंद ह्मणत असून त्यांची पूजा करितात.

दुरात्मे आहेत असें पारशी लोक मानितात. त्यांतील मुख्य अहिरमन हा असून तो अनादि आहे तसाच तो दुष्टही आहे. त्यानें चांगल्याचा प्रतिकार करण्याकरितां सहा मुख्य दैत्य उत्पन्न केले. एकंदर सर्व सृष्टींत चांगलें व वाईट यांचा संग्राम नेहमीं चालला आहे असें पारशी लोक समजतात. भुतांचा राजा जो अहिरमन त्यास एकट्या झोरो-अॅस्तरशिवाय कोणीही दबावणारा झाला नाहीं. यास तीन अद्भुत पुत्र होऊन ते हा संग्राम तसाच पुढें चालवितील व अखेरीस त्यांचे हातून अहिरमनचा सर्वस्वीं नाश होईल.

नैतिकदृष्ट्या पारशी धर्म हिंदु धर्माहून श्रेष्ठ आहे. कोणत्याही पूज्य वस्तूंच्या ठायीं दुर्गुण आरोपित केलेले नाहींत. तसेंच, दुष्ट व अनीतीचीं कर्में पूजेंत सांगितलेलीं नसून त्यांच्यांत प्रतिमापूजन नाहीं. मनुष्यानें विचारांत, बोलण्यांत व कृतींत खरें राहिलें पाहिजे असा त्या धर्माचा सक्त हुकूम आहे. खरोखर हीं लक्षणें फार प्रशंसनीय आहेत.

ह्या धर्माचे मनुष्यानें दैत्यसृष्टीचा संहार करण्याकरितां नेहमीं तत्पर राहिलें पाहिजे. पण असें वागल्यानें पुष्कळ अनर्थ घडण्याचा संभव आहे, कारण पुष्कळ निरुपद्रवी प्राणी सैता-नानें उत्पन्न केले आहेत अशी त्यांची समजूत आहे. यांतील तात्पर्य इतकेंच कीं मनुष्याचा वाइटाशीं नेहमीं उभा दावा असला पाहिजे व हीच काय ती घेण्यासारखी मोठी गोष्ट आहे.

तथापि या धर्मांत पुष्कळच न्यूनता आहे. त्यांचा देव जो अहुरमझ्द तो सर्वांशीं चैतन्यरूपी नाहीं. त्याची व त्यानें निर्माण केलेल्या वस्तूंची पूजा केली असतां चालतें. तसेंच, त्यांस नैवेद्य अर्पण करावा लागतो व स्तोत्रांनीं त्यांस पुष्टि येते. पापाविषयीं कल्पना पारशी धर्मांत फारच अपूर्ण आहे. तसेंच, या धर्मांतील कर्मकांडांत फारच वेडेचार शिरल्या-मुळें त्यांविषयीं तिटकारा उत्पन्न होतो. तथापि त्यांवर पारशी लोकांची श्रद्धा विशेष आहे.

सुशिक्षित पारशी लोक गाथाशिवाय बाकीचीं आपलीं सर्व धर्मपुस्तकें हळू हळू टाकून देतील असें दिसतें. आवेस्ता ग्रंथांतील उत्तम भाग ह्मटला ह्मणजे गाथा होय. कारण त्यांत नीति व ईश्वरी ज्ञान पुष्कळच सांगितलेलें आहे. परंतु हौग साहेब ह्मणतात कीं अहुरमझ्द या देवतेपासूनच चांगलें व वाईट हीं दोन्हीही निर्माण झालीं आहेत. असें जर आहे तर देव वाइटाचा अधिकारी होतो. हा दोष या धर्मांत व हिंदु धर्मांतही आढळतो.

आतां झोरोॲस्तर कोण होता हें आमच्यानें खातरीपूर्वक सांगवत नाहीं; कित्येक विद्वान् लोकांस तर तो होता किंवा नव्हता याविषयीं संशय आहे. तो इ० सनाच्या पूर्वीं सातव्या किंवा सहाव्या शतकांत होऊन गेला असावा असें आह्मांस वाटतें व तो धर्मसुधारणेच्या कामांत मन:पूर्वक झटणारा असून त्यानें आर्य लोकांच्या प्राचीन धर्माचें पुनरुज्जीवन केलें.

तथापि खुद्द झोरोॲस्तर याचा कोणता उपदेश आहे हें निश्चयात्मक ठरविणें कठीण आहे. शिकंदर बादशहानें इराणचें राज्य जेव्हां पालथें घातलें त्या वेळेस त्याचीं सर्व प्राचीन पुस्तकें नाश पावलीं किंवा नाहींतशीं झालीं असा पारशी लोकांचा समज आहे व त्यांत बराच सत्यांश आहे असें दिसतें. इ० सनाचे पहिल्या शतकांत अस्कोनिअन राजा वालकश यानें या धर्मग्रंथांचा जीर्णोद्धार करण्याचा प्रयत्न केला. त्यानंतर सुमारें दोन शतकांनीं आरदेशा नांवाच्या इराणच्या राजानें पुन: या कामांत हात घातला, पण त्या वेळीं हें काम शेवटास न जाऊन अखेरीस चौथ्या शतकांत दुसरा शापूर राजा याचे कार-कीर्दींत हें काम पुरें झालें. तथापि वर सांगितलेल्या राजांच्या कारकीर्दींत हें काम कितपत सफळ झालें ह्मणजे आवेस्ता ग्रंथाचा खरा भाग कितपत शोधून काढला व नवीन भाग किती घुसडला याचा निर्णय करणें कठीण आहे. हल्लीं जो आवेस्ता ग्रंथ उपलब्ध आहे त्यांत यवनी व यहूदी कल्पना बऱ्याच शिरल्या आहेत असें दिसतें. या विषयावर फारच परिश्रम करून प्रोफेसर डारमिसटेटर यांनीं एक ग्रंथ तयार केला आहे. त्यांत त्यांचा अभिप्राय असा आहे कीं आवेस्ता ग्रंथाची मूळची झेंद भाषेंतील प्रत अस्सल नाहीं.

### ५. चिनी लोकांचा धर्म.

या पत्रांतून हिंदुस्थानांतील प्रचलित धर्मांचें विवेचन करण्यांत आलें आहे. आतां अवांतर देशांतील धर्मांविषयीं दोन शब्द लिहून निर्वाह होईल अशी उमेद आहे. —चीन देशांतील सामान्य लोकांचा धर्म ह्मटला ह्मणजे कानफुशिअस, बुद्ध व टाओ

यांनीं जे निरनिराळे धर्म स्थापन केले त्या सर्वांचें मिश्रण होय. यांपैकीं बौद्ध धर्माविषयीं आह्मीं पूर्वीं लिहिलेंच आहे.

प्राचीन काळच्या भूतपिशाचादिकांची भक्ति करण्याची जी चाल होती तीपैकीं, शेष राहिलेला तो टाओचा धर्म होय इतकें या धर्माविषयीं सांगितलें ह्मणजे पुरे आहे. जादूटोणा खरा आहे अशी या धर्माची पक्की समजूत आहे. दक्षिण हिंदुस्थानांत भूताखेतांची जी पूजा चालू आहे ती आमच्या वाचकांस पूर्णपणें माहीत असल्यामुळें टाओच्या धर्माचा तोच प्रकार आहे इतकें सांगितलें ह्मणजे पुरे.

परंतु कानफुशिअसचा धर्म तसा नाहीं. तो याहून उच्च प्रतीचा आहे. कानफुशिअस खरोखरीं पहातां मोठा विलक्षण मनुष्य होता. संसारांतील मनुष्याची बारीक सारीक सर्व इतिकर्तव्यता त्याच्या धर्मपुस्तकांत तपशीलवार दिली असल्यामुळें त्याचा धर्म प्रशंसनीय झाला आहे. मनुष्यांनीं एकमेकांशीं कसें वागावें याचें निरूपण त्यानें स्पष्ट, व्यापक व साधारणतः खरें असें केलें आहे. तथापि त्या धर्मांतील नीतिबोध ख्रिस्ती धर्माहून श्रेष्ठ आहे हें ह्मणणें मात्र चुकीचें होईल. या गोष्टीच्या प्रमाणाकरितां एक उदाहरण घेऊं. कानफुशिअसची जी स्तुति करण्यांत येते ती त्याच्या एका सर्वोत्कृष्ट सूत्रामुळें आहे. तें सूत्र असें: "लोकांनीं तुला जें करूं नये असें तुला वाटतें तें तूं त्यांना करूं नको." परंतु खरें उत्कृष्ट सूत्र पाहिलें तर ख्रिस्ताचेंच आहे. तें हें होय: "माणसांनीं ज्या ज्या रीतीनें तुह्मांशीं वर्तावें ह्मणून तुमची इच्छा आहे त्याच रीतीनें तुह्मीही त्यांशीं वर्ता." या दोन सूत्रांत जो भेद आहे तो उघडच आहे. चिनी सूत्र फक्त निषेधापुरतेंच आहे, पण ख्रिस्ती सूत्रांत विधि व निषेध या दोहोंचाही समावेश होतो.

आपल्याला ईश्वरी प्रेरणा होती असें कानफुशिअसनें ह्मटलें नाहीं ही एक लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे, व तिजवरून तो फारच खरा मनुष्य होता असें सिद्ध होतें.

कानफुशिअसचा धर्म नीतिविशिष्ट आहे. त्यांत धर्मतत्त्वांचें विवेचन फारसें नाहीं. चीन देशांत त्याच्यापूर्वीं जे सत्पुरुष होऊन गेले त्यांनीं ईश्वर व त्याची जगत्पालनव्यवस्था यांविषयीं अनेक प्रसंगीं दिग्दर्शन केलेलें आहे. तथापि कानफुशिअसच्या धर्मांत या विषयांचा उल्लेख फारच क्वचित् प्रसंगीं आढळतो. स्वर्गाचें वर्णन त्यानें बरेच ठिकाणीं केलेलें आहे. परंतु त्याचा स्वर्ग ह्मटला ह्मणजे वर दिसणारें नभोमंडल काय तें. मनुष्याहून श्रेष्ठ अशी चैतन्यरूप योनि आहे ही गोष्ट त्यास कबूल होती खरी, परंतु मनुष्यानें तीस पूज्य मानून तिजपासून दूर रहावें हें बरें असें तो सांगत असे. परलोक आहे कीं काय हें त्यास विचारलें असतां तो ह्मणे कीं या गोष्टीचें उत्तर देणें कठीण आहे, परंतु मनुष्यानें इहलोकीं आपली इतिकर्तव्यता बजावली ह्मणजे पुरे. त्याहून खोल पाण्यांत जाण्याच्या भानगडींत त्यानें पडूं नये हें बरें.

आपला मित्र—.

## पत्र सोळावें.

मागील चार पत्रांतील विषयांचें सिंहावलोकन—हें परीक्षण इतर धर्मांस विघातक—परंतु ख्रिस्ती धर्मास अनुकूल—ख्रिस्ती धर्माचा खरेपणा इतर धर्मांवर अवलंबून नाहीं—ख्रिस्ती धर्म व इतर धर्म यांच्या अंतःप्रमाणांचें असादृश्य सुलभपणें दाखविण्याचा मार्ग.

**प्रिय मित्र—,**

मागील चार पत्रांत निरनिराळ्या धर्मांचीं व मुख्यत्वेंकरून हिंदु धर्म व मुसलमानी धर्म यांचें बरेंच बारकाईनें परीक्षण करण्यांत आलें. या निरनिराळ्या धर्मांच्या वतीनें जो कांहीं पुरावा सांगण्यांत आला तो वाचून तुह्मांस खरोखरीं बरेंच कौतुक वाटलें असावें. हे धर्म ईश्वरदत्त आहेत असें ह्मणणें ह्मणजे केवळ मूर्खपणा होय हें आमच्या विवेचनावरून कोणाही निष्पक्षपाती परीक्षकाची सहजच खातरी होईल. या निरनिराळ्या धर्मांच्या वतीनें जे खातरीलायक ह्मणून दिलेले पुरावे ते देखील बुद्धिवादापुढें मुळींच टिकत नाहींत हें या परीक्षणांत निष्पन्न झालें.

या विवेचनापासून आपला आणखी एक फायदा होत आहे. तो कोणता ह्मणाल तर त्यावरून ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेस विशेष बळकटी येते, व ती कशी हें आपण आतां पाहूं.

ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे किंवा नाहीं याविषयीं यापूर्वी सातव्या पत्रांत विवेचन करण्यांत आलेंच आहे. त्या ठिकाणीं आह्मीं बऱ्याच विस्तारानें ईश्वरनिर्मित सृष्टीशीं ख्रिस्ती धर्माची तुलना करून दाखविली, व सृष्टि आणि ईश्वरी सूत्र या दोहोंशीं ख्रिस्ती धर्म किती उत्कृष्ट रीतीनें जुळतो हेंही व्यक्त केलें. त्याचप्रमाणें मनुष्यकृतीशीं ख्रिस्ती धर्म जुळत नाहीं हें आपण पाहिलें व हें प्रस्तुत प्रसंगीं चांगलेंच लक्ष्यांत येण्यासारखें आहे; कारण मनुष्यास कोणत्या प्रकारचा धर्म स्थापतां येतो याविषयीं आपण तुत्काच विचार केला आहे; तसेंच हिंदु व महमदी वगैरे धर्मांची स्थापना करणारे महा समर्थ होते हें आपण विसरतां कामा नये. आजपर्यंत मनुष्यानें जे जे धर्म निर्माण केले त्या सर्वांत हे धर्म श्रेष्ठ आहेत असें आपणांस दिसून आलें. जर करितां ख्रिस्ती धर्म मनुष्यकृत असता तर त्याचीही योग्यता त्यांच्याइतकीच असती; त्यांहून ख्रिस्ती धर्माची सरशी झाली असती असें वाटत नाहीं. कारण त्या धर्माचाही कमीपणा इतर धर्मांप्रमाणेंच दिसून आला असता.

परंतु ख्रिस्ती धर्माचें स्वरूप इतर धर्मांहून किती वेगळें आहे हें मागील ९ व १० या पत्रांत विशेष खुलाशानें सांगितलें आहे. या सर्व धर्मांचें परीक्षण करितांना आह्मीं बायूबल व इतर धर्म ह्यांस एकच कसोटी लाविली होती व तीवरून ख्रिस्ती धर्माची भारदस्ती अधिक ठरून इतर धर्म अगदीं शुष्क ठरले हें तुमच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

जर ख्रिस्ती धर्म मनुष्यकृत असता तर तो हिंदु धर्माहून उत्तम न ठरता. कारण हिंदु धर्मांतील तात्त्विक ज्ञान ज्या पंडितांनीं काढलें ते विलक्षण व कुशाग्रबुद्धीचे पुरुष होते.

तसेंच, ख्रिस्ती धर्म मुसलमानी धर्माहूनही उत्तम न ठरता. कारण महमद हा विशाल बुद्धीचा, मोठा हिंमतबहादर, व मोठा अनुभवशीर असल्यामुळें त्यानें यहूदी, ख्रिस्ती, पारशी आणि मूर्तिपूजकांचे धर्म या सर्वांतील सार काढून मुसलमानी धर्म बनविला. तेव्हां अर्थात् मनुष्यकृत धर्मांमध्यें महमदी धर्माची योग्यता इतर धर्मांस येणार नाहीं हें उघड आहे.

ख्रिस्ती धर्म ज्या देशांत व ज्या काळीं उदयास आला, ज्यांनीं त्याचा प्रसार केला व ते ज्या स्थितींत होते इत्यादि गोष्टींचा विचार केला ह्मणजे हा धर्म इतर धर्मांस मागें टाकील अशा प्रकारचीं कोणतींही अनुकूल चिन्हें दृष्टोत्पत्तीस आलीं नव्हतीं. त्या वेळेस जूडिआ प्रांतांत धर्माची फारच हेळसांड झाली होती. अनुकूल काय ती एकच गोष्ट होती. ती ही कीं यहूदी लोकांत मूर्तिपूजेचा फारच तिटकारा उत्पन्न झाला होता. यहूदी लोकांतील परोशी पंथाचे लोक इतरांची सावली पडूं न देणारे असून, मोठे कर्मठ व धर्मवेडे झाले होते, व सदोकी पंथाचे लोक नास्तिक बनले होते. सामान्य लोकांचा कल साधारणतः परोशी लोकांकडे होता. जुन्या करारांत सांगितलेला शुद्ध धर्म हा दंतकथांमुळे रद्द झाला होता. एकंदरींत यहूदी धर्माची स्थिति प्रेतवत् झालेली होती.

अशी स्थिति असल्यामुळें गालिलांतील अशिक्षित कोळ्यांच्या हातून काय होणार आहे? अशी पृच्छा येते. फार झालें तर निरर्थक क्रियाकर्में, किंवा कोतेपणाचें धर्मवेड, किंवा भ्रष्ट झालेल्या यहूदी धर्मांतील नीच प्रकार हें किंवा असेंच कांहीं तरी त्यांनीं प्रचारांत आणिलें असतें. पण हे प्रकार कितपत लोकमान्य झाले असते याची शंकाच आहे. परंतु शुभवर्तमानें पहातां याच लोकांच्या हातून किती उत्तम काम झालें हें सहजच दिसून येणार आहे.

यांतील इंगित इतकेंच आहे कीं अवांतर धर्म बुद्धिवादाच्या कसोटीस उतरत नसून, त्यांजविषयीं जों जों अधिकाधिक विचार करावा तों तों त्यांत न्यूनाधिक्य दिसूं लागतें. ख्रिस्ती धर्माची तशी गोष्ट नाहीं. सर्व प्रकारें परीक्षा करून घेण्यास तो धर्म सिद्ध आहे व जों जों ही परीक्षा बारकाईनें करावी तों तों त्या धर्माचें साम्य व सौंदर्य हीं व्यक्त होतात. तर असें कां असावें, व याबद्दलचा पुरावा इतर धर्मांहून वेगळा कां असावा असें कोणी विचारूं लागल्यास त्याला फक्त एकच उत्तर देतां येईल. तें हें कीं या धर्माचा उगम अवांतर धर्मांसारखा नाहीं. हा धर्म ईश्वरदत्त आहे व इतर धर्म मनुष्यकृत आहेत.

आतां, अंतःप्रमाणांच्या संबंधानें आह्मीं जीं विधानें केलीं आहेत तीं खरीं किंवा खोटीं याचें परीक्षण तुमचें तुह्मांसच करतां येणार आहे. यास सुलभ उपाय हा आहे कीं हिंदूंचे वेद व पुराणें, तसेंच, पारशांचा आवेस्ता व मुसलमानांचें कुराण यांच्याशीं बायबल ताडून पहावें. या सर्व ग्रंथांचीं इंग्रेजींत भाषांतरें झालेलीं असल्यामुळें हें काम फारच सुलभ झालें आहे.

आतां शेवटीं इतकेंच सांगणें जरूर दिसतें कीं बऱ्याच धर्मांवर जी चर्चा करण्यांत आली तींत कोणाचीं मनें दुखविलीं जातील अशा प्रकारची भाषा योजण्यांत आली नाहीं

हें कोणीही सुज्ञ वाचक कबूल करील. प्रसंगानुरूप कित्येक धर्मांतील दोषांचें दिग्दर्शन करणें भाग पडलें व अशा प्रसंगीं सत्यास अनुसरून एखादा दुसरा कडक लेख लिहिणें प्राप्त झालें ही निरुपायाची गोष्ट आहे. कारण कोणत्याही धर्मांतील लोकांचें उगीच मन दुखविणें हें वाईट तर खरेंच, परंतु खोट्यास खोटें न ह्मणणें हें त्याहूनही वाईट. एतद्देशीय मित्रमंडळींचीं मनें न दुखविलीं जातील असें आमच्या हातून होण्यास किमपिही अनमान होणार नाहीं, कारण आमचें ब्रीद हें आहे कीं खऱ्यास खरें व खोट्यास खोटें ह्मटल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं.

आपला मित्र—.

## पत्र सतरावें.

सिंहावलोकन—हीं पत्रें वाचूनही जर कोणास ख्रिस्ती धर्म नापसंत असेल तर त्यानें त्याहून चांगल्या धर्माकडे बोट दाखवावें—हीं पत्रें वाचून मनावर कोणता संस्कार घडला? —हें व्यक्तिमात्राच्या मनावर आहे—तसेंच हें नीतिवर्तनावर आहे—दुराग्रहाचीं कारणें—धर्म ह्मटला ह्मणजे त्यांत नीतिधैर्य असलेंच पाहिजे—धर्माचीं प्रमाणें ओळखण्यास तदनुसार वर्तन पाहिजे—मनुष्याचे ठायीं विनय व शुद्धभाव यांची आवश्यकता—देव न्यायी व पवित्र आहे—"ईश्वराकडे जाण्यास तयार रहा."

**प्रिय मित्र—,**

आपण हातीं घेतलेलें काम संपल्यासारखेंच आहे, ह्मणून हें अखेरचें पत्र समजावें. आतां कांहीं विशेष लिहिण्यासारखें राहिलें नाहीं.

सिंहावलोकन.

ख्रिस्ती धर्माच्या प्रमाणांचे जे जे अनेक विषय येतात त्यांजबद्दल कर्तव्य तितकें विवेचन आह्मीं केलेंच आहे. त्या धर्माचीं अंतर्बाह्य प्रमाणें तपासून पाहिलीं. नवा करार प्राचीन, अस्सल, व विश्वसनीय आहे हें प्रमाणांसह दाखविण्यांत आलें. अद्भुत चमत्कार व भविष्यें यांवरून ख्रिस्ती धर्म ईश्वरप्रणीत ठरतो याबद्दलचा पुरावा कसा काय आहे याचीही विचक्षणा आह्मीं केली. बायबल व इतर धर्मग्रंथ यांतील विरोध; सृष्टि व ईश्वरी धोरण यांच्याशीं बायबलाचें उत्तम ऐक्य; खुद्द बायबलांतील सर्व भागांची परस्परांशीं एकवाक्यता; स्वभावसिद्ध धर्माशीं बायबलाची अनुरूपता; व निरनिराळे धर्म व तत्त्वविचार यांहून बायबलाची विशेष शेखी या सर्व गोष्टींचा आपण विचार केलेलाच आहे. आह्मीं प्राचीन व अर्वाचीन सर्व धर्मांशीं व मुख्यत्वेंकरून हिंदु व मुसलमान धर्मांशीं ख्रिस्ती धर्म ताडून पाहिला, व या कामीं ख्रिस्ती धर्माकरितां योजिलेली कसोटीच इतर धर्मांस लावून पाहिली. तेव्हां असें दिसून आलें कीं ख्रिस्ती धर्माप्रमाणें इतर धर्म कसोटीस उतरत नाहींत. सरतेशेवटीं आह्मी अनुभविक प्रमाणांकडे वळलों. बायबल ईश्वरप्रणीत आहे हें सिद्ध करण्यास जीं जीं प्रमाणें आपण पाहिलीं त्यांतील हें कमी योग्यतेचें आहे असें मात्र नाहीं. या सर्व प्रमाणांविषयीं याहून जास्त विस्तार सहज करतां आला असता, तथापि तसें करण्याचें कारण दिसत नाहीं. जेवढा ऊहापोह करण्यांत आला आहे तेवढ्यानेंच ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त आहे अशी कोणाही अंतःकरणपूर्वक परीक्षण करणाराची पूर्ण खातरी झाल्यावांचून रहाणार नाहीं.

इतकें असून जर तुमच्या मतें ख्रिस्ती धर्मास अनुकूल असें कांहींच अद्याप निष्पन्न झालें नाहीं तर बुद्धीस ठरेल अशा दुसऱ्या एखाद्या धर्माकडे तुह्मांस बोट दाखविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पहा कीं ख्रिस्ती धर्माचा विस्तार या पूर्वींच किती झाला असून अजूनही तो एकसारखा वाढत चालला आहे. तसेंच, ख्रिस्ती मंडळी, बायबल, व ख्रिस्ती धर्मावर

लिहिलेलीं असंख्य पुस्तकें हीं सर्व उदयास आलीं कशीं? याचें उत्तर बायबलावरून जें तुह्मांस मिळतें तें जर तुह्मांस पटत नसेल तर तुम्हांस नुस्तें मुग्ध बसून उपयोगाचें नाहीं, त्याहून चांगलेंसें स्पष्टीकरण तुह्मांकडून मिळालेंच पाहिजे.

हिंदु, महमदी किंवा इतर धर्मांप्रमाणेंच ख्रिस्ती धर्म उदयास येऊन फैलावला. मग त्यांत विशेष तें काय असें कोणी ह्मणूं लागेल तर त्यांत अर्थ नाहीं.

कारण ख्रिस्ती धर्माचें स्वरूप, इतिहास इत्यादि गोष्टी इतर धर्मांहून अगदीं भिन्न आहेत. कित्येक अविचारी लोक म्हणतात कीं बायबल बनावट आहे व ख्रिस्तानें केलेले चमत्कार सब झूट आहेत, पण असें ह्मटल्यानें ते फार घोंटाळ्यांत पडतात. सर्व गोष्टींस कार्य-कारणसंबंध असलाच पाहिजे या नेमास अनुसरून प्रत्येक कार्यास जें कारण तें सबळ असलें पाहिजे. आतां ख्रिस्ती धर्म हें एक महत्कार्य आहे. हें कसें उदयास आलें व त्याची छाप सर्वत्र कशी बसली याबद्दलचीं सबळ व ऐतिहासिकदृष्ट्या खरीं अशीं कारणें नास्तिकांस अद्याप देतां आलीं नाहींत. याचीं कारणें जीं देण्यांत येतात तीं कधीं कधीं सबळशीं दिसतात, परंतु ऐतिहासिकरीत्या तीं खरीं नसतात. व खरीं कारणें पुरींशीं नसतात. उदाहरणार्थ, गिब्बन नामक इतिहासकरानें ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराचीं पांच कारणें आपल्या इतिहासांत नमूद केलीं आहेत तीं सर्व खरीं आहेत, तथापि त्यानें सांगितलीं तितकींच मात्र आहेत असें नाहीं. ह्मणजे तीं खरीं असून पुरींशीं नाहींत. अलीकडील इतिहासकारांत प्रोफेसर फ्रीमनइतका स्पष्टवक्ता दुसरा मिळणें कठीण. त्यानें ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराविषयीं लिहिलें आहे तें असें: इतिहासाच्या अनेक गोष्टींत "रोमन बादशाहींत ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराची जी गोष्ट आहे ती निव्वळ अद्भुत चमत्काराची आहे व ही गोष्ट जसजशी अधिकाधिक प्रत्ययास येत चालली तसतसें तिला प्राधान्य मिळून इतिहासांत तिचें महत्त्व फारच वाढलें आहे."

ख्रिस्ती शास्त्रांत सांगितलेल्या अद्भुत चमत्कारांवर ख्रिस्ती लोकांचा दृढ विश्वास आहे इतकेंच काय तें; परंतु असंभवनीय गोष्टी त्यांस पटत नाहींत; परंतु नास्तिक लोकांची तऱ्हा अगदीं वेगळी आहे. त्यांस हे अद्भुत चमत्कार खोटे वाटतात व असंभवनीय गोष्टींवर त्यांचा चटकन् विश्वास बसतो.

हें केवढें आश्चर्य!

आतां सरते शेवटीं या विषयावर आणखी दोन ओळी लिहून आपण हें पत्र पुरें करूं.

ख्रिस्ती धर्म खरा आहे अशाविषयीं प्रतिपादन आमच्यांनीं होईल तितकें आह्मीं केलें.

**बुद्ध्यनुरूप योग्यता.**

तथापि त्यावरून तुमची खातरी झाली असेल असें वाटत नाहीं; तर यास काय कारण असावें? कदाचित् तुह्मी ह्मणाल कीं वरील पुराव्यांवरून निर्णय करण्यासारखें कांहींच सिद्ध झालें नाहीं. कदाचित् तसेंही असेल. परंतु तुमचा विश्वास न बसण्यास आणखी एक कारण आहे. तें हें कीं कोणतीही गोष्ट सिद्ध करून दाखविण्यास जे कांहीं

मुद्दे आपण सादर करतों ते मुद्दे अग्राह्य असें मनानेंच घेतल्यावर ते कितीही खरे असून काय उपयोग? म्हणून ही गोष्ट मनाच्या स्थितीवर आहे. बुद्धिभ्रंश झालेला मनुष्य या कामीं सर्वथैव अयोग्य आहे. त्याच्यापुढें किती जरी ज्ञानाच्या गोष्टी सांगितल्या तरी त्या पालथ्या घागरीवरील पाण्याप्रमाणें आहेत. भूमितीचे सिद्धांत वेड लागलेल्या मनुष्यापुढें मांडले तर त्या विचाऱ्यास त्याचें वर्म काय समजणार?

नैतिक योग्यता.

देवानें मनुष्यास नुस्ती बुद्धि दिली आहे असें नाहीं. त्यास इच्छादिकरून मनोविकारही दिले आहेत. गणितशास्त्र किंवा पदार्थविज्ञानशास्त्र व अशींच अन्य शास्त्रें यांवर विचार करीत असतांना मनुष्यास आपल्या मनोविकारांचें कांहीं एक कारण पडत नाहीं. त्या वेळीं त्यास बुद्धीचें मात्र साहाय्य पाहिजे आहे. परंतु एखाद्या राजप्रकरणांतील गोष्टीवर किंवा अशाच कांहीं दुसऱ्या विषयावर आपण वादविवाद करूं लागलों ह्मणजे त्या वेळेस आपले मनोविकार अगदीं खवळून जातात. कोणत्याही शास्त्रीय विषयांवरील चर्चा फार शांतपणें व मोठ्या गांभीर्यानें चाललेली आपण पहातों. पण तेंच राजकीय प्रकरण आलें कीं तीच मंडळी एकमेकांवर तुटून पडतात. ह्मणून मनुष्य जर नीतीनें वागणारा नसेल तर त्यास धर्मसंबंधी सिद्धांतांचें विवेचन समजण्याची योग्यता येणारच नाहीं.

जेव्हां मनोविकार क्षुब्ध होतात तेव्हां बुद्धीला भ्रंश होतो ह्मणजे अंतःकरण खवळलें कीं बुद्धिज्ञानाची अगदी राखरांगोळी होते. त्या ठिकाणीं अक्कल गुंग होऊन कांहींच काम करूं शकत नाहीं. असें अनेक वेळां अनेक ठिकाणीं झाल्याचें आपण पहातों. यांतलें तात्पर्य इतकेंच कीं जेव्हां मनोविकार खवळले जातात तेव्हां बुद्धि ठिकाणावर रहात नाहीं. या सर्व गोष्टी मोठ्या ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत.

मनुष्याच्या मनास क्षोभ आणणारा असा धर्माहून विशेष दुसरा कोणताही विषय नाहीं. हिंदु लोकांपुढें ख्रिस्ती धर्माची गोष्ट काढली कीं त्यांचें डोकें फिरलेंच. याचें कारण उघड व सर्वश्रुत आहेच. पण अशानें परिणाम काय होतो? मनांत किंतु ठेवून ख्रिस्ती धर्माच्या गोष्टी ऐकण्यांत काय अर्थ आहे? ख्रिस्ती धर्म आवडत नसल्यामुळें तो खोटा आहे असा ग्रह धरून जर कोणी बसेल तर त्याची खातरी कशी व्हावी? मनानें जी गोष्ट घेतली तीच खरी वाटते, मग ती खरी असो वा नसो.

अज्ञात दुराग्रहबुद्धि.

कदाचित् तुह्मी ह्मणाल कीं हें सर्व खरें आहे. तथापि तें आह्मांस लागू पडत नाहीं. कारण आपण दुराग्रही नाहीं असें तुम्हांस वाटतें. अनेक वेळां असें दिसून येतें कीं ज्यांस दुराग्रह नसल्याची घमेंडी आहे तेच लोक इतके दुराग्रही असतात कीं त्यांस पारावार नसतो, कारण दुराग्रहबुद्धि आपणांमध्यें आहे हें ज्याचें त्यास ठाऊक नसतें. यावरून दुराग्रहानें तुह्मांस पछाडलें नाहीं असें होणारच नाहीं. शिल्पशास्त्र किंवा रसायनशास्त्र यांतील सिद्धांतांची चर्चा जितकी शांतपणें तुम्हीं चालवाल तितक्याच शांतपणानें ख्रिस्ती

धर्माची वाटाघाट कराल अशी अपेक्षा करणें म्हणजे मूर्खपणा होय, कारण आधींच तुमची वृत्ति साशंक व तशांत या वादांत पडल्यावर ती दुणावल्यास नवल नाहीं. ह्मणून व्यक्तीसंबंधानें हिंदु या नात्यानें व मनुष्यप्राणी असल्यामुळें तुमचे मनांत ख्रिस्ती धर्माविषयीं किंतु असलाच पाहिजे.

तर मग या दुराग्रहशत्रूविषयीं सावध असा: सर्व गोष्टींहून निव्वळ सत्यावर निष्ठा ठेवा. ख्रिस्ती धर्माच्या गोष्टी खोट्या आहेत असा ग्रह धरून बसूं नका, तर निरपेक्ष बुद्धीनें तो खरा किंवा खोटा हें पहा. या शोधासाठीं ईश्वराचें साहाय्य मागा. ही विशेष अगत्याची गोष्ट आहे. कारण त्यावर इहलोकीं व परलोकीं सुख किंवा दुःख प्राप्त होणें अवलंबून आहे. याकरितां ज्यानें आपणांस निर्माण केलें त्या परमेश्वराचें साहाय्य मागा आणि मनोभावें व निरंतर त्याची प्रार्थना करून अज्ञान व दुराग्रह घालवून टाका व जें सत्य तें प्रगट कर असें त्याजपाशीं मागणें मागा.

ही माझी विनंती केवळ तुमच्या स्वतःच्या कल्याणासाठीं आहे. तुमचीं मुलेंमाणसें, तुमचे मित्र, तुमचा देश या सर्वांविषयीं तुह्मी विचार करा अशी निकड तुमच्यामागें मी लावीत नाहीं. यावरून त्यांकडे दुर्लक्ष्य करा असें माझें ह्मणणें नाहीं. बिचारी ही भरतभूमि केव्हां बरें खरी सुखी होईल? या देशांतील लोकांची जातिभेदामुळें माजलेली दुही जाऊन त्यांच्यांत ऐक्य केव्हां होईल? हजारों वर्षांपासून उत्तरोत्तर नीचावस्था प्राप्त झालेले या देशांतील लोक सर्व उत्तम गोष्टींत पाश्चिमात्य लोकांशीं बरोबरी करून त्यांवर सरशी करतील असा सुदिन केव्हां येईल? या सर्व प्रश्नांचें उत्तर एकच आहे: तें हें कीं हिंदु लोक ख्रिस्ती झाल्याशिवाय कांहींएक होणार नाहीं.

या अति महत्त्वाच्या विषयावर जितका विस्तार करावा तितकें चांगलें. परंतु तसें करण्यास अवकाश आहे कोठें? ह्मणून हात जोडून मी तुमची इतकीच विनंती करितों कीं तुह्मी आपल्या आत्म्याविषयीं व वर्तनाविषयीं देवाला जबाबदार आहां हें सदैव लक्ष्यांत ठेवा.

हिंदु लोकांस नीतिधैर्य बिलकुल नाहीं हा त्यांचा कमीपणा नेहमीं उघडकीस आणितात. निदान तुमच्याविषयीं तरी लोक तसें न ह्मणोत.

धैर्य धरा! मर्दुमकीनें वागा! स्वतःला व देवाला तरी निदान फसवूं नका.

आईबाप, मुलेंमाणसें इत्यादिकांस सोडणें ह्मणजे प्रत्यक्ष मरणापेक्षां जास्त यातनेचें आहे असें असून तुह्मी घरदार सोडून इकडे या अशा प्रकारचा उपदेश जेव्हां मी व मजसारखे दुसरे मिशनेरी लोक करितात तेव्हां आह्मांवर निर्दयपणाचा आरोप नेहमीं होत असतो.

परंतु आह्मी निर्दय नाहीं. ख्रिस्ती धर्म स्वीकारणारांची आह्मांस फारच दया येते; व त्यांच्याकरितां प्रभू येशू ख्रिस्ताचें हृदय तर तिळतिळ तुटतें. जो सत्याचा अंगीकार करतो, तो आप्तसंबंधी वगैरे यांस मुकतो हें प्रभूनें आधींच जाणून कथन करून ठेविलें आहे.

ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानें जें वियोगजन्य दुःख होतें तें फार असह्य आहे हें प्रभु जाणून होता. तथापि तो ह्मणतो कीं "जो कोणी मजहून बाप किंवा आई यांवर अधिक प्रीति करितो तो मजकडे येण्यास योग्य नाहीं."

या संसारांत सत्य व प्रिय यांची नेहमीं सांगड असते असें नाहीं. त्यांतून कोणतें पतकरावें याचा विचार तुह्मांस वारंवार करावा लागेल. मनुष्य आपलें कर्तव्य बजावूं लागला कीं त्याच्यामागें संकटें आलींच, परंतु तेवढ्यामुळें त्यानें डरतां कामा नये. कारण खऱ्याला मरण नाहीं व मारल्यापेक्षां तारता श्रेष्ठ आहे. सन्मार्ग सोडून मनुष्यानें केस-भर देखील वांकडें पाऊल टाकूं नये, कारण तसें केल्यानें परमेश्वराचा क्षोभ आपल्यावर खास होणार हें पक्कें मनांत वागवावें. इतकें असून जर तो मर्यादेच्या बाहेर जाईल तर जावो बापडा!

कोणाला तुह्मी विशेष पूज्य समजतां? ज्यांनीं संकटें सोसून आपला देह झिजविला व जे आपल्या कर्तव्यास जागले त्यांहून दुसरे कोण बहुमानास पात्र आहेत? जो देशाभिमानी जीविताशा सोडून देशकार्याकरितां आपला देह अर्पण करितो किंवा जो सत्याकरितां बळी पडतो, असेच पुरुष मानास पात्र होत.

जो सत्याकरितां संकटें सोसतो त्यास परिणामीं अत्यानंद झाल्याशिवाय रहात नाहीं. इतकेंच केवळ नव्हे तर तो संकटें भोगीत असतांनाच त्यास आनंदाचें भरतें येतें. पौलस साधु यानेंही हेंच ह्मटलें आहे : या दुःखांतच जें समाधान प्राप्त होतें त्यापुढें तें दुःख कांहींच वाटत नाहीं. दुःखितांचें समाधान करणें यांतच ख्रिस्ताला आनंद वाटतो.

अनेक वेळां माझ्या पहाण्यांत असें आलें आहे कीं ख्रिस्ती होणाराचे जे नातलग आधीं त्याच्याशीं वांकडे होते तेच पुढें त्याजवर जास्त प्रेम व विश्वास ठेवूं लागले; कारण ख्रिस्ती झाल्यामुळें त्या मनुष्याचें प्रेम आपणांवर जास्त होत गेलें असें त्यांस दिसून आलें. तुमचेही नातलग तुह्मांशीं असेंच वागतील अशी मला उमेद आहे.

जर आपण लक्ष्य पुरवाल तर ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेबद्दल तुमची खातरी झाल्यावांचून रहाणार नाहीं, पण तुह्मी लक्ष्य न द्याल तर पुष्कळ प्रमाणें देऊन तरी काय उपयोग? त्यांची योग्यता तुम्हांस कशी कळावी? अमुक गोष्टीवर विश्वास ठेवा ह्मणून कोणी कोणावर सक्ती करूं शकत नाहीं.

ख्रिस्ती धर्म व स्वभावसिद्ध धर्म यांचें परस्पर जसें अनेक गोष्टींत साम्य आहे तसें पुराव्याचे बाबतींतही आहे हें निराळें सांगणें नको. स्वभावसिद्ध धर्माप्रमाणें पहातां देवानें मनुष्यास विवेकशक्ति दिली आहे. तिचा मनावर चांगला दाब असतो. त्या विवेकबुद्धीस धरून जर ते चालले तर ते आपलें कर्तव्य ओळखून तदनुसार आपलें आचरण करतील; परंतु तेच जर विवेकबुद्धीस झुगारून देतील तर त्यांच्या सर्व कृत्यास हरताळ लागला ह्मणून समजावें. साक्षात् ईश्वराचेंच अस्तित्व कबूल करा असा कोणी

प्रमाणें पुरींशीं आहेत, अतिशय नाहींत.

कोणावर जुलूम करीत नाहीं. तथापि ईश्वर असल्याबद्दलचे पुरावे हवे तितके सांपडतील, मग ते तुह्मी माना अगर नका मानूं; पण त्यांवरून मनोभावानें विचार करणाऱ्याची खातरी होईलच. ख्रिस्ती धर्माचीही गोष्ट अशीच आहे. धर्म ह्मटला कीं त्यांत नीतीचें अनुशासन येतेंच. मग तो धर्म ईश्वरप्रणीत असो किंवा स्वभावसिद्ध असो. जशी आमच्या मनाची नैतिक स्थिति असेल तीप्रमाणें आम्ही धर्माज्ञा पालन करण्यास तत्पर राहूं. तद्वत् धर्माच्या खरेपणाबद्दलचे पुरावे आमच्या मनाच्या नैतिक स्थितीवर अवलंबून आहेत. व त्यांचें मर्म ओळखणें हेंही तदनुसार आहे.[१] जाणून बुजून आज्ञाभंग करणारापुढें कोणतेंही प्रमाण मांडा, त्यास तें सहसा खरें वाटणार नाहीं. नास्तिक, नीतिभ्रष्ट, संसारनिमग्न व हलकट लोकांची चांगली खातरी होणें कठीण आहे. स्वतः ख्रिस्तानें याविषयीं ह्मटलें आहे तें पहा: "जर कोणी देवाच्या इच्छेप्रमाणें वागेल तर त्यास माझा उपदेश देवापासून आहे किंवा नाहीं हें कळेल." योहान ७: १७. यावरून धर्माविषयीं शोध करणाराचें वर्तन किती उत्तम असलें पाहिजे हें दिसून येईल. हिंदु ग्रंथकारांनींही असेंच ह्मटलें आहे. "सत्याची जिज्ञासा ज्यांस आहे तेच मात्र वाद करण्यास योग्य" असें विश्वनाथ भट्टाचार्य यांनीं ह्मटलें आहे. वेदान्तसाराच्या आरंभीं असेंच वचन आहे.

तर तुह्मी आपलें मन खंबीर होईल अशी योजना करा. बुद्धीनें सरळ, मनानें उत्सुक व वागण्यांत लहान बालकाप्रमाणें होण्यास तुह्मी झटा. पावलोपावलीं तुह्मी चुकीस पात्र असून दुराग्रहाच्या फाशांत तुह्मी सहज पडणारे आहांत हें तुह्मीं सतत लक्ष्यांत वागविलें पाहिजे. तुह्मी आपला सर्व भार देवावर टाका व त्यानें तुह्मांस सहाय व्हावें यासाठीं तुह्मी आक्रोश करून त्यास आळवा.

रडून मागा असें जें मीं तुह्मांस आतां सांगितलें त्याचें तुह्मांस आश्चर्य वाटतें काय? पण तें कां वाटावें? अंतर्दृष्टीवर जेव्हां दुराग्रहाचीं व दोषाचीं पटलें येतात व सर्वत्र अंधकार होऊन जातो तेव्हां पश्चात्तापानें व प्रेमाश्रूंनीं मात्र त्यांचें निरसन होतें. असें झाल्यानें देवाच्या पवित्र शास्त्रांतील सत्य तुह्मांस दिसूं लागेल.

हिंदु धर्मावरील तुमचा विश्वास लवकरच उडेल, कारण ज्ञानाचा प्रसार झपाट्यानें होत चालल्यामुळें तुमचा वडिलोपार्जित धर्मावरील विश्वास टिकून रहाणार नाहीं. असें झाल्यावर तुह्मी कोणता धर्म स्वीकारणार? पारशी धर्म स्वीकारणार? का मुसलमान बनणार? किंवा होणार तरी काय? यांपैकीं कोणताही धर्म तुह्मी पतकरणार नाहीं. कारण जरी ते धर्म ईश्वरप्रणीत ह्मणून मानलेले आहेत तरी एक क्षणभर देखील त्यांचें

---

[१] Butler's Analogy, Part ii. chap vi. मनुष्याच्या स्वभावाची पारख करण्यास शुभवर्तमानासारखी दुसरी कसोटी क्वचित्च आढळेल असें जें ग्रोटीअस याचें ह्मणणें आहे त्याचा अनुवाद बटलरनें आपल्या ग्रंथांत केला आहे.

साम्य खिस्ती धर्माबरोबर होणार नाहीं. निःशास्त्रवाद तुह्मांस पसंत आहे काय? असें जर असेल तर मग तुमच्या मतें ईश्वर केव्हांही व कोठेंच प्रगट झाला नसून तो माणसांबरोबर बोलला चालला हें सर्व थोतांड आहे. ईश्वर आपला मायबाप असून आपण त्याचीं दुर्बल, सदैव चुकणारीं, अज्ञान व निराश्रित अशीं लेंकरें आहों. असें जर आहे तर त्यानें आपणांवर दया करूं नये असें होईल तरी कसें? कारण बापाचें अंतःकरण मुलांकडे ओढावें व त्यांची त्यास दया यावी हें साहजिकच आहे. परमेश्वर इतका निर्दय आहे काय कीं तो आह्मांस निराधार सैरावैरा भटकूं देईल? छे! छे! असें त्याचे हातून कधींही घडणार नाहीं. तो दयासागर आहे ह्मणून असें बोलूं नका व मनांत देखील आणूं नका.

एकदा तुह्मी निःशास्त्रवादी बनलां कीं तुमच्या सर्व जन्माचें मातेरेंच झालें ह्मणून समजा. मग तुह्मांस उत्साह ह्मणून कशांतही रहाणार नाहीं. निःशास्त्रवादांत ज्या खऱ्या गोष्टी आहेत त्या सर्वांचा समावेश खिस्ती धर्मांत झालेला असून त्यांशिवाय खिस्ती धर्मांत अनेक समाधानाच्या गोष्टी आहेत, त्या इतरत्र सांपडणें कठीण. त्या अशा आहेत कीं त्यांच्या योगें तुमची संसारयात्रा तुह्मांस सुखावह होऊन मरणसमयीं तुह्मांस त्या आधारभूत होतील—तर असा मार्ग तुह्मांस अवश्यमेव पाहिजेच आहे हें तुह्मी कसें जाणत नाहीं?

मृत्यु तर अगदीं दाराशीं येऊन बसला आहे. तुह्मां आह्मांस लवकरच त्या न्यायी, सर्वज्ञ, व पवित्र न्यायाधीशापुढें आपली झडती द्यावी लागेल. जर तुह्मी आज मितीला सावध होऊन विचार करीत नाहीं, प्रार्थना करीत नाहीं तर मग तुमच्या या अशा अविचाराबद्दल व अनीतीबद्दल तुह्मी काय जाब द्याल? त्या न्यायाधीशापुढें तुह्मांस नेऊन उभें केलें ह्मणजे त्याची दृष्टि तुह्मांकडे वळतांच तुमचा थरकांप झाल्यावांचून राहील काय? ईश्वरी गर्जना कानीं पडतांच क्षणभर तरी तुमचा टिकाव लागेल काय? व जें शासन तुह्मांस तो ठरवील तें शांतपणें ऐकून घेण्यास तरी तुमचें धैर्य राहील काय?[१]

ईश्वरास कसपटाप्रमाणें लेखूं नका. तो निर्दय नाहीं, तथापि तो जें कांहीं करितो तें न्यायानेंच करितो. ज्या बुद्धीनें मीं हीं पत्रें लिहिलीं आहेत तिजबद्दल मी ईश्वरास जसा जबाबदार आहें तसे तुह्मीही पण ज्या दृष्टीनें तीं अवलोकन कराल तिजबद्दल त्यास जबाबदार आहां.

पतितांस पावन करणारा जो प्रभु येशू खिस्त त्याजवर तुमचा पूर्णपणें विश्वास बसावा व असें केल्यानें जी शांति हें जग जाणत नाहीं, व देऊं शकत नाहीं व तुह्मांपासून हिरावूनही घेऊं शकत नाहीं ती शांति तुह्मांस प्राप्त होवो, अशी शेवटीं त्या परम दयाळू परमेश्वरापाशीं माझी अंतःकरणपूर्वक प्रार्थना आहे. कळावें लोभ असावा हे विज्ञापना.

आपला मित्र—.

---

[१] परिशिष्ट १ पहा.

# परिशिष्ट. १.

## पत्र पहिलें व सतरावें पहाणें.

### रा. गणपत लक्ष्मण यांचें जीवनचरित्र.

या पुस्तकाचे ५व्या पृष्ठावर "एक तरुण माझ्या नजरेसमोर आहे" असें ह्मटलें आहे. तो तरुण कोण असा प्रश्न सहज उद्भवतो ह्मणून त्याचें जीवनचरित्र थोडक्यांत देणें इष्ट दिसतें. त्या तरुणाचें नांव गणपत लक्ष्मण. मूळारंभीं हीं पत्रें त्यासच लिहिलीं होतीं, आणि हीं पत्रें पुस्तकरूपानें पहिल्यानें छापून निघण्याचे सुमारास त्यास मरणानें आटोपलें! मानवी आयुष्य हें किती क्षणभंगुर आहे याविषयीं जो मजकूर पहिल्या पत्रांत आला आहे तो त्याच्या नजरेखालून गेला होता; परंतु त्याचें प्रत्यंतर त्याच्या मरणावरून मिळेल हें कोणाचे स्वप्नीं देखील आलें नव्हतें.

गेल्या पन्नास वर्षांत या देशांतील पुष्कळ तरुण मृत्यूच्या दाढेंत सांपडल्यावरून आह्मांस फार दुःख झालें आहे. मुंबईस इ० १८४४ सालीं Natives' Friend ह्मणून एक पत्र निघत असे. त्याच्या जूलाय महिन्याच्या अंकांत गणपत लक्ष्मण याचे मरणाचे संबंधानें पुढील मजकूर आला होता:

"गणपत लक्ष्मण या नांवाच्या विद्याभिलाषी तरुणास ठाणें एथें शनिवार ता० ६ जूलाय रोजीं थोड्या दिवसांच्या आजारानें देवाज्ञा झाली, हें कळविण्यास आह्मांस फार दुःख वाटतें.

"गणपतरावाच्या हातचे लेख Oriental Christian Spectator आणि Natives' Friend या पत्रांत वारंवार येत असत. त्याच पत्रांमधून हिंदुस्थानांतील सामाजिक सुधारणा या विषयावर त्यानें एक उत्तम निबंध छापून प्रसिद्ध केला होता, व त्यावद्दल त्यास सोन्याचें पदक बक्षीस मिळालें होतें. नुक्तेच मुंबईतल्या तरुणांनीं बक्षिसासाठीं जातिभेदावर निबंध लिहिले, त्यांत गणपतरावाचा नंबर पहिला आला. या इलाख्याच्या कालेजांतील तरुणांमध्यें निबंध लिहिण्यांत याचा हात धरणारा सांपडणें कठीण. त्याची इंग्रजींत भाषण करण्याची शैलीही तशीच प्रशंसनीय होती.

"जर गणपतरावास इतक्यांत मरणानें आटोपलें नसतें तर या देशाच्या सुधारणेच्या कामीं त्याकडून मोठी मदत मिळाली असती, आणि त्याच्या देशबांधवांत इंग्लिश भाषेचा अभ्यास फैलावयास तो पुष्कळ अंशीं कारणीभूत झाला असता. परंतु त्याहूनही मोठी अनिष्टकारक गोष्ट त्याच्या अकालिक मरणानें झाली; ती कोणती ह्मणाल तर धर्माचें महत्त्व समजून त्याविषयीं विचार करण्याचे अगोदर मरणानें त्यावर हल्ला केला. गणपतराव हा निःशास्त्रवादी बनला होता, आणि हा परिणाम त्याच्या धर्मशून्य शिक्षणाकडून झाला यांत किमपि संशय नाहीं. ख्रिस्ती धर्माचा पाया फार मजबूत आहे हें मिशनेरी लोकांच्या सहवासानें त्यास पक्कें माहीत झालें होतें, तथापि त्या धर्माकडे मुळींच त्याचा कल नव्हता.

मरणाअगोदर एक दोन आठवडे त्याचें आह्मांस पत्र आलें होतें, त्यांत प्रकृति नीट नाहीं वगैरे मजकूर असून अखेरीस पुस्तकें कोणतीं वाचावींत असा प्रश्न केला होता. प्रकृति अगदीं क्षीण होत चालली असून ज्ञानप्राशन करण्याची इतकी आवड! परंतु अमर आत्म्याच्या भूकतहानेविषयीं मुळींच विचार नाहीं, व ख्रिस्ती धर्माच्या ज्या गोष्टी त्याच्या कानीं पडल्या होत्या त्यांविषयीं पत्रांत कांहीं उल्लेख केलेला नाहीं. किती दुःखकारक गोष्ट ही!

"गणपतरावाच्या मरणाकडून हिंदुस्थानांतील तरुणांस पुष्कळ बोध व्हावा. आपला अभ्यास संपून चाकरी लागल्यावर सावकाशपणें धर्मसंबंधी विचार करतां येईल असा साधारणतः तरुणांचा समज असतो. गणपतरावाची तरी अशीच समजूत होती. परंतु मरण आमचा अभ्यास संपला किंवा नाहीं, नौकरी लागली किंवा नाहीं याची वाट कोठें पहात बसतें? गणपतरावानें धर्मसंबंधी विचार करणें हें फार अगत्याचें आहे असें कबूल केलें होतें, व पुढें लवकरच तो करीन असा निश्चय देखील केला होता; परंतु तें सर्व जागच्या जागींच राहिलें.

"गणपतरावानें संपादलेलें ज्ञान मरणसमयीं त्याचे काय कामीं पडलें? त्या ज्ञानाकडून त्याच्या मरणोत्तर स्थितीविषयीं कांहीं तयारी झाली नाहीं. मरणाच्या अंथरूणावर ख्रिस्ती धर्माकडून जें समाधान प्राप्त होतें त्याचा लवलेश देखील त्यास प्राप्त झाला नव्हता; मग जी आशा धरून ख्रिस्ती लोक परलोकीं जातात तिचा अभाव त्याच्या ठायीं होता यांत आश्चर्य तें कोणतें?

"हा विचार मोठा गंभीर आहे, व याकडे आमचे तरुण वाचकांनीं लक्ष्य पुरवावें अशी त्यांस आमची सविनय प्रार्थना आहे. तुह्मी मरण्यास सिद्ध आहां किंवा नाहीं याविषयीं अगत्य विचार करा. मरण हें किती गूढ आहे, व त्याचा दरारा किती मोठा आहे! साक्षात् देव जो आमचा उत्पन्नकर्ता आणि न्यायाधीश त्यापुढें मरणानंतर उभें राहायाचें, या विचारानें छाती दडपते. मरणाची तयारी कशी असावी हें ख्रिस्ती धर्माकडून मात्र व्यक्त होतें. ज्याचा विश्वास ख्रीस्तावर दृढ आहे त्याला मरणाचें काडीमात्र भय वाटत नाहीं. 'अरे मरणा, तुझी नांगी कोठें? अरे मृतलोका, तुझा जय कोठें?' या प्रकारचे उद्गार मरणसमयीं त्याचे मुखांतून निघत असतात. नास्तिक व मूर्तिपूजक लोक इहजन्मास अगदीं बिलगून रहातात, व मरणाचें नांव घेतलें असतां त्यांच्या सर्वांगाचा थरकांप होतो. आमचे वाचकांपैकीं बहुतेकांचा विश्वास त्यांच्या धर्मावरून उडाला आहे व ते निःशास्त्रवादी बनले आहेत. तर आमचें त्यांस प्रांजलपणें असें विचारणें आहे कीं अशा मताकडून मनाचें समाधान होऊन ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं समाधान मिळतें काय?

"गणपतराव लक्ष्मण यांचें मरण या देशांतील सर्व तरुणांस सांगत आहे कीं देवाच्या भेटीस तयार व्हा."

---

# परिशिष्ट. २.

## पांचवें पत्र पहाणें.

### १. अद्भुत चमत्कार करण्याचा उद्देश.

ईश्वरदत्त शास्त्र जरी पूर्ण आहे तरी अद्भुत चमत्कारांची त्यांत भर पडल्यानें त्यास विशेष बळकटी येते असें कित्येक अर्वाचीन ग्रंथकारांचें मत आहे. परंतु असें समजण्यापेक्षां आरीजीन, अथिनेसिअस, आगस्तीन वगैरे जे प्राचीनकाळीं ख्रिस्ती ग्रंथकार होऊन गेले त्यांचें चमत्कारांविषयीं जें मत होतें तें आह्मांस अधिक ग्राह्य वाटतें. त्यांचें असें मत होतें कीं ईश्वरदत्त धर्मशास्त्रांत जर चमत्कार नसते तर तें त्यांशिवाय अपूर्णच रहातें. ऐकीव किंवा लेखी गोष्टीपासून जितका बोध होतो तितकाच बोध चमत्कारांपासूनही होतो. त्यांत अंतर इतकेंच कीं चमत्कारांत कृति असल्यामुळें त्यांचा ठसा मनावर लागलाच उमटतो. ख्रिस्ताचे चमत्कार ख्रिस्तालाच शोभविणारे होते; कारण त्यांपासून त्याचें दयालुत्व व शक्ति हीं प्रगट झालीं. ख्रिस्तानें चमत्कार केले यांत नवल करायाला नको; कारण अशा थोर पुरुषाकडून अशीं थोर कृत्यें झालीं नसतीं तर मात्र नवल करावें लागतें.

सर्व अमानुष कृत्यें मग तीं प्रत्यक्ष ईश्वरानें केलेलीं असोत अगर करवलेलीं असोत, त्यांत ईश्वराचें कर्तृत्व स्पष्टपणें दिसून येतें व ह्मणूनच अद्भुत चमत्कार हें त्याच्या साक्षात्काराचें प्रत्यक्ष प्रमाण आहे असें ह्मटलें पाहिजे.

### २. चमत्कार, सृष्टि व सृष्टिनियम ह्मणजे काय?

चमत्कारांविषयीं विचार करीत असतांना, **चमत्कार, सृष्टि** व **सृष्टिनियम** या तिन्ही शब्दांची व्याख्या बरोबर समजणें मोठें अगत्याचें आहे. या शब्दांच्या व्याख्या बरोबर न समजल्या तर पुष्कळ घोंटाळा होण्याचा संभव आहे.

**चमत्कार** हा शब्द अनेकार्थी आहे. केव्हां केव्हां मनुष्याच्या शक्तीनें न होणाऱ्या कृत्याला तो लावतात. जानसन साहेबानें आपले कोशांत चमत्काराची व्याख्या या प्रकारें दिली आहे: "एखाद्या गोष्टीच्या प्रमाणार्थ मानवी शक्तीच्या पलीकडे जी घडलेली गोष्ट तीस चमत्कार ह्मणावें." केव्हां केव्हां जी गोष्ट केवळ ईश्वर आपलेच सामर्थ्यानें करितो तीस चमत्कार ह्मणतात. वेब्स्टर साहेबांनीं चमत्कार केवळ सर्वसमर्थ परमेश्वराकडून मात्र होतात असें ह्मटलें आहे. यांपैकीं जानसनच्या व्याख्येस अधिक संमति मिळते.

"सृष्टिनियमांचें अतिक्रमण" अशी ह्यूम आदीकरून जे नास्तिक ग्रंथकार आहेत त्यांनीं चमत्काराची व्याख्या केली आहे. ही व्याख्या प्रोफेसर हक्स्ले साहेबास कबूल नाहीं. "सृष्टिक्रमांत व्यत्यय येणें" यासच चमत्कार ह्मणावें असें दुसरे कित्येक ह्मणतात. या दोन व्याख्यांपैकीं पहिली तर मुळींच अग्राह्य व दुसरी अगदीं अपूर्ण असून संदिग्ध आहे.

Duke of Argyll साहेबांनीं The Reign of Law नामक पुस्तकांत या विषयाची पुष्कळ वाटाघाट केली आहे, व ज्या नियमांनीं ही पंचभूतात्मक सृष्टि आकळली आहे त्याच नियमांस अनुसरून चमत्कार झाले असावे असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. ते असें ह्मणतात कीं "ईश्वर या सृष्टीची व्यवस्था कार्यानुरूप साधनांनीं लावतो, व त्या नियमांचें तोही उल्लंघन करीत नाहीं हें सप्रमाण दाखवितां येईल. ह्मणून अद्भुत चमत्कार हे देखील सृष्टिनियमास अनुसरून झाले असावेत, मात्र ते नियम सामान्य किंवा आमच्या माहितींतले नसून विशेष प्रकारचे असावेत. या विशेष नियमांचें ज्ञान यदाकदाचित् झालेंच तरी त्यापासून आपल्यास उपयोग होईल किंवा नाहीं याविषयीं शंकाच आहे."[१] एखादें कृत्य सृष्टिनियमानेंच झालेलें असून जर आपल्या अल्प ज्ञानामुळें तो सृष्टिनियम आह्मांस कळला नाहीं तर आपण त्या कृत्यास अद्भुत चमत्कार हें नांव देऊन त्याच्या कर्त्याच्या आंगीं अमानुष शक्ति व ज्ञान आहे असें मानूं. तथापि सर्व अद्भुत चमत्कार एकाच नियमानें झाले असतील असें ह्मणणें गैर आहे. President McCosh ह्मणतात: "सृष्टीमध्यें चहूंकडे नियमांचें बंधन आहे. परंतु अमुक एका नियमाप्रमाणेंच अमुक एक कार्य ईश्वरानें केलेंच पाहिजे असें ह्मणणें हा मोठा प्रमाद होईल."[२]

सृष्टिनियम किंवा सृष्टिक्रम याविषयीं विचार करीत असतांना सृष्टि किंवा इंग्रजींत Nature ह्मणून जो शब्द आहे त्याचा योग्य अर्थ लक्ष्यांत आणणें फार अगत्याचें आहे. सृष्टि ह्मणजे देवानें उत्पन्न केलेलें जग. हा त्या शब्दाचा साधारण अर्थ झाला. तथापि सृष्टिक्रमामध्यें मनुष्यानें आपल्या इच्छेप्रमाणें जे फेरफार केले आहेत ते जमेस घेतले पाहिजेत. शिवाय, ज्याअर्थीं या जगतांत नीतिसंबंधी व सृष्टपदार्थसंबंधी असे दोन प्रकारचे नियम आहेत त्याअर्थीं त्या दोहोंची गणना सृष्टिनियमांखालीं केली पाहिजे. नीतिसंबंधी नियमांची गणना सृष्टिक्रमामध्यें आहे हें ठरविल्याखेरीज या वादांत पडणें योग्य होणार नाहीं. आतां जगाच्या व्यवस्थेंत कार्याच्या महत्त्वाप्रमाणें ईश्वरानें वेळोवेळीं हात घातला असेल असें पूर्ण संभवतें. या न्यायानें चमत्कार हे सृष्टिक्रमाचाच भाग आहेत असें ठरतें.

### ३. चमत्कार शक्य आहेत काय?

कित्येक ग्रंथकारांचें असें मत आहे कीं सृष्टिक्रम अचल असल्यामुळें चमत्कार घडणें हें अगदीं अशक्य आहे. परंतु मनुष्याला देखील सृष्ट पदार्थांच्या स्वरूपामध्यें बराच फेरबदल करून त्यांस आपल्या आटोक्यांत ठेवतां येतें. उदाहरणार्थ, अशी कल्पना करा कीं गुरुत्वाकर्षणाच्या नियमाप्रमाणें जमिनीवर एके ठिकाणीं दगड पडलेला आहे. मी त्या दगडाला उचलतों, म्हणजे गुरुत्वाकर्षण जें त्या दगडावर होत आहे तें मी रद्द करून चाळीस फूट उंचीवर तो नेऊन ठेवितों. पृथ्वीचे पृष्ठभागावर मनुष्याचे हातून असे

---

[१] Reign of Law, पृष्ठ १६.

[२] The Supernatural in relation to the Natural नामक पुस्तकाचें १६७वें पृष्ठ पहावें.

फेरबदल पुष्कळ झाल्यामुळें त्याला निराळेंच स्वरूप आलें आहे. जर मनुष्यास ही शक्ति नसती तर आज पृथ्वीचा पृष्ठभाग वेगळ्याच तऱ्हेचा असता. मनुष्य ह्या ज्या उलाढाली पृथ्वीचे पृष्ठभागावर करीत आहे तेणेंकरून पुष्कळ देशांची हवा व उत्पन्न हीं अगदीं बदलून गेलीं आहेत. तथापि या उलाढालींकडून सृष्टीवर बलात्कार होतो आहे असें मुळींच नाहीं. कारण ह्या उलाढाली सहज करतां याव्यात अशीच मुळीं सृष्टि रचलेली आहे. मनुष्याला या प्रकारें उलाढाली करून पृथ्वीचा पृष्ठभाग बदलतां येतो व सृष्टींतील नेम रद्द करितां येतात तर मग असा अधिकार ईश्वराला नाहीं असें ह्मणणें किती अप्रयोजक होईल. या प्रकारचा अधिकार ईश्वरास नाहीं म्हटल्यानें जग हें ईश्वराधीन नाहीं, दैवाधीन आहे असें म्हणावें लागेल. ईश्वराची चमत्कार करण्याची जी शक्ति आहे तिच्याच तोडीची मनुष्यामध्यें सृष्ट पदार्थांत अत्यल्पांशानें फेरबदल करण्याची शक्ति आहे.

सृष्टिक्रम बदलूं शकत नाहीं असा कित्येक ग्रंथकारांचा अभिप्राय फार नेटाचा आहे. परंतु शास्त्रीय शोधांवरून देखील हें विधान अगदीं खोटें ठरतें. Sir Charles Lyell नामक प्रसिद्ध भूगर्भशास्त्रवेत्ता असें म्हणतो कीं सृष्टिक्रम बदलूं शकत नाहीं असें जर कोणी अभिमानानें बोलतो तर भूरचनेंत जे फेरफार झाले आहेत ते त्यानें पहावेत म्हणजे त्याचें बोलणें निवळ हट्टवादाचें आहे असें त्याचें त्यासच दिसून येईल. या मतास John Stuart Mill याचें अनुमोदन आहे. तो ह्मणतो, "परमेश्वर जर परमज्ञानी व सर्वशक्तिमान् आहे तर मग चमत्कारांमुळें सृष्टिक्रमाचें उल्लंघन होतें हें बोलणें बरोबर नाहीं. (System of Logic, Chapter, xxv. पहावा.) चमत्कार घडला यास भरपूर पुरावा असला ह्मणजे पुरे आहे; परंतु विचार करण्यापूर्वीं अद्भुत चमत्कार शक्य नाहींत असें विधान ठोकून देणें हा शुद्ध मूर्खपणा होय."

## ४. शंकानिवृत्ति.

ज्या अद्भुत चमत्कारांत केवळ शक्तीचा प्रादुर्भाव आहे त्यांवरून एखादी गोष्ट ईश्वरदत्त ठरते कीं काय किंवा तसें सिद्ध करून दाखविण्यास त्या चमत्कारांत सद्धेतुच असला पाहिजे कीं काय अशी शंका वारंवार घेण्यांत येते. याचें उत्तर **चमत्कार** या शब्दाचे व्याख्येवर आहे. वेब्स्टर साहेबांच्या व्याख्येप्रमाणें ईश्वर मात्र करूं शकतो, असें जर घेतलें तर शक्तीचा प्रादुर्भाव ज्यांत आहे अशा चमत्काराकडून पुराव्याचा कार्यभाग होणार आहे. पण चमत्कार ह्मणजे अमानुष कृत्य असें जर आपण समजलों तर त्यांत शक्तीचें प्रदर्शन असून त्या मताचा किंवा चमत्काराचा सद्धेतु व्यक्त झाला पाहिजे. **चमत्कार** या शब्दाचा उपयोग साधारणतः या शेवटल्या अर्थानें करितात.

## ५. चमत्काराचे प्रकार.

चमत्कार घडण्याचे प्रकार दोन असतात. जेव्हां कोणी अमानुष पुरुष आपले योजनेनें एखादें कार्य करितो तेव्हां; किंवा, जेव्हां सृष्टींतील एक नियम दुसऱ्या नियमावर वरचढ करितो तेव्हां. दुसऱ्या प्रकाराचें उदाहरण आपणांस जुन्या करारांत सांपडतें. तेथें या प्रकारें

लिहिलें आहेः " परमेश्वरानें बळकट पूर्वेच्या वाऱ्याकडून समुद्र रात्रभर सारून सारून कोरडा केला व पाणी दुभागलें." पाण्याचें जें गुरुत्वाकर्षण तें चंडवातानें नष्ट झालें. या ठिकाणीं सृष्टींतील एका नियमाचें कार्य दुसऱ्या नियमाकडून मोडण्यांत आलें. तथापि हा चमत्कार ईश्वरानें स्वतः होऊन केलेल्या गोष्टीइतकाच अद्भुत होता, बिलकुल कमी नव्हता.

## ६. नास्तिक लोकांची खटपट.

ख्रिस्तानें चमत्कार मुळींच केले नाहींत असें शाबीत करण्यांत नास्तिक लोक निरर्थक श्रम करितात. कारण ख्रिस्तासारखा नीतिश्रेष्ठ पुरुष या जगांत दुर्मिळ. हेंच एक मोठें चमत्काराचें ठळक उदाहरण, तें कोणाच्यानें नाकबूल करवणार नाहीं.

ख्रिस्तानें जे चमत्कार केले ते अद्भुत तर खरेच पण त्यांहूनही त्याचें नीतिवर्तन विशेष अद्भुत होतें. यावरून चमत्काराचे दोन प्रकार झाले हें उघड आहे: ह्मणजे सृष्ट पदार्थसंबंधी चमत्कार व वर सांगितलेला नैतिक प्रकार.

## ७ चमत्कारांत कोणतीं लक्षणें असणें अवश्य आहे ?

Leslie साहेबांचे मताप्रमाणें चमत्कार खरोखरींच घडला किंवा नाहीं हें सिद्ध करून दाखविण्यास पुढील गोष्टी अत्यावश्यक आहेत :

१. चमत्कार इंद्रियगोचर असला पाहिजे, ह्मणजे त्याविषयींचें ज्ञान आपल्यास किंवा तत्कालीन लोकांस नेत्रकर्णादि इंद्रियद्वारें झालें, असा तो असला पाहिजे.

२. तो चारचौघांसमक्ष झाला पाहिजे.

३. तत्संबंधी कांहीं स्मारक असून त्याबद्दलची विस्मृति न व्हावी एतदर्थ कांहीं एक विधि प्रचलित असला पाहिजे.

४. या स्मारकांचा आरंभ तत्कालीन असला पाहिजे.

हीं लक्षणें सयुक्तिक आहेत हें कोणीही कबूल करील.



## परिशिष्ट. ३.

### पत्र सहावें पहाणें.

#### १. मूर्तिपूजकांच्या धर्मग्रंथांतील भविष्यांचा प्रकार.

ज्याप्रमाणें मूर्तिपूजक लोकांच्या धर्मग्रंथांतून खोटे चमत्कार सांगितले आहेत त्याप्रमाणें त्यांच्या ग्रंथांत खोटीं भविष्येंही कथन केलीं आहेत. शकुन मुहूर्त पहाण्याचें तर मूर्तिपूजक लोकांत मोठेंच बंड असे. तथापि त्यांच्या भविष्यांविषयीं बारकाईनें शोध करितां तीं जमेस धरण्यासारखीं नाहींत असें दिसून येईल. कारण त्यांत भविष्यकथन मुळींच नसून प्रसंगविशेषीं तीं केवळ अनुमानें किंवा गूढ कोडीं किंवा द्व्यर्थी वाक्यें यांपलीकडे त्यांत कांहीं नाहीं असें दिसून येतें.

मूर्तिपूजकांच्या धर्मग्रंथांतील अद्भुत चमत्कारांचीं उदाहरणें आम्हीं वर सांगितलींच आहेत. आतां भविष्यांचीं एक दोन उदाहरणें देणें इष्ट दिसतें.

लिडिया देशाचा राजा क्रीसस हा हेल्स नदी उतरून सैरस राजाशीं सामना करणार होता त्या प्रसंगीं एका ज्योतिषानें त्यास भविष्य सांगितलें तें असें:

"क्रीसस हेल्स नदी उतरल्यावर एका मोठ्या राज्याचा नाश होईल."

सैरस बादशाहाचा नाश करावा असें क्रीससच्या मनांतून होतें, परंतु अखेरीस त्याचाच नाश झाला. असे दोन्ही अर्थ त्या भविष्यांतून निघतात.

हिंदु शास्त्रें व कुराण यांतील कल्पित भविष्यांचीं उदाहरणें देण्यांत आलींच आहेत.

बायबलांतील भविष्यग्रंथांत दुटप्पी भविष्य एक देखील सांपडणें कठीण.

#### २. खरे व खोटे भविष्यवादी.

मूर्तिपूजक भविष्यवाद्यांचीं भविष्यें केवळ आवेशांत येऊन केलेल्या चेष्टा होत असें ह्मणण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ, इनियस यानें एका जोशिणीला प्रश्न विचारतां त्याचें उत्तर देतांना ती कशी क्षुब्ध झाली याचें वर्णन रोमन कवि वर्जिल यानें आपल्या काव्यांत जें केलें आहे तें पहा. यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं तें केवळ कवीचें लाघव आहे. परंतु त्या ठिकाणीं कवीनें अलंकाराची योजना केलेली नसून ईश्वरी प्रेरणा होतेवेळचा प्रकार कसा असतो याचें वर्णन केलें आहे. प्लेटोनें ह्मटलें आहे, "झोंपेनें किंवा रोगानें किंवा आवेशानें मनुष्य व्याप्त झाल्याशिवाय त्यास ईश्वरी प्रेरणा होणें अशक्य आहे."

खऱ्या भविष्यवाद्यांची गोष्ट किती निराळी आहे बरें! पौलस ह्मणतो, "भविष्यवाद्यांचे आत्मे तर भविष्यवाद्यांचे स्वाधीन आहेत" (१ करिंथ. १४: ३२). याचा अर्थ

इतकाच आहे कीं ईश्वरी प्रेरणा झाली असतांही खऱ्या भविष्यवाद्यांचें देहभान कायम असतें. ईश्वरी प्रेरणा होतेवेळीं त्यांच्या अंतःकरणांत प्रकाश पडला; त्यांचें मन उच्च स्थितीप्रत गेलें; त्यांचें हृदय सद्गदित झालें. तरी त्यांस कोणत्याही प्रकारचा क्षोभ न होऊन त्यांनीं वेडेवेडेचार केले नाहींत. याचें एक ढळढळीत उदाहरण यशाया भविष्यवादी याचे पुस्तकाचे ६व्या अध्यायांत सांपडेल. ख्रिस्ती शास्त्रांतील भविष्यें पाहिलीं असतां त्यांत उच्च प्रतीची कवित्वशक्ति दिसून येत असून भविष्यवाद्यांचें देहभान गेल्याचें मुळींच दृष्टीस पडत नाहीं.

## ३. खऱ्या भविष्याचीं लक्षणें.

१. ज्याविषयीं एखादें भविष्य कथन केलें आहे तें त्या गोष्टीच्या पूर्वींचें असलें पाहिजे.

२. ज्या गोष्टीविषयीं तें भविष्य असेल ती गोष्ट पुढें घडून येईल असें मानवी तर्कानें किंवा धोरणानें सांगतां न आलें पाहिजे.

३. भाकित केलेल्या गोष्टीची पूर्णता यथातथ्य भविष्यानुरूप असली पाहिजे.



# परिशिष्ट. ४.

## पत्र सातवें पहाणें.

### धर्म व भूगर्भ रसायनादीकरून शास्त्रें.

कित्येक ग्रंथकारांस असें वाटतें कीं ईश्वरदत्त शास्त्रांत धर्मसंबंधी गोष्टींचा समावेश व्हावा एवढेंच केवळ नव्हे, तर भूगर्भरसायन आदीकरून जीं शास्त्रें आहेत, त्यांविषयीं देखील माहिती त्यांत असणें जरूर आहे; व कित्येकांनीं याच समजुतीमुळें बायबलाच्या द्वारें धर्मेतर शास्त्रीय विषय शिकविण्यास सुरवात केली आहे. पण या प्रकारें वागण्यास मुळींच आधार नाहीं; कारण वैद्यक, किंवा रसायन, किंवा ज्योतिषादि शास्त्रें शिकविण्याचा आव ईश्वरदत्त शास्त्र घालीत नाहीं. मनुष्यास केवळ धर्मज्ञान करून द्यावें हाच त्या ग्रंथाचा अंतर्गत हेतु आहे. हें त्यांतील वचनांवरून ध्यानांत येईल. "परमेश्वराचें नेमशास्त्र पूर्ण आहे, पापापासून मन फिरवितें, परमेश्वराचा विधि खरा आहे, तो अज्ञान्यास ज्ञान देतो" (गीत. १९:७). "संपूर्ण शास्त्र देवाच्या प्रेरणेनें झालें, आणि उपदेश, आणि निषेध, सुधारणूक, न्यायीपणाचें शिकविणें यांसाठीं उपयोगी आहे" (२ तिम. ३:१६). ह्मणून भूमितीकडून इतिहासज्ञानाची अपेक्षा करणें ह्यांत जितकें शहाणपण आहे तितकेंच बायबलाकडून ज्योतिष, वैद्यक आदीकरून शास्त्रांची माहिती व्हावी ह्या बोलण्यांत आहे.

आतां दुसरा प्रश्न असा आहे कीं एखाद्या ईश्वरप्रणीत धर्मपुस्तकांत धर्मेतर विषयांचा प्रसंगोपात्त उल्लेख केला असल्यास तत्संबंधानें त्यांत कांहीं चूकभूल होण्याचा संभव आहे कीं काय. याविषयीं बराच मतभेद आहे. कित्येक ग्रंथकार यास ठाम "नाहीं" असें उत्तर देतात व दुसरे ह्मणतात कीं त्यांत असल्या तरी त्यांत मोठेंसें नवल नाहीं, कारण धर्मा-व्यतिरिक्त गोष्टींविषयीं अचूक माहिती त्यांत मिळेल असें इच्छिणें हेंच मुळीं गैरवाजवी आहे. त्यांचें असें मत पडतें कीं बायबलाचे लेखकांचीं मतें पदार्थविज्ञानसंबंधानें जीं मतें त्या कालीं प्रचलित असतील तशीं नव्हतीं अशी कल्पनाच मुळीं करतां येत नाहीं व तीं मतें प्रसंगोपात्त त्यांच्या लेखांत येऊं नयेत ह्मणून ईश्वरी प्रेरणेनें अद्भुत रीतीनें त्यांस आवरून धरण्याची आशा बाळगण्यास जागाच नाहीं.

बायबलांत धर्मेतर विषयासंबंधानें कदाचित् दोष असतील असें मानिलें तर तशा प्रकारचे दोष फारच थोडे आढळतील. हे दोष इतके क्षुल्लक आहेत कीं बायबलाचे लेखकांस अद्भुत रीतीनें शास्त्रीय विषयावरही निर्दोष रीतीनें पार पडतां आलें, ही मोठ्या अचंब्याची गोष्ट आहे. कारण प्राचीनकालच्या इतर ग्रंथांतून तत्संबंधानें असंख्य दोष सांपडतात. बायबलांतील इतिहासाची गोष्ट तशी मुळींच नाहीं. ह्मणजे बायबलाच्या प्रत्येक पानावर अनेक पुरुष व स्थलें यांचा जो उल्लेख केलेला आहे तो बिनचूक आहे. असें पाहून कोणासही आश्चर्य वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

नव्या करारानंतर जे ख्रिस्ती व मूर्तिपूजक ग्रंथकार होऊन गेले त्या सर्वांच्या लेखांत ऐतिहासिक व शास्त्रीय दोष विपुल भरले आहेत. ते सर्व दाखविण्याच्या भरीस पडणें हें ग्रंथविस्तारभयास्तव प्रशस्त दिसत नाहीं.

भूगर्भशास्त्राच्या संबंधानें कांहीं दोषारोप बायबलावर करण्यांत येतात. परंतु हे दोषारोप बहुधा भूगर्भशास्त्रपारंगत लोकांकडून न येतां केवळ अनभ्यस्तांकडून येतात. त्यामुळें त्यांची योग्यताही विशेष नाहीं हें निराळें सांगणें नको. शिवाय, भूगर्भशास्त्र हें अद्याप इतकें अपुरें आहे कीं त्यासंबंधानें दरवर्षी किंवा दरमहा किंबहुना दरदिवशींही कांहींना कांहीं तरी नवीन शोध निघतो. यामुळें तर वरील दोषांचें महत्त्व फारच कमी होत आहे.

भूगर्भशास्त्र शिकण्याकरितां बायबल मनुष्याला प्राप्त झालेलें नाहीं. यदाकदाचित् भूगर्भशास्त्र किंवा दुसरें एखादें शास्त्र बायबलांत दिलें असतें तर त्यांत प्राचीनकालच्या लोकांचा प्रवेश झाला नसता इतकेंच नाहीं तर सांप्रतकाळींही बायबलांतील शास्त्रीय विषय अद्याप अनुपलब्ध राहिले असते.

बायबलांतील उत्पत्तीसंबंधी वर्णन वाचून कित्येक नास्तिकशिरोमणि चकित झाले व तें वर्णन शास्त्रीय शोधास पूर्णपणें जुळतें असें त्यांनीं कबूल केलें आहे.

हट्टन नामक भूगर्भशास्त्रवेत्ता कांहीं दिवसांपूर्वी होऊन गेला. त्यानें ह्या सृष्टीला आदि नसून अंतही नाहीं असा सिद्धांत प्रतिपादन केला आहे, व त्यास इतर भूगर्भशास्त्रवेत्ते अनुमोदन देतात.

हा सिद्धांत ख्रिस्ती शास्त्रांत जें सांगितलें आहे त्याचे अगदीं विरुद्ध आहे. तर यांत खरें कोणतें? बायबल किंवा भूगर्भशास्त्रज्ञ पंडित हट्टन? यावर लार्ड केलविन साहेब ह्मणतात कीं सृष्टपदार्थ शास्त्रावरून वरील पंडितांचें हें विधान खोटें ठरतें. कारण सृष्टींतील शक्तीचा उत्तरोत्तर ह्रास होत जातो हा सर्वसंमत शास्त्रसिद्धांत आहे. ह्मणून या सृष्टीला आरंभ झाला हें जसें खचीत तसेंच ती कालांतरानें ह्रास पावेल हें देखील खचीत आहे. हें केलव्हीनसाहेबांचें मत ख्रिस्ती शास्त्रदृष्ट्या खरें ठरतें.



## परिशिष्ट ९.

### पत्र नववें पहाणें.

### येशू ख्रिस्ताचें वर्तन.

**रुसो** ह्या नांवाचा प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार कांहीं वर्षांमागें होऊन गेला. तो नास्तिक मताचा असल्यामुळें ख्रिस्तीधर्मद्वेष्टा होता हें निराळें सांगणें नको. त्याच कारणामुळें त्याचा ख्रिस्ताविषयींचा अभिप्राय वाचकांस सादर करणें आह्मांस इष्ट वाटतें.

तो ह्मणतो कीं "बायबलाची थोरवी पाहून मी फारच आश्चर्यचकित होतों व शुभवर्तमानांतील पवित्र गोष्टींनीं अंतःकरण अगदीं तल्लीन होऊन जातें, हें सर्व आतां मी उघडपणें कबूल करितों. मोठमोठ्या तत्त्वज्ञ पंडितांचे ग्रंथ बायबलाशीं ताडून पहातां किती फिके पडतात. तर मग अगदीं बालबोध असून गहन विचारांनीं परिपूर्ण असा जो बायबल ग्रंथ तो मनुष्यकृत असा असूं शकेल काय? व ज्याचें चरित्र त्यांत भरलेलें आहे तो मानवांहून विशेष नाहीं असें बोलण्याचें धाडस कोणाच्यानें करवेल काय? किंवा बायबल ह्मणजे धर्मवेडानें अथवा महत्त्वाकांक्षेनें ग्रासलेला एखादा एकमार्गी याची तुत्ती बडबड या पलीकडे कांहीं नाहीं असें कोणाच्यानें ह्मणवेल काय? छे, छे, असें ह्मणेल कोण? ख्रिस्ताचे भाषणांत किती माधुर्य! त्याचा विनय किती शुद्ध! त्याचा उपदेश किती मनोवेधक! त्याचीं उपदेशसूत्रें किती थोर! त्याचे उपदेश किती गहन ज्ञानानें परिप्लुत! त्याचें प्रसंगावधान किती मोठें! शंकानिवृत्ति करण्याची त्याची शैली किती खरी व गोड! मनोविकारांवर त्याचा केवढा दाब! असा सर्व गुणसंपन्न ख्रिस्ताशिवाय दुसरा कोण असूं शकेल? असा साधु पुरुष कोण आहे कीं त्याच्यासारखी कृति करून अखेरीस ढोंग व दुर्बलता हीं व्यक्त केल्याशिवाय दुःख व मरण पत्करण्यास सिद्ध असेल? ख्रिस्ताच्या यावत् चरित्रांत ढोंग किंवा दुर्बलता यांचा लवलेशही दिसून येत नाहीं.

"प्राचीनकाळीं प्लेटोनें ज्या काल्पनिक पुरुषाचें वर्णन लिहून ठेविलें आहे तो मात्र ह्या प्रकारें ख्रिस्ताच्या तोडीचा मनुष्य दिसतो, ह्मणजे तो सर्वगुणसंपन्न असून त्यावर गुन्हा केल्याचा दोषारोप आल्याचें दाखविलें आहे. हें वर्णन इतकें खुबीदार असून त्याचें ख्रिस्ताशीं इतकें सादृश्य आहे कीं तें वाचून मोठमोठ्या सत्पुरुषांस हें ख्रिस्ताचेंच वर्णन आहे असें भासलें व प्रस्तुत कालीं आह्मी तें वर्णन पाहूं गेल्यास आह्मांसही निःसंशय तोच भास होईल.

"साक्रेटीस याशीं मारयेच्या पुत्राची साम्यता करणें ह्मणजे केवढें धाडस! केवढा प्रमाद! कारण त्या दोघांत किती तरी महदंतर! साक्रेटीस यास जें मरण प्राप्त झालें तें क्लेशरहित असून त्यायोगें आपला कोणत्याही प्रकारें दुर्लौकिक होत नाहीं हें पाहून त्यास मरणाविषयीं छाती करण्यास धैर्य आलें. त्यास आज जो बहुमान आहे तो केवळ या देहांत-

शासनामुळें आहे; नाहींपेक्षां त्याची गणना सोफिस्ट लोकांत झाली असती. सदाचाराचा पहिला धडा साक्रेटीस यानें घालून दिला असें कित्येक म्हणतात, पण अशी गोष्ट मुळींच नाहीं. त्याच्यापूर्वी नीतीनें वागणारे लोक जगांत नव्हते कीं काय? तसेंही संभवत नाहीं. पूर्वींचा शिष्टाचार लोकांपुढें मांडून त्यानें तद्द्वारा नीतिबोध त्यांस केला. यापलीकडे त्यानें कांहीं केलें नाहीं. स्वदेशाभिमान ही प्रत्येकाची इतिकर्तव्यता आहे हें साक्रेटीस याचें शिक्षण जगाला मिळण्यापूर्वींच लिआनिडस यानें स्वदेशाप्रीत्यर्थ आपला प्राण खर्ची घातला होता. साक्रेटीस यानें नेमस्तपणानें राहण्याविषयीं उपदेश करण्यापूर्वींच स्पार्टा एथील लोकांत नेमस्तपणा होता हें सर्वश्रुत आहेच. सद्गुण ह्मणजे काय याची साक्रेटीस यानें दिशा दाखविण्यापूर्वींच ग्रीस देशांत पुष्कळ सद्गुणी माणसें निपजलीं होतीं. इकडे ख्रिस्ताची गोष्ट कशी आहे ती पहा. त्याचा शुद्ध उपदेश व त्याच तोडीचें त्याचें नीति-वर्तन अशा मासल्याचें एक तरी उदाहरण त्या काळच्या यहूदी लोकांत मिळण्यासारखें होतें काय? यहूदी लोकांकडे पाहूं गेलें तर ते त्या काळीं धर्मोन्मादानें निव्वळ व्याघ्ररूपी झाले होते. अशा उग्र लोकांस त्यानें गहन ज्ञान शिकविलें. अशा नीतिभ्रष्ट लोकांत ख्रिस्ता-सारखी पुण्यशील मूर्ति निपजली हें आश्चर्य नव्हे काय?

"आतां साक्रेटीस व येशू ख्रिस्त या उभयतांची तुलना केली असतां दोघांत किती महद्-दंतर आहे हें त्यांच्या प्राणोत्क्रमणाचे प्रसंगीं जो प्रकार घडला त्यावरून चांगलें व्यक्त होणार आहे.

"साक्रेटीस यानें मरणापूर्वी मोठ्या गंभीरतेनें भाषण केलें व तें पाहून असा मृत्यु आप-ल्यास प्राप्त व्हावा अशी इच्छा कोणीही साधारण मनुष्य धरील. पण ख्रिस्तासारखें मरण आपणांस प्राप्त व्हावें अशी कोणाची तरी इच्छा होईल काय? नुस्ती ती त्याच्या मरणाची भयंकर गोष्ट ऐकण्यानेंच मनुष्य अगदीं भयभीत होऊन जातो. त्याच्या त्या प्राणोत्क्रम-णाच्या वेळच्या यातना, लोकांनीं केलेला त्याचा छल, त्याचा उपहास, त्यावर केलेली शापवृष्टि वगैरे ऐकूनच अंगावर रोमांच उभे रहातात. साक्रेटीस यास ज्यानें विषाचा पेला दुःखाश्रु गाळीत गाळीत आणून दिला त्याचें त्यानें समाधान करून त्यास निरोप दिला हें जरी खरें तरी क्रोधानें संतप्त झालेल्या आपल्या मारेकऱ्याची आपण असह्य वेदना सोशीत असतां स्मरण करून त्याची ईश्वरानें क्षमा करावी ह्मणून प्रार्थना करणें हें खरोखरींच अलौकिक होय. जरकरितां साक्रेटीस याचें प्राणोत्क्रमण सत्पुरुषाचें होतें असें ह्मणावें तर ख्रिस्ताचें निधन प्रत्यक्ष देवाचें ह्मटल्यानें काय प्रत्यवाय येणार आहे!"

**स्पिनोझा** नामक पंडित ह्मणतो: "परमेश्वराचें अनंत ज्ञान सर्वत्र प्रगट झालें असून तें विशेषतः मनुष्याच्या मनोव्यापारांत दिसून येतें हें जरी खरें तरी त्याची परमावधि ख्रिस्तामध्यें झाली आहे."

**जीन पाल रिक्टर** नांवाच्या एका प्रसिद्ध जर्मन ग्रंथकारानें ख्रिस्ताविषयीं या प्रकारें अभिप्राय दिला आहे:

" सर्व पराक्रमी पुरुषांत जो अति पवित्र व साधुवृंदांत जो वीर असा जो ख्रिस्त त्यानें आपल्या हातांत खिळे रोवून घेऊन मोठमोठ्या राज्यांचा पूर्वक्रम अगदीं बदलून टाकला व कालरूप प्रवाहास अगदीं नवीन दिशा दिली, व तो आज अखिल जगाचा सन्मार्गप्रवर्तक होऊन बसला आहे."

ख्रिस्ताविषयीं **जान स्टुअर्ट मिल** यानें या प्रकारें ह्मटलें आहे:

" आपला आयुष्यक्रम ख्रिस्ताला पटेल असा ठेवावा, कारण त्याहून अन्य उत्तम सन्मार्गदर्शक अद्याप मिळाला नाहीं."



# परिशिष्ट ६.

## पत्र बारावें पहाणें.

### प्राचीनकाळचे ख्रिस्ती लोकांची मूर्तिपूजकांशीं वागण्याची पद्धत.

ही लक्ष्यांत येण्याकरितां आह्मांस इतिहासाकडे वळलें पाहिजे.

इ० स० १२५ या वर्षी आरिस्टायडीज नांवाच्या ख्रिस्ती मनुष्यानें एक ग्रंथ लिहून तो हेड्रिअन बादशाहास नजर केला. हा ग्रंथकार मूळचा आथेन्स शहरचा एक तत्त्वज्ञ असून पुढें त्यानें ख्रिस्ती धर्म स्वीकारला. या ग्रंथांत त्या पंडितानें मूर्तिपूजेचा निषेध करून ख्रिस्ती धर्माचें मंडन केलें आहे. त्याचा थोडासा मासला येथें देतों :

ग्रीक लोकांविषयीं या ग्रंथकारानें या प्रकारें ह्मटलें आहे :

" ग्रीक लोकांत मूर्तिपूजा शिरल्यानें ते किती तरी बिघडले. त्यांनीं देव केले व त्यांस बायका असल्या पाहिजेत अशी कल्पना धांवल्यामुळें देवी झाल्या. कित्येक देव तर व्यभिचारी, नरहिंसक, मत्सरी, संतापी, पितृघ्न व चोर असे होते."

मिसरी लोकांच्या धर्माविषयीं याच ग्रंथकारानें या प्रकारें लिहिलें आहे :

" मिसरी लोकांत वनचर, जलचर व पक्ष्यादि प्राण्यांस पूज्य मानितात ; ह्मणजे कित्येक ठिकाणीं मेष व गोवत्स; दुसरे ठिकाणीं वराह व मत्स, अन्यत्र नक्र व काक आदीकरून मांसाहारी पक्षी पूज्य मानितात. कित्येकांनीं कुत्र्यांमांजरांस, तसेंच कित्येकांनीं सर्प व व्याघ्रादि हिंसक पशूंसच व कित्येकांनीं तर कांदे लसूण यांस देव मानून कमाल करून सोडली आहे."

वरील उतारे वाचतांक्षणींच हिंदु धर्म असाच आहे असें तेव्हांच लक्ष्यांत येतें. तथापि ख्रिस्ती लोकांस त्याविषयीं बोलण्याचा प्रसंग आल्यास त्यांनीं हिंदु धर्माविषयीं तिरस्कार दाखवितां कामा नये. प्राचीन ख्रिस्ती ग्रंथकारांस जरी तत्कालीन धर्म सर्वथा नापसंत होते तरी त्या त्या धर्मांत सत्यांशही आहे हें त्यांस कबूल होतें. तर आधुनिक ख्रिस्ती लोकांनीं हीच पद्धत स्वीकारल्यास फार चांगलें. हिंदु किंवा इतर धर्मांतील व्यंगें दाखविण्याचा प्रसंग आल्यास तीं व्यंगें फारच दुःख प्रदर्शित करून कोणाचीं मनें कलुषित होणार नाहींत अशा मोठ्या सामोपचारानें सांगावींत.

टरटलियन ह्मणून जो प्रसिद्ध ख्रिस्ती ग्रंथकार होऊन गेला त्याचा तत्कालीन तत्त्वज्ञानावर मोठा कटाक्ष असे. मनुष्याचा आत्मा उपजत ख्रिस्ती असून त्याचें समाधान केवळ ख्रिस्ती धर्मानेंच होणारें आहे असें त्यानें प्रतिपादन करावें.

---

# परिशिष्ट ७. (अ)

## पत्र तेरावें पहाणें.

### हिंदुस्थानांतील सांप्रतची धर्मसंबंधी चळवळ.

हिंदु धर्माचा आरंभापासून इतिहास पहातां असें दिसून येतें कीं या देशांत जे अनेक धर्म प्रचलित होते त्यांतील बऱ्याच गोष्टींचा प्रवेश त्यांत झाला आहे. हिंदुस्थानांतील मूळचे रहिवाशांच्या धर्मांतून पुष्कळच गोष्टी हिंदु धर्मांत घुसडल्या आहेत. तसेंच, दक्षिण हिंदुस्थानांत व विशेषतः उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानी धर्मानें आपली छाप हिंदुधर्मावर बसविली आहे. भगवद्गीता व तीनंतर झालेले इतर धर्मग्रंथ यांतून तर ख्रिस्ती धर्माचीं बरींच तत्त्वें आढळून येतात. अलीकडे हिंदु धर्माचें ख्रिस्ती धर्माशीं संघट्टन अधिकाधिक झाल्यामुळें व नवीन नवीन विचारांशीं लोकांचा परिचय झाल्यानें त्या धर्मांत महत्त्वाचें स्थित्यंतर व्हावें हें साहजिक आहे; आणि तसें घडूनही आलें आहे. आतां पहावें तों अलीकडील शिकलेल्या लोकांच्या विचारसरणींत इतका बदल झाला आहे कीं तसे विचार त्यांच्या वाडवडिलांच्या स्वप्नींही आले नव्हते.

हिंदु धर्माच्या स्वरूपांत जें अलीकडे स्थित्यंतर झालें आहे त्यास राममोहनराय, देवेंद्र-नाथ टागोर, केशव चंद्रसेन, व दयानंद सरस्वती हे चार पुरुष कारणीभूत झाले असें ह्मटल्यास वावगें होणार नाहीं.

१ **राममोहनराय.**—हे बंगाल्यांतील ब्राह्मण गृहस्थ इ० १७७४ सालीं जन्मले. यांचे वडील मुरशिदाबादच्या नवाबाच्या पदरीं होते; व तेथें वडिलांजवळ असतांना त्यांनीं फारशी व अरबी भाषांचा थोडासा अभ्यास केला. संस्कृतभाषेचेंही अध्ययन राममोहन यांनीं केलें. कुराणांतील एकेश्वरीमत त्यांस फार आवडून त्यांनीं आपल्या वयाचे १६व्या वर्षीं मूर्तिपूजेच्या निषेधावर एक लहानसें पुस्तक लिहिलें. हें त्यांच्या बापास न आवडल्यामुळें त्यांस घर सोडणें प्राप्त झालें. पुढें दोन चार वर्षांनीं त्यांच्या बापानें त्यांस परत बोलावून घेऊन त्यांकडून इंग्रजी भाषेचा अभ्यास करविला. इ० १८१४ या वर्षीं ते कलकत्त्यास येऊन राहिले, व सती जाणें व हिंदु धर्मांतील इतर दुष्ट चालींचा मोड करण्याचा प्रयत्न त्यांनीं चालविला. तथापि विशेषतः धर्मसुधारणा करण्याकडे यांचें धोरण असे. वेदान्त तत्त्व एकेश्वरवादी आहे असा त्यांचा मिथ्याग्रह होऊन त्यांनीं इ० १८१६ या वर्षीं त्या विषयावर इंग्रजींत एक ग्रंथ लिहिला. त्याच्या पुढल्या वर्षीं त्यांचें लक्ष्य ख्रिस्ती धर्माकडे लागलें. पुढें इ० १८२० सालीं त्यांनीं The Precepts of Jesus, the Guide to Peace and Happiness ह्मणजे "ख्रिस्ताचा उपदेश हा शांतीचा व सुखाचा मार्गदर्शक आहे" या नांवाचें एक लहानसें पुस्तक इंग्रजी व बंगाली भाषांत प्रसिद्ध केलें.

लौकिक उपासनेकरितां त्यांनीं १८३० या वर्षीं एक घर भाड्यानें घेतलें. हाच काय

तो सुधारणेच्या उपक्रमास पहिला आरंभ होय. कारण यापूर्वी हिंदु लोकांस एकत्र जमून उपासना करणें माहीत नव्हतें. ह्याच बंगाल्यांतील ब्राह्मसभा किंवा समाज याचा आरंभ होय.

त्यानंतर राममोहनराय इ० १८३१ सालीं विलायतेस गेले, व तेथेंच ब्रिस्टल शहरीं त्यांचा इ० १८३३च्या सेप्टेंबर महिन्यांत अंत झाला.

ह्या राममोहनराय यांच्या चरित्रांतील मुख्य गोष्टी होत. त्यांचें गुणदोषविवेचन आह्मांस फारसें कर्तव्य नाहीं. तथापि त्यासंबंधानें एक गोष्ट सांगतों. कित्येकांनीं असा आक्षेप घेतला आहे कीं राममोहन यांनीं जो मार्ग काढला त्याचा संस्कार मनुष्याच्या हृदयावर घडत नसून केवळ बुद्धीवर घडतो. या ह्मणण्यांत बराच तथ्यांश आहे. परंतु राममोहन हे शुद्ध मनाचे असून त्यांना बराच छळ सोसावा लागला, व अखेरीस बापाचें घर देखील त्यांस सोडावें लागलें व स्वसंरक्षणार्थ हत्यारबंद होऊन फिरावें लागत असे.

२ **देवेंद्रनाथ टागोर.**—यांचा जन्म इ० १८१८ या सालीं झाला. त्यांनीं इ० १८३९ या वर्षी तत्त्वबोधिनी सभा स्थापन केली. मूर्तिपूजा बंद पाडण्याकरितां त्यांनीं पुष्कळ खटपट केली, व ब्राह्मसमाजाच्या सभासदांकडून प्रतिज्ञालेख घेण्याचा प्रघात त्यांनीं इ०१८४३ या वर्षी घातला. ह्या प्रतिज्ञेनें सभासदांस अनेकदेवमत व मूर्तिपूजा वर्ज करण्याबद्दल शपथ घ्यावी लागत असे. इ० १८४५ या वर्षी वेदाभ्यास करण्याकरितां त्यांनीं चार सभासदांस काशीस पाठविलें. तेथें त्यांनीं दोन वर्षें अध्ययन करून परत आल्यावर वेदाविषयीं आपला अभिप्राय कळविला. त्यावरून बहुमतानें असें ठरलें कीं उपनिषदांत जरी बरींच धर्मतत्त्वें आहेत तरी वेद व उपनिषदें हीं दोषमय असल्यामुळें त्यांस प्रमाणग्रंथ मानतां येत नाहीं.

३ **केशव चंद्रसेन.**—यांचा जन्म इ० १८३८ या वर्षी झाला. पुढें इ० १८५७ या वर्षी ते ब्राह्मसमाजाचे सभासद झाले. इ० १८६४ या वर्षी भिन्न ज्ञातींच्या वधूवरांचें त्यांनीं लग्न लावलें त्यामुळें देवेंद्रनाथ टागोर यांचा त्यांवर रोष होऊन त्यांचें केशवशीं पटेनासें झालें. त्यामुळें इ० १८६६ या वर्षी केशव चंद्रसेन व त्यांचें मित्रमंडळ यांनीं हिंदुस्थानाचा ब्राह्मसमाज या नांवाची नवीन संस्था स्थापन केली. इ० १८७० सालीं केशव चंद्रसेन हे विलायतेस गेले, व तेथून परत आल्यावर त्यांनीं आपल्या लेखणीनें व भाषणानें बरीच चळवळ करून सोडली. पुढें इ० १८७८ या सालीं त्यांच्या कन्येचा विवाह कुचबिहारचे महाराज यांशीं झाला. त्यामुळें बराच गवगवा होऊन समाजांत बरेंच वैमनस्य वाढलें, व लवकरच दुफळी होऊन "साधारण समाज" या नांवाची नवीन मंडळी स्थापन झाली. केशव चंद्रसेन यामुळें फारच चिडले, व प्रतिपक्षाचे लोकांस त्यांनीं पिशाचरूपी मनुष्यें वगैरे नांवें ठेविलीं. परंतु या फारकतीपासून केशव यांस स्वेच्छेप्रमाणें वागण्यास चांगलेंच फावलें, व यापुढें हरएक विषयावर त्यांचे उद्गार निर्भयपणें बाहेर पडूं लागले. माझें सर्व बोलणें करणें ईश्वरी प्रेरणेनें होत आहे असें ते ह्मणूं लागले. कित्येक प्रसंगीं हा मजकडून मोठा प्रमाद होत आहे असें जरी त्यांनीं बोलून दाखविलें तरी त्याच दोषांत

ते पुनः पुनः गुरफटून जात व जे मला अडवितात ते ईश्वरास अडवितात असे त्यांचे उद्गार निघूं लागले. इतका मोठा आव घातल्यामुळें पुढें केशब यांच्या समाजास उतरती कळा लागली यांत नवल नाहीं. सर्वांनीं त्यांचा नाद सोडला. इ० १८८१ सालीं त्यांनीं आपल्या समाजास The Church of the New Dispensation असें नांव दिलें; व ख्रिस्ती धर्मप्रमाणेंच आपला पंथ ईश्वरदत्त आहे असें ते ह्मणूं लागले. जगांतील सर्व शास्त्रें, धर्म व धर्मगुरु या सर्वांची आपल्या पंथानें आपण एकवाक्यता करीत आहों असें ते ह्मणूं लागले. असें असून आम्हांस मध्यस्थ नको असे त्यांचे विरोधात्मक उद्गार अन्य धर्मांच्या संबंधानें निघूं लागले. मध्यस्थासंबंधानें हा जो त्यांचा कटाक्ष तो ख्रिस्ती धर्मास अनुलक्षून होता. आशिआ खंडांतील सर्व धर्मांचें संमेलन केल्यानें खऱ्या धर्माची निष्पत्ति होईल असें ते अखेरपर्यंत प्रतिपादित होते. या ह्मणण्यानें त्यांनीं मूर्खपणाची परमावधि केली. केशव हे नेहमीं कल्पनातरंगांत गुंग असत. त्यामुळें अखेरीस त्यांस बुद्धिभ्रंश झाला असावा असें आह्मांस वाटतें. त्याशिवाय असा असंबद्ध प्रकार त्यांचे हातून घडण्याचा संभव नव्हता. त्यांचा पंथ लयास तरी जाईल, किंवा त्या पंथांतील लोक शुद्धीवर येऊन तो सोडून देतील हें निर्विवाद आहे. याप्रमाणें केशव चंद्रसेन यांचें अखेरीचें वर्तन होतें असें आह्मांस फार कष्टानें ह्मणावें लागतें. तथापि त्यांचीं पूर्वकाळांतील कामें आपण विसरतां कामा नये. त्या वेळीं त्यांनीं समाजसुधारणा व धर्मसुधारणा करण्याकरितां बहुत परिश्रम केले. येशू ख्रिस्ताविषयीं ते नेहमीं मोठ्या आदरानें बोलत असत.

केशव चंद्रसेन यांच्या पंथाप्रमाणें साधारण समाजाचे हातून वेडेचार झाले नाहींत. परोपकार व समाज सुधारण्याचे कामीं साधारण समाजानें बरीच उत्सुकता दाखविली आहे. हा पंथ युनिटेरियन पंथाप्रमाणेंच आहे. इतर देशांतून युनिटेरियन पंथाची भरभराट झालेली दिसत नाहीं तर तो या देशांत कसा वृद्धिंगत होईल? वर जे समाज सांगितले तशा प्रकारचे समाज हिंदुस्थानांतील बहुतेक मोठमोठ्या शहरांतून आहेत. मुंबई इलाख्यांत प्रार्थनासमाज ह्मणून जो पंथ आहे तो बहुतेक अंशीं साधारण समाजाप्रमाणें असून त्याची वाढ विशेष होत नाहीं असें तेच लोक कबूल करितात.

४. इ० १८८०च्या सुमारास **दयानंद सरस्वती** व **आर्यसमाज** हीं नांवें ऐकण्यांत येऊं लागलीं. दयानंदाचें पूर्ववृत्त फारसें माहीत नाहीं, तथापि तो गुजराथी ब्राह्मण असून त्याचा जन्म काठेवाड प्रांतांत झाला असावा असें दिसतें. त्यानें संन्यासवृत्ति धारण केल्यावर त्यास दयानंद सरस्वती हें नांव प्राप्त झालें. त्यानें हिंदुस्थानांत बऱ्याच ठिकाणीं प्रवास केला व संस्कृत भाषेचें अध्ययन केलें. हिंदु शास्त्रांतील बराच भाग प्रमाण ह्मणून मानतां येत नाहीं असें त्यास कळून आल्यावर त्यानें ब्राह्मणें, उपनिषदें, व षड्शास्त्रें व पुराणें हीं सर्व झुगारून दिलीं. चाऱ्ही वेद त्यास मान्य होते; परंतु अथर्ववेद त्यानें पाहिला होता कीं नाहीं याविषयीं शंकाच आहे, निदान त्या वेदांतील मंत्रतंत्रादि नीच कर्में त्यानें पाहिलीं नसावींत. वेद ईश्वरप्रणीत आहेत हें स्वयंसिद्धच आहे असें तो ह्मणत असे.

दयानंदानें जें वेदभाष्य केलें आहे तसें पूर्वी कोणीं कधींच केलें नसावें. तें कोणत्याहि संस्कृतज्ञ पंडितास मान्य नव्हतें. हें भाष्य समजण्यास सर्व कोशांतील शब्दार्थ बदलावा लागतो इतकें तें विलक्षण आहे.

दयानंद हा बऱ्याच अंशीं धर्मसुधारक होता. जातिभेद त्यानें गुंडाळून ठेवला. बालविवाह करण्यास त्यानें प्रतिबंध केला. विधवाविवाहास त्याची संमति होती. मूर्तिपूजा त्यानें झुगारून दिली. ईश्वर एक असून अनादिसिद्ध आहे असें तो मानीत असे. जीवास अनेक जन्म आहेत असा त्याचा समज होता. परंतु या सर्व गोष्टींविषयीं वेदांत कोठेंही आधार नाहीं. (अनेक जन्मांविषयीं वर लिहिलेंच आहे तें पहावें.)

हिंदु धर्मांत प्रचलित असलेल्या प्रकारांत उपवासादि कडक प्रकारांचें बरेंच बंड आहे तें सारें दयानंदानें गुंडाळून टाकलें आणि ईश्वराचें ध्यान करण्याचा एक फारच वेडगळ तऱ्हेचा विधि त्यानें सुरू केला.

राममोहनराय यांनीं सुरू केलेला व सर्व ब्राह्मसमाजांनीं ज्याचें अनुकरण केलें असा जो लौकिक प्रार्थनेचा प्रकार तो दयानंदास मान्य नव्हता. ही दयानंदानें घवाड चूक केली.

हरएक प्रकारच्या ज्ञानाचें बीज वेदांत आहे असें दयानंदानें प्रतिपादन केलें आहे. आगगाडी, आगबोट, तारायंत्र, विमान इत्यादि जे सांप्रतकालचे नवीन शोधांचे प्रकार ते सर्व बीजरूपानें वेदांत आहेत इतकेंच केवळ नव्हे, तर यापुढें होणारे नवीन शोध त्यांत आहेत असें तो ह्मणत असे! या मताचे पुष्टीकरणार्थ त्यानें वेदवाक्यांची ओढाताण करून भलभलतेच कधीं न ऐकिलेले अर्थ त्यांतून तो काढूं लागला. हल्लीं प्रचारांत असलेल्या यंत्रांत सुधारणा करण्याचाही आव त्यानें घातला. मनुष्यास ज्याप्रमाणें इकडे तिकडे रस्त्यांतून भ्रमण करतां येतें त्याप्रमाणें विमानाची योजना नीट केल्यानें त्यास सर्व तारांगण पहातां येईल असें तो ह्मणत असे!

दयानंदाच्या बोलण्यांत राजनीति हा विषयही येत असे व राजा लोकनियुक्त असावा असें तो प्रतिपादन करीत असे. ही गोष्ट त्यास वेदांत सांपडली कीं काय कोण जाणे!

कलकत्त्यास ब्रह्मवृंदाची मोठी सभा होऊन त्यानें दयानंदास पाखंडी ठरवून त्याचा धिक्कार केला. इ० स० १८८३ या वर्षी ऑक्टोबर महिन्यांत दयानंद स्वामीचें देहावसान झालें. मरतेसमयीं त्याचें वय ५९ वर्षांचें असावें.

पंडित दयानंदजी गेले तरी त्यांनीं जो आर्यसमाज स्थापन केला तो अद्याप अस्तित्वांत असून दयानंदजींचीं सर्व मतें त्यास मान्य आहेत. इ० १८८६ या वर्षी लंडन शहरांत आर्यसमाजाचें संगीताचें पुस्तक छापलें. त्या पुस्तकांत प्रथमच गायत्रीमंत्र घातला असून त्याचा अगदीं विपरीत अर्थ केला आहे. त्यापुढें जीं दहावीस पद्यें आहेत तीं वाट्स, कौपर, व मांटगामरी आदीकरून इंग्रजी कवींच्या काव्यांतून घेतलेलीं आहेत. दुसरीं चार पांच पद्यें स्वदेशप्रीतिपर आहेत. त्यांपैकीं दोन पद्यें तर कोणा अशिक्षित मनुष्यानें रचलेलीं असावींत असें उघड दिसतें. कारण तीं काव्यदोषानें ओतप्रोत भर-

लेलीं आहेत. अखेरीस एक हिंदी भाषेंत रचलेली आरती जोडली असून तिचा इंग्रजींत अर्थ दिला आहे; व शेवटल्या पानावर सुमारें सात किंवा आठ वाक्यांत सर्व आर्यसमाजाच्या तत्त्वांचा गोषवारा दिला आहे.

या पुस्तकांत कोठेंही ख्रिस्ताचें नांव ह्मणून नाहीं, व हें बुद्धिपुरस्सर केलें असावें हें उघड आहे.

दयानंद सरस्वती याचे अनुयायी यांजकडून ख्रिस्ती लोकांच्या कामाला जितका व्यत्यय येतो तितका हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही लोकांकडून येत नाहीं. कारण इतर लोक बुद्धिवादाच्या गोष्टी ऐकतात परंतु आर्यसमाजवाले तसें न करितां तंट्याबखेड्यावर येतात;[1] आणि त्यायोगें ते आपला पक्ष कमी आहे हें स्पष्टपणें व्यक्त करितात.

एकंदरीनें पहातां आम्हांस असें वाटतें कीं या समाजभक्तांस व विशेषतः त्यांतल्या तरुण मंडळीस सत्य अप्रिय आहे असें नाहीं, परंतु त्यांची सर्व चळवळ खोट्या देशाभिमानासंबंधानें आहे. वेदकालीं ही भरतभूमि फार श्रेष्ठ व सुखी होती व या विसाव्या शतकांत जर वेदकालीन मतांचा जीर्णोद्धार केला तर पूर्ववत् सुखाचे दिवस येतील अशी त्यांची पक्की पण खोटी समज झालेली आहे. या प्रकारचा समज अंगीं प्रौढता नसलेल्या तरुण मंडळीस बरा वाटणें साहजिक आहे तरी सुशिक्षित लोकांस हें मत ग्राह्य नाहीं. राजे सर टी. माधवरावांसारख्या राजकारस्थानी पुरुषानें जें म्हटलें तें अगदीं खरें आहे; तें असें: "खरा स्वदेशाभिमान सत्याला सोडून नसतो." आर्यसमाज मंडळीनें शुद्धीवर येऊन या निराधार मतांचा त्याग करावा, नाहींतर त्यांचा उपहास मात्र होईल.

या विषयाची परिसमाप्ति करण्यापूर्वीं हिंदुस्थानांतील अलीकडील धर्मचळवळीसंबंधानें दोन कठोर शब्द बोलणें आम्हांस प्राप्त झालें आहे. या देशांतील पुष्कळ तरुण मंडळीला ज्ञानप्राप्तीची उत्कंठा आहे असें दिसून येतें; व कित्येकांस सत्यावर निष्ठा बरीच आहे असेंही आढळून येतें, पण आपण पापी आहों हें ज्ञान त्यांचे ठायीं अल्पांशानें देखील दिसून येत नाहीं. पाप ह्मणजे ईश्वराविरुद्ध गुन्हा, त्याकडून मनुष्याचा आत्मा पतित होऊन मृत झाला आहे, त्याबद्दल शासन होणें अवश्य आहे, व पापाचे जे घातक परिणाम झाले आहेत त्यांची दुरुस्ती एका ईश्वराशिवाय होऊं शकत नाहीं या सर्व गोष्टींचा संस्कार हिंदु लोकांच्या मनावर अद्याप घडून येत नाहीं ही फार दुःखाची गोष्ट आहे! पापाचरणाचें ओंगळ व भयंकर स्वरूप हिंदुस्थानांतील तरुण लोकांस केव्हां कळून येणार! हें यथार्थ कळून आल्याशिवाय ख्रिस्तानें केलेल्या उद्धारोपायाचें महत्त्व त्यांस कळून येणार नाहीं. "जर तुम्ही ऐकणार नाहीं तर तुमच्या ताठ्याबद्दल माझा आत्मा अंतर्यामीं रुदन करील" (इर्मया १३ : १७) हें जसें इर्मया भविष्यवादी यानें प्राचीनकाळीं अविश्वासी लोकांशीं बोलतांना मोठ्या कळवळ्यानें ह्मटलें त्याप्रमाणें सांप्रतचे ख्रिस्ती उपदेशकांस गर्हिवरून अनेकवार उद्गार काढावे लागतात यांत संशय नाहीं.

[1] रेव० हेनरी फॉरमन यांचें "आर्यसमाज" या विषयावरील पुस्तक पहावें.

## परिशिष्ट ७. (ब)

### वेद पौरुषेय आहेत. ह्मणजे ईश्वरप्रणीत नाहींत.

या विषयावर प्रो० जिनसीवाले यांनीं वीस ठळक मुद्दे काढून हंसस्वरूप स्वामी यांच्या-पुढें पुण्यास भर सभेपुढें मांडले होते ते आमच्या वाचकांसाठीं उतरून घेतों. (१) वेद ईश्वरानें निर्माण करून मनुष्यास दिले अथवा ते अनादि आहेत, असें मानण्यास वेदांत असलेल्या मजकुराशिवाय अन्यत्र कोठेंही पुरावा नाहीं. यामुळें वेदांतील वचनांवरून वेदांचें अपौरुषेयत्व स्थापावयास लागल्यास विद्यारण्य स्वामींनीं वर्णन केलेला 'स्वस्कंधा-रोहणदोष' होतो. ऋचः सामानि जज्ञिरे । पु० सूक्त. तस्मात्तेपानात् त्रयो वेदा अजा-यन्त । सामवेद.

(२) शतपथ ब्राह्मणांत व बृहदारण्यकांत 'व्याख्यानें' 'अनुव्याख्यानें' 'सूत्रें' व 'श्लोक' हे पौरुषेय आहेत असें स्पष्ट ह्मटलें आहे.

(३) मीमांसेंत अपौरुषेयत्वाबद्दल जें अधिकरण आहे, त्याचा मुख्य भर, वेदाचा कर्ता कोण हें कळत नाहीं, यावर आहे. पण ज्यांच्या नांवांवर तीं सूत्रें चालतात ते त्यांचे कर्ते कां समजूं नयेत? मनुष्यास कळणार नाहीं असें त्यांत कांहीं नाहीं. ते फार प्राचीन आहेत एवढ्यावरूनच ईश्वरनिर्मित आहेत असें ह्मणतां येणार नाहीं.

(४) वेदांचें सूक्ष्म अवलोकन केलें तर असें दिसून येईल कीं पूर्वीं त्यांचा विस्तार मोठा असावा, परंतु कोणत्या तरी कारणानें ते नष्ट झाले असावे, पुढें ते पुनः मिळवून त्यांचें वर्गीकरण करण्यांत आलें असावें यामुळें त्यांत पुष्कळ ठिकाणीं खंड पडलेला दिसतो.

(५) वेदांतील सूत्रांत सूत्रकाळाहून फार प्राचीनकाळीं घडलेल्या गोष्टींचा उल्लेख आहे. त्यांत कित्येक ऐतिहासिक हकीकती व गोष्टी आहेत. त्यांत क्षत्रिय ब्राह्मण यांच्या हकीकती आहेत. यामुळें ते 'अनादि' आहेत असें ह्मणतां येणार नाहीं.

(६) सामान्यतः संसारांत आढळून येणाऱ्या अनेक चालीरीतींविषयीं व सामाजिक गोष्टींविषयीं त्यांत उल्लेख आहेत. "संपत्तीच्या मागें लागून मी कारागिरी, माझा बाप वैद्यकी, व आई दळणकांडण असे धंदे करीत असतों," अशा अर्थाचा एक उल्लेख मं० १ सू. ११२ ऋ. ३ यांत उल्लेख आहे. तुझ्या जागीं मी व माझ्या जागीं तूं असतास तर तुझ्या इच्छा एकदम पुरविल्या असत्या असें एक भक्त अग्नीस ह्मणतो. ८.४४;२३.

(७) प्राचीन काळचे ऋषि व अर्वाचीन काळचे ऋषि असा भेद वेदांत स्पष्ट आहे.

१ १,२. पूर्वेभिः ऋषिभिः नूतनैरुत ईड्यः

१ ४५,३. प्रियमेधवत् अत्रिवत् जातवेदो विरूपवत् प्रस्कण्वस्य श्रुधी हवेमा.

याशिवाय १.३.६., १७५.६, ४. २०, ६, १९,४ यांतही असेच उल्लेख आहेत.

( ८ ) प्राचीन सूक्तें व अर्वाचीन सूक्तें असा वेगळा निर्देश केलेलीं वचनें आहेत. १.१२.११. आह्मी नव्या गायत्रीमंत्रानें तुह्मी स्तुति करितों. त्यावर सायनाचार्याचें भाष्य असें आहे कीं 'नवीयसा' ह्मणजे "पूर्वीच्या ऋषींनींही संपादन केलें नाहीं अशा." त्याचप्रमाणें १. २७.४, १;६०,३.१. ८९.३, १, १३०. १०. २,१८३. या ऋचा पहा.

( ९ ) ऋषींनीं आपण सूक्तें लिहिलीं आहेत अशीं स्पष्ट वचनें आहेत. पहिल्या मंडलापैकीं २०.१,३१ १८, ४७,२ ६१.१६ पहा.

( १० ) भृगु रथ करितात त्याप्रमाणें आह्मी सूक्तें करितों असें ऋषींनीं ह्मटलें आहे. ४.१६.२० तक्ष तयार करणें हा धातु मंत्र तयार करण्यासंबंधीं ज्या ठिकाणीं योजिला आहे त्याचीं दहा वीस उदाहरणें देतां येतात.

( ११ ) वेदांत कित्येक सूक्तें प्रार्थनापर आहेत, त्यांत झालेल्या पापांविषयीं क्षमा मागितली आहे. हीं देवानें लिहिलीं असें संभवत नाहीं. ऋग्वेद मंडल ७ सूक्तें ८६, ८८,८९,८७ पहा.

( १२ ) प्राविपा नांवाचें सूक्त आहे. मंडल १०,३४ पहा: त्यांत जुगाराच्या व्यसनानें सर्वस्व गमाविलेल्या एका ऋषीचें पश्चात्तापाचें वर्णन आहे. हें परमेश्वरानें केलें असेल असें संभवत नाहीं.

( १३ ) वेदांत कित्येक भाग इतके अश्लील आहेत कीं ते ईश्वरानें दिले असें कधीं ह्मणतां यावयाचें नाहीं. ऋग्वेद १ १२६ १, ५.६. १० ८६,६–७. याचप्रमाणें तैत्तिरीय ७.४,१९१ आणि वाजसनेय संहितेंतही आहेत.

( १४ ) दानस्तुतीविषयीं जागोजागचीं वचनें ईश्वरनिर्मित आहेत असें मानितां यावयाचें नाहीं. १, १२५, १२६, ५ २७,३०; १२;५.

( १५ ) वेदान्त सूत्रभाष्यांतील 'शास्त्रयोनितत्वात्' या सूत्रावरील भाष्यांत ऋग्वेदादि ग्रंथ एकाच कर्त्यानें लिहिले आहेत असें विनाकारण गृहीत धरिलें आहे. आणि नंतर त्याअर्थीं ते परमेश्वरानेंच निर्माण केले आहेत असें ह्मटलें पाहिजे असा तर्क केला आहे.

( १६ ) वेदांतील सूक्तें ऋषींनीं केलीं असें जागोजाग स्पष्ट लिहिलें असतां, लक्षणेनें त्या वाक्याचा अर्थ, त्यांना तीं दिसलीं असा किंवा यासारखाच करण्याची वहिवाट आहे. ज्या ठिकाणीं अन्वयानुपपत्ति अथवा तात्पर्यानुपपत्ति होत असेल तेथें मात्र लक्षणेनें अर्थ घ्यावयाचा असा नियम आहे. "गंगायां घोषः" असें ह्मटलें तर गंगेंत झोंपडी असणें अशक्य ह्मणून गंगेच्या कांठीं झोंपडी असें लक्षणेनें समजावें लागतें. परंतु अमुक मंत्र ऋषीनें केला ह्मणण्यांत तशी अशक्यता कांहीं नाहीं, मग सरळ अर्थ सोडून देऊन ओढाताण करून अर्थ करण्याची काय अपेक्षा आहे?

( १७ ) वेदांच्या ईश्वरनिर्मितत्वाविषयीं जीं प्रमाणें पुढें आणावयाचीं त्यांनीं हिंदूंची मात्र खातरी होऊन पुरेशी नाहीं. तर दुसऱ्या धर्माचे व मतांचे लोकांसही त्यांवरून वेदांच्या ईश्वरनिर्मितत्वाची खातरी झाली पाहिजे.

(१८) वेदांच्या ‘ अनुक्रमणी ’ नामक एका भागांत असें ह्मटलें आहे: “ यस्य वाक्यं स ऋषिः, या तेनोच्यते सा देवता, यदक्षरपरिमाणं तच्छंदः । अर्थेप्सवः ऋषयो देवता च्छंदोभिरभ्यधावन् । यांत वेदमंत्र ऋषींनीं आपले हेतु पूर्ण करण्याकरितां देवतांकडे धांव घेण्यासाठीं केले असें ह्मटलें आहे.

(१९) यास्काच्या निरुक्तांतील १, २०. ‘ साक्षात्कृतधर्माण ऋषय आसन् ’ हा भाग येथें पाहण्यासारखा आहे.

(२०) मानस्तोके तनये मान आयो मानो गोषुमानो अश्वेषुरीरिषः
वीरान् मानो रुद्र भामितो वधीः हविष्मंतः सदमित्वा हवामहे ।

१ ११४.८

इदं पितृभ्यो नमो अस्तु अद्य येपूर्वासोयउपरास ईयुः

इत्यादि अनेक वचनांत आमचे पूर्वज मनुष्य होते अशा अर्थाचे उल्लेख आहेत. आणि आपलीं मुलेंबाळें, गाई, घोडे, लढणारे वीर यांना मारूं नको, अशा प्रार्थना आहेत. या ईश्वरानें केल्या असें ह्मणतां येणार नाहीं.



## परिशिष्ट ८.

### पत्र चौदावें पहाणें.

### १ महमदाचें वर्तन.

१. महमदी धर्म निर्माण होण्यास खुद्द महमदाचें वजन कितपत कारण झालें याविषयीं सर विलियम म्यूर व डॉक्टर स्प्रेंगर या उभयतांत मतभेद आहे. म्यूर साहेब ह्मणतात कीं महमदापासून इसलामी धर्म झाला; पण इसलामी धर्मापासून महमद झाला असें मात्र नाहीं. तथापि इसलामी धर्माची सर्व सामुग्री त्यास आयती मिळून तो उत्तम कारागीर असल्यामुळें त्यानें तीस चांगलें रंगरूप दिलें. शिवाय, धर्मसुधारणा व्हावी एतदर्थ तात्कालीन अरब लोकांची पूर्ण सिद्धता होती.

२. या पत्रांत महमद कितपत नीतिमान् होता याविषयीं जें लिहिलें आहे तें म्यूर साहेबांच्या मताशीं अगदीं जुळतें. म्यूर साहेब म्हणतात कीं महमद फार चिरडखोर व खुनशी होता. त्याच्या उतार वयांत तर तो फार लोभी, जुलमी, खून करणारा व विषयासक्त बनला होता हें निर्विवाद आहे.

३. इसलामी धर्माविषयीं तेच साहेब काय ह्मणतात तें पहा : "भ्रष्ट मनुष्याच्या स्वभावाशीं सर्वांशीं जुळणारा असा हा धर्म आहे. या धर्मात ईश्वरभक्तीचा आव जो दिसून येतो त्यापासून पापभीरु जे आहेत त्यांचें समाधान होतें व या धर्मातील नीतीचें बंधारण शिथिल असल्यामुळें व अंतर्यामीं अधार्मिक असणारास बाह्योपचार करण्यास प्रतिबंध नसल्यामुळें विषयी पुरुषास या धर्मानें चांगलेंच फावलें."

४. महमद ठक होता किंवा धर्मवेडानें ग्रासलेला होता याविषयीं म्यूर साहेब मोठ्या आवेशानें सांगतात कीं "त्याच्यांत धर्मवेड तर होतेंच पण तें एखाद्या भूत लागलेल्या मनुष्याप्रमाणें" होतें. शिवाय, तो जाणूनबुजून वाईट काम करणारांपैकीं असून अगदीं लहानपणापासून त्याच्या ठकबाजीस सुरुवात झाली होती. परस्परविरुद्ध असे प्रकार येथून तेथून त्याच्या आयुष्यांत दिसून येतात. "अखेरीस आपण देवाचा प्यारा आहें असें मातून व ईश्वरानें मला प्रेरणा केली आहे असें ह्मणून तो दिवसाढवळ्या अनन्वित कर्में करूं लागला." "प्रकाशाकडे डोळे झांकून जो आपण होऊन काळोखांत चासपूं लागून दुःख भोगूं लागतो त्याजविषयीं आपला निर्णय दुसरा काय होणार आहे? ह्मणजे महमदानें डोळेझांक केली त्यायोगें त्यानें स्वतःसच ठकवून घेतलें असें ह्मणणें प्राप्त होतें." ( Life of Mahomet अध्याय ३७. )

५. यहूदी व ख्रिस्ती शास्त्रांस महमद कोणत्या प्रकारें मानीत असे याविषयीं म्यूर साहेबानें लिहिलें आहे तें असें :- यहूदी व ख्रिस्ती धर्मग्रंथ महमदानें उघडपणें रद्द केले किंवा ते ईश्वरप्रणीत नसून खोटे व अपुरे आहेत असें त्यानें ह्मटलें ही जी लोकांत समज आहे

ती अगदीं चुकीची आहे. कारण महमदाच्या तोंडांतून या ग्रंथांबद्दल अपशब्द तर कधींच निघाला नसून उलट तो त्यांस फारच पूज्य मानीत असून त्यांची प्रशंसा करीत असे." मुसलमान लोकांशीं वादविवाद करण्यास ही एक मोठी मुद्याची गोष्ट आहे. तसेंच, तिजवरून महमदाचा पैगंबरपणा सहजच नष्ट होऊन कुराण उघडपणें खोटें ठरतें. कारण कुराण व बायबल हीं परस्परविरुद्ध असल्यामुळें दोन्हीही खरीं असणें शक्य नाहीं.

६. महमदास अपस्माराची बाधा होती याविषयीं म्यूर साहेब व स्प्रेंगर साहेब हे दोघेही खातरीनें सांगतात. या व्याधीनें जेव्हां तो संतप्त होऊन फारच मूर्च्छितही होई तेव्हां आपणास ईश्वरी प्रेरणा झाली असें त्याच्या मनाला वाटे व त्यास ईश्वरी प्रेरणा झाल्याबद्दलचा पुरावा ह्मणून महमदाची मूर्च्छितावस्था असें त्याचे अनुयायी सांगूं लागले.

## २. महमदी धर्मांतील भेद.

महमदी धर्म सर्वत्र एकसारखाच आहे असें मात्र ह्मणतां येत नाहीं. समजुतींत व आचारांत त्याचे नाना प्रकारचे भेद झाले आहेत. त्याचे मुख्य पंथ ह्मटले म्हणजे सुन्नी व शिया हे होते. या दोहोंत कित्येक लहानसहान गोष्टींत व कित्येक मुद्द्यांच्या गोष्टींत बराच भेद आहे. शिया पंथाचे बहुतेक लोक इराणांत असून ते महमदाचा आल्ली नांवाचा जो जांवई होता त्यास देवाप्रमाणें मानितात.

वहाबी पंथ अरबस्थानांत उत्पन्न झाला. या पंथाचा उत्पादक इ० स० १६९१ या वर्षी जन्मला. निव्वळ महमदाच्या उपदेशाकडे लोकांचीं मनें वळवावीं असा त्याचा उद्देश होता. सर्व मुसलमानांत वहाबी लोकांइतके कडवे व आवेशी लोक सांपडणें कठीण.

सुफी ह्मणून एक चौथा पंथ आहे. या पंथाचीं मतें बहुतेक वेदान्त मतांप्रमाणें आहेत. इसलामी धर्मांतील कर्ममार्गास कंटाळून कित्येक धर्मपरायण लोकांची प्रवृत्ति गहन विचाराकडे झाली. ते हे सुफी लोक.

यांशिवाय बाबी ह्मणून एक पंथ आहे. त्या पंथाचे लोक फक्त इराणांत आहेत. हा पंथ सुफी पंथाप्रमाणें कांहींसा असून त्याचा कल ख्रिस्ती धर्माकडे आहे. या पंथांतील लोकांचा अतोनात छल झाला तथापि त्याचा बीमोड झाला नांहीं.

## ३. मुसलमानी धर्मांतील पाखंड.

महमदी धर्माचा प्रसार फारसा झाला नाहीं तोंच नवीं नवीं मतें अनेक ठिकाणीं उद्भवलीं. त्यांस लोक पाखंड मतें असें समजत असत. वसील इब्न अत्त या नांवाच्या मनुष्यानें मुत्तजला नामेंकरून जो एक पंथ काढला तो यांपैकींच होय.

खलीफ अलमामून व त्याच्या मागून झालेले दोन खलीफ हे या पंथाचे पुरस्कर्ते झाल्यामुळें त्याचा पगडा लोकांवर बराच बसला. कुराण स्वयंभू असून अनादि आहे हें मत या पंथाच्या लोकांस मान्य नव्हतें. सर्व गोष्टी पूर्णपणें दैवाधीन आहेत हेंही त्यांस कबूल नसून मनुष्य स्वतंत्र विचाराचा प्राणी आहे असें ते ह्मणत असत. कुराणाचा अर्थ करितांना ते त्यांतील बुद्धिवादाशीं जुळणाऱ्या गोष्टी मान्य करीत, इतर त्याज्य समजत असत.

अलमामूनच्या मागून जो तिसरा खलीफ गादीवर आला त्यानें या पंथाच्या लोकांचा छळ केल्यामुळें त्यांचें नांव बराच काळपर्यंत ऐकण्यांत आलें नाहीं व शेवटीं इ० सनाचे ११व्या शतकाचे सुमारास या पंथाचें नांव देखील राहिलें नाहीं.

प्रस्तुत काळीं या पंथाचे लोकांप्रमाणेंच कित्येक मुसलमानांचीं मतें बनून राहिलीं आहेत. ज्यांच्या मनावर उच्च प्रतीच्या शिक्षणामुळें पाश्चिमात्य ज्ञानाचा संस्कार घडला आहे अशा तरुण लोकांचीं मतें वरील पंथाप्रमाणें प्रायः असतात. मुसलमान लोक कुराणाच्या भावार्थाकडे दुर्लक्ष्य करून तें अक्षरशः खरें आहे असें मानून आपला मट्ठपणा मात्र व्यक्त करितात, व यामुळें सातव्या शतकांतल्या अरब लोकांसाठीं योजिलेले जे आचारविचार ते प्रस्तुत काळच्या लोकांवर लादणें हें त्यांस योग्य नाहीं अशी या नव्या मंडळीची तक्रार आहे. कुराण ईश्वरप्रणीत आहे या जुन्या समजुतीस या नव्या मंडळीनें अगदीं झुगारून दिलें आहे. कुराणाचा खरा अर्थ केल्यास सुधारणेच्या प्रगतीला त्याची अनुकूलता आहे असें ते खातरीनें सांगतात. उदाहरणार्थ, अनेक बायका करण्याची चाल, घटस्फोट करण्याची मोकळीक, वेश्यागमन, गुलामगिरी इत्यादि प्रकार जे कुराणांत सांगितले आहेत ते केवळ त्या काळच्या लोकांकरितांच असून ते निरंतर चालू ठेवण्याचा बिलकुल हेतु नव्हता असें ते प्रतिपादन करितात.

हे विचार फारच मौजेचे असून त्यांचा त्वरित प्रसार होण्याचा संभव आहे. जसजसा शिक्षणाचा प्रसार अधिकाधिक होत जाईल तसतसा वरील विचारांचा फैलाव होईल हें वेगळें सांगणें नको.

इसलामी धर्माचें खोगीर पाठीवर वागविणें फार कठीण आहे म्हणून अशा मतानुयायांचें करणें रास्त आहे असें आह्मांस वाटतें. परंतु या सुधारक मंडळीस यापुढें मुसलमान ह्मणवून घेण्याचा अधिकार उरला नाहीं; कारण हे लोक कुराणाच्या अर्थाचा अनर्थ करितात. या लोकांचा छळ हिंदुस्थानांत होत नाहीं हें त्यांचें मोठें भाग्य आहे असें ह्मटलें पाहिजे. हेच लोक जर तुर्कस्थान, अरबस्थान, इराण किंवा दुसरा एखादा मुसलमानी देश यांत असते तर तेथील राजांच्या प्रधानमंडळांनीं यांचा केव्हांच नायनाट करविला असता.



# परिशिष्ट ९.

जुना करार—नव्या करारावरून जुन्याचें प्रामाण्य किंवा स्वतंत्रपणें जुन्या कराराची प्रमाणसिद्धता—जुन्या करारार्चे प्राचीनत्व व अस्सलपणा हीं पुढील गोष्टींवरून ठरतात—१ यहूदी व ख्रिस्ती या दोन्ही लोकांस तो मान्य आहे—२ खालडी टारगम्स (खालडी भाषेंतील भाषांतरें)—३ ग्रीक भाषेंतील यहूदी पुस्तकें—४ सेपटुअजिंट (सत्तर पंडितांनीं केलेलें) भाषांतर.

जुना करार विश्वसनीय आहे—जगाच्या इतिहासाशीं बायूबलांतील इतिहासाचा संबंध—बाबिलन, आसिरिया, व मिसर आदीकरून देशांतील प्राचीन वस्तूंचा अलीकडील शोध—जुना करार ईश्वरप्रणीत असल्याचें अंतःप्रमाण.

बायूबलाचे जुना करार व नवा करार असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं नव्या करारार्चे ईश्वरप्रणीतत्व कितपत प्रमाणसिद्ध आहे या विषयींचा ऊहापोह ह्या ग्रंथांतून बराच केला आहे. आतां जुना करारही तसाच आहे हें सप्रमाण दाखविण्यास त्याच ग्रंथावरून काय आधार मिळतो याविषयीं थोडासा विचार करूं.

नवा करार ईश्वरदत्त आहे हें सिद्ध झाल्यानें जुना करारही तसाच आहे, हें अनुमान साहजिकच निघतें; मग तें सिद्ध करून दाखविण्याचें कारणच राहत नाहीं. नव्या कराराचे ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत वेळोवेळीं जुन्या कराराचा उल्लेख केला असून त्यास त्यांनीं एथून तेथून मनुष्यकृत न ह्मणतां ईश्वरदत्त शास्त्रच ह्मटलें आहे. "सर्व शास्त्र ईश्वरी प्रेरणेनें प्राप्त झालें आहे" असें पौलसाचें ह्मणणें आहे व पेत्रस ह्मणतो कीं "पवित्र आत्म्यानें ज्या प्रकारें देवाच्या पवित्र मनुष्यांस प्रेरणा केली त्या प्रकारें ते बोलते झाले." याप्रमाणें जुना करार ईश्वरदत्त आहे याबद्दलचीं प्रमाणें नव्या करारांत ओतप्रोत भरलेलीं आहेत. स्वतः येशू ख्रिस्तास जुना करार मान्य आहे व हें त्यानें अगदीं स्पष्ट व उघडपणें कबूल केलें आहे. त्यानें जुन्या करारास देवाचें शास्त्र असें ह्मणून त्यांतील वचनें अनेक प्रसंगीं सांगितलीं आहेत. उदाहरणार्थ, मात्थीच्या ५व्या अध्यायांतील १७वें वाक्य पहा. त्यांत तो म्हणतो कीं "नेमशास्त्र किंवा भविष्यशास्त्र यांस रद्द करायास मी आलों असें समजूं नका; तीं रद्द करायास नाहीं तर पूर्ण करायास मी आलों आहें." ह्याप्रमाणें नव्या करारार्चे ईश्वरप्रणीतत्व प्रथम शाबीत करून त्यावरून जुना करारही ईश्वरप्रणीत आहे हें सिद्ध करून दाखविण्याचा परिपाठ आहे, त्यासच अनुसरून आमची प्रस्तुतची योजना आहे.

जुना करार प्रथमतः हातीं घेऊन तत्संबंधानें प्रमाणभूत गोष्टी दाखविल्यानंतर त्यावरून नव्या करारार्चे परीक्षण करितां आलें असतें. परंतु आमचा मूळ संकल्प फक्त नव्या करारापुरताच होता. आतां त्यांतले त्यांत जुन्या कराराविषयींही दोन शब्द लिहूं. ह्मणजे यहूदी धर्मशास्त्र किती जुनें, कितपत अस्सल व प्रमाणभूत आहे हें प्रथमतः पाहूं, आणि मग तें ईश्वरदत्त आहे असें ह्मणण्यास तदंतर्गत जो आधार आहे त्याचें निरीक्षण करूं.

१ ज्याप्रमाणें यहूदी त्याप्रमाणेंच ख्रिस्ती लोकही जुना करार वाचीत असतात. ह्मणजे दोघांचाही तोच धर्मग्रंथ आहे, पण ख्रिस्ती धर्माचें खरें रहस्य विसरून प्राचीनकालीं ख्रिस्ती लोकांनीं यहूदी लोकांचा वारंवार अति छळ केला, व त्याचें भरपूर उसनें फेडण्याला यहूदी लोकांनींही कसूर केली नाहीं. दोघेही इट्टास पेटल्यामुळें कोणाचें बोलणें कोणास रुचूं नये हें साहजिक आहे. पण इतकें हाडवैर असूनही जुना करार उभयतांस मान्य व पूज्य ह्मणजे यहूदी लोकांचा जुना करार वेगळा व ख्रिस्ती लोकांचा जुना करार वेगळा असें मुळींच नाहीं. यावरून इतकें म्हणण्यास तरी निदान हरकत नाहीं कीं ख्रिस्ती धर्माच्या आरंभीं जुना करार होता व त्या वेळेपासून अद्याप आहे तसाच आहे.

जुन्या करारायें प्राचीनत्व पुढील यहूदी ग्रंथांवरून शाबीद करितां येईल:

२ (अ) खाल्डी भाषेंत जुन्या कराराचीं अनेक भाषांतरें असून शिवाय त्यांवर त्याच भाषेंत अनेक टीकाग्रंथही आहेत. हीं सर्व ख्रिस्ती धर्माचा मागमूसही नव्हता त्या पूर्वींचीं आहेत.

(ब) यहूदी लोकांनीं ग्रीक भाषेंत जे कित्येक ग्रंथ लिहिलेले आहेत त्यांवरून देखील ही गोष्ट सिद्ध होते. उदाहरणार्थ, Ecclesiasticus ह्मणून जें पुस्तक आहे, तें ख्रिस्ताच्या पूर्वीं २३२व्या वर्षाच्या सुमारास लिहिलेलें असून त्यांत जुन्या करारांतील मुख्य मुख्य ग्रंथांचा निर्देश केला आहे. (हें व जुन्या करारांतील याच नांवाचें पुस्तक हीं वेगवेगळीं आहेत हें लक्ष्यांत ठेवावें.)

(क) इ० सनाचे पूर्वीं सुमारें दीडशें वर्षांच्या सुमारास मिसर देशांत जुन्या कराराचा ग्रीक भाषेंत तर्जुमा होऊन त्याचा बराच फैलावही झाला होता. हा तर्जुमा सेपट्यु-आजिंट या नांवानें सुप्रसिद्ध असून त्याची योग्यता फारच आहे. जुना करार फार प्राचीन काळचा आहे व तो जसा होता तसाच अद्यापही आहे याचा निर्णय करण्यास याहून विशेष महत्त्वाचें दुसरें साधन क्वचित्च मिळेल. जुन्या करारांतलीं जीं अगदीं अलीकडील पुस्तकें आहेत त्यांच्या कालापर्यंत तर ह्या भाषांतराची मजल आहे. कारण हीं पुस्तकें कमींत कमी ख्रिस्ताच्या पूर्वीं निदान ४२० वर्षांचीं आहेत असें ह्मणण्यास ख्रिस्ती व यहूदी या दोन्हीही लोकांची हरकत नाहीं.

३ यावरून जुन्या कराराचा अगदीं अलीकडील भाग देखील इतका जुना आहे कीं त्यानंतर कित्येक शतकें लोटल्यावर ख्रिस्त अवतीर्ण झाला. परंतु त्यांतल्या त्यांत कांहीं भाग याहूनही जुना आहे. हें त्यांच्या भाषासरणीवरून व्यक्त होतें.

४ आतां जुन्या करारांतील लेख कितपत विश्वसनीय आहेत तें पाहूं. त्यांत मिसर देश, आसिरिया, बाबिलन, इराण, सिरया वगैरे पृथ्वीवरील मोठमोठ्या राष्ट्रांच्या इतिहासां-तील गोष्टी आढळतात ह्मणजे बायबलांतील ऐतिहासिक गोष्टींचा पडताळा एकंदर जगाच्या इतिहासाशीं मिळतो हें सिद्ध करितां येतें. या रीतीनें बायबलाच्या इतिहासाचा शोध केला ह्मणजे त्यांतील गोष्टींचा इतर ठिकाणच्या गोष्टींशीं पूर्णपणें मेळ दिसून येतो. मिसर

देशांतील जुन्या लिपीचा उलगडा करून व इराण, बाबिलोनिया, आसिरिया, वगैरे देशांतल्या शिलालेखांचा अर्थबोध करून जी नवीन माहिती उपलब्ध झाली आहे तिजशीं या सर्व गोष्टी ताडून पाहिल्या ह्मणजे आमच्या बायबलांतील ऐतिहासिक गोष्टीवर जो विश्वास आहे तो आणखी दृढ होतो. रॉलिनसनप्रभृति जी प्राचीन वस्तूंचा शोध करणारी मंडळी आहे त्यांनीं खुशाल सर्व लुप्त वस्तु बाहेर काढाव्या. त्यांपासून बायबलच्या इतिहासास बिलकुल बाध येण्याची भीति नाहीं. उलट ही सर्व प्राचीन शोधांची खटपट पाहिजेच आहे. जुन्या गोष्टी पूर्णपणें जितक्या बाहेर येतील तितक्या बायबलास इष्टच आहेत. त्यामुळें बायबलास जास्त बळकटी येते.

अंतःप्रमाण—जुना करार कडकडीत एकेश्वरवादी आहे तेव्हां अर्थात्च त्यांतला मूर्तिपूजानिषेधही तितकाच कडक असून त्यांतला नीतिबोधही त्याच प्रकारचा आहे.

ईश्वर ह्मणजे काय ? ह्मणजे तो ओळखावा कसा एतद्विषयीं जुन्या करारांत जें सांगितलें आहे तें असें : तो व्यक्तिस्वरूप असून सर्वशक्तिमान्ही आहे. यावत् सृष्टि त्यानें निर्माण केली असून तिचा नियंताही यद्यपि तोच आहे तथापि तिच्याहून तो वेगळा आहे. सद्वर्तनाबद्दल त्याचेजवळ बक्षीस आहे व दुराचार त्यास खपत नाहीं ह्मणून दुष्टांस तो शासन करणारा आहे. तो इतका पवित्र आहे कीं पापी त्याचे जवळ जाण्यास भितो, तथापि तो परम दयाळू आहे. आणि तो दयाळू आहे म्हणूनच पाप्यांचा बचाव होतो, कारण अनीति, अधर्म व पाप यांजबद्दल क्षमा करणें हें त्याचें ब्रीद आहे. ज्या अघोर व अपवित्र कर्मांपासून मूर्तिपूजकांचे देव संतुष्ट होतात अशी त्यांची समज आहे, त्या सर्व कर्मांचा त्यास अतिशय तिटकारा आहे. भगवद्भक्तांनीं नाना प्रकारचे उपासनेचे पोरकट मार्ग सोडून देऊन आणि देवावर व मनुष्यमात्रावर प्रेम ठेवून तदनुरूप स्वतःची वागणूक असूं द्यावी ह्मणजे झालें; कारण देवाला इतकेंच पाहिजे आहे. अंतःकरण तल्लीन नसून बाह्योपचारानें देवास शरण जाणें ह्याचा त्यास कंटाळा आहे. ज्या धर्मांत नीति नाहीं तो निव्वळ ढोंगी लोकांचा धर्म होय. जुन्या कराराची गोष्ट तशी नाहीं. त्यांत नीति व धर्म यांची कधींही फारकत केलेली नाहीं. नीतिशास्त्रास धरून सर्वथैव मनोभावेंकरून चाललेंच पाहिजे, याशिवाय गत्यंतर नाहींच. अशा प्रकारचें जुन्या कराराचें अनुशासन आहे. कारण त्यांत ह्मटलें आहे कीं "नीतिविशिष्ट प्रभूला नीतिच आवडणार" व "अंतर्यामीं सत्याची आवड हेंच त्यास पाहिजे आहे."

विधवा, अनाथ बालकें, कंगाल झालेले, गुलाम असे जे दुर्बळ किंवा निराश्रित त्या सर्वांवर मोठ्या आदरानें प्रेम ठेवण्याविषयीं फारच चटकदार व मनोहर शब्दांनीं जुन्या करारांत उपदेश केला आहे. यामुळें प्रोफेसर हक्स्ले साहेबांस जुन्या कराराची इतकी विशेष महती वाटली कीं त्यांनीं त्यास "गरीबदुबळे इत्यादिकांची ही एक ताम्रपत्रावरील सनदच आहे" असें ह्मटलें आहे. हें त्यांचें म्हणणें अगदीं यथायोग्य आहे.

जुन्या करारांतील "गीतें" हें फारच विलक्षण पुस्तक आहे. याविषयीं प्रोफेसर स्यांडे यांनीं आपल्या व्याख्यानांत असें ह्मटलें आहे, कीं "प्रार्थना व स्तोत्रसंग्रहाचें हें जगन्मान्य पुस्तक असून ह्याची भूत, भविष्य व वर्तमान कालीं सारखीच मान्यता असणार." हें पुस्तक होऊन आज कित्येक शतकें लोटलीं आहेत व या कालावधींत धर्माच्या बाबतींत व इतर अनेक विषयांत इतकी सुधारणा झाली आहे तरी धर्माच्या विषयांत ह्या प्राचीन पुस्तकाची बरोबरी देखील अद्याप कोणत्याहि ग्रंथानें केलेली नाहीं. यांत अंतःकरणास भिनणारीं सुरस वचनें किती तरी आहेत!

परमेश्वरच उलटा मनुष्याच्या पाठीमागें लागून त्याची मोठ्या आदरानें व कळवळ्यानें विनवणी करीत आहे कीं बाबा, पाप्याचा मार्ग सोड आणि आपला बचाव करून घे. "हें सोड, सोड, वृथा कां मरतोस?" असें परमेश्वराचें विलक्षण प्रकारें केलेलें वर्णन जुन्या करारांत आहे. परमेश्वर केवळ प्रेमस्वरूप आहे याविषयीं आमची जी कल्पना आहे, तिची मजल ह्या पायरीपर्यंत कधींही जात नाहीं. अशी उदात्त कल्पना जुन्या करारांत आहे.

आतां हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं परमेश्वराचें "प्रकटीकरण" उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेलें आहे. प्राचीन कालापासून तें चालूच आहे. जुन्या करारांत जें त्याविषयीं लिहिलें आहे तें तसेंच बऱ्याच अंशीं चालू राहून नव्या करारांत त्याची पूर्णता झाली आहे. प्रस्तुत जें जुन्या कराराविषयीं आह्मीं ह्मटलें आहे तें नव्याशीं फारच उत्तम तऱ्हेनें जुळतें. जो पाप्याचा तारणारा येशू ख्रिस्त त्याचें बोलणें, चालणें, मृत्यु इत्यादि गोष्टींचा मेळ जुन्या करारांत जें कथन करून ठेविलें आहे त्याच्याशीं उत्तम प्रकारें जुळतो.

आह्मीं वर ज्या गोष्टी जुन्या कराराच्या संबंधानें निर्दिष्ट केल्या आहेत, त्या मूर्तिपूजकांच्या प्राचीन ग्रंथांहून किती भिन्न आहेत, हें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येण्यासारखें आहे. तर मग त्यांस इतकी श्रेष्ठता कशी आली हें विचाराल तर त्यांस ईश्वरी प्रेरणेवांचून दुसरें कांहीं एक कारण नाहीं असें ह्मणणें भाग पडतें.

---

# परिशिष्ट १०.

## नेपोलिअन बादशाहाचा ख्रिस्ती धर्माविषयीं अभिप्राय.

नेपोलिअन बादशाहानें ख्रिस्ती धर्माविषयीं जें म्हटलें आहे ह्मणून सांगतात तें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. हा अभिप्राय निःसंशय त्याचाच आहे याबद्दल सबळ पुरावा मिळतो.

नेपोलिअन बादशाह सेंट हेलेना बेटांत अटकेंत असतां केक वेळां धर्मसंबंधी विषयावर ऊहापोह करीत असे. विजयाच्या उन्मादामुळें त्याच्या तोंडांतून ख्रिस्ती धर्मास अनुकूल असे उद्गार निघतील असें वाटलें नव्हतें. ज्याच्या हातून शेंकडों अनन्वित कर्में घडलीं त्यानें ख्रिस्ती धर्म खोटा ठरावा अशी इच्छा बाळगिल्यास नवल नाहीं. परंतु तो फारच थोर मनाचा असल्यामुळें ख्रिस्ती धर्मांत जें कांहीं त्यास चांगलें दिसून आलें त्याचा प्रतिकार त्याच्यानें करवेना.

डाक्टर बोग यांनीं नवा करार ईश्वरदत्त आहे या विषयावर एक उत्तम निबंध लिहून त्याची एक प्रत नेपोलिअन सेंट हेलेना एथील कारागृहांत असतां त्याजकडे पाठविली. त्यांत ख्रिस्ती धर्माविरुद्ध नास्तिक लोकांचे सामान्यतः येणाऱ्या मुख्य मुख्य मुद्यांचें खंडन केलेलें आहे. हें पुस्तक नेपोलिअन यानें मोठ्या आवडीनें वाचलें.

नेपोलिअन बादशाहाच्या तैनातीस वोनाव्ही नामक धर्मोपदेशकाची नेमणूक झाल्यावर त्यास कोणा एका इंग्लिश गृहस्थानें नेपोलिअन यास नजर करण्याकरितां एक बायबलाची प्रत दिली. ती मिळाल्यावर नेपोलिअन यानें तिचें चांगलें अध्ययन केलें. आणि तो दुखणाईत असतांना वारंवार येशूचें नामोच्चारण मोठ्या प्रेमानें करी असें त्याचे मरणकाळीं जवळ असलेल्या लोकांनीं सांगितलें.

नेपोलिअन यानें ख्रिस्ती धर्माविषयीं आपला अभिप्राय मरणयातना लागण्यापूर्वींच आपल्या नेहमींच्या वृत्तीस अनुसरून सांगितला तो असा :

"मीं पुष्कळ मनुष्यें पाहिलीं परंतु त्या सर्वांत ख्रिस्त अतिश्रेष्ठ आहे असें मी खातरीनें सांगतों. ख्रिस्ती धर्माचें मुख्य गुह्य हेंच आहे कीं तो दुसऱ्या धर्मांच्या आधारानें झालेला नसून त्यांत जो बुद्धिविशेष दिसून येतो तो कांहीं मानवी नाहीं. ख्रिस्तानें जीं वचनें सांगितलीं आहेत तशीं यापूर्वीं कोणींच सांगितलीं नाहींत. हल्लीं जे नवीन शास्त्रीय शोध झालेले आपण पहातों त्यांतलें कांहींएक ख्रिस्तानें घेतलेलें नाहीं. तसेंच त्यानें अमुक एका गोष्टीचें अनुकरण केलें असतें तर बरें होतें असें ह्मणण्यासही जागा नाहीं; किंवा त्याच्या तोडीचा पुरुष अद्याप निर्माण झालेला आपण पहात नाहीं. ख्रिस्तास तत्त्ववेत्ता ह्मणावें तर तसेंही नाहीं. त्याचे चमत्कारांवरून तो अलौकिक पुरुष होता हें निर्विवाद आहे आणि त्यामुळेंच त्याच्या अनुयायांस तो आरंभापासून पूज्य झाला. शास्त्रीय शोधांत तत्त्वज्ञानापासून मुक्तीचा मार्ग कांहीं मिळत नाहीं. ह्मणून स्वर्गींचें गुह्य व आत्म्याचें ज्ञान हीं प्रगट करण्याकरितां ख्रिस्त अवतरला. इहलोकीं येण्याचें त्यास फक्त इतकेंच कारण होतें. याहून दुसरें कांहीं नाहीं.

"मी मोठा बादशाह झालों व मीं मोठमोठीं राज्यें स्थापन केलीं. मजप्रमाणेंच शिकंदर बादशाह, सीझर, शारलमन वगैरे यांनींही पराक्रम केले पण हा सर्व पराक्रम कशावर? केवळ मणगटाच्या जोरावर. पण येशूचें राज्य तसें आहे काय? नाहीं. त्याचें राज्य प्रीतीच्या जोरावर चालतें. व त्यामुळें आजमितीला त्याच्याकरितां मरावयास तयार

असे लक्षावधि लोक आहेत. ख्रिस्ती धर्माचा दिग्विजय आज जो झाला आहे तो कांहीं एका दिवसांत किंवा एका लढाईनें झालेला नाहीं. हा दिग्विजय प्राप्त होण्यास सुमारें तीन शतकेंपर्यंत युद्धसंग्राम करावा लागला. त्याचा आरंभ प्रथमतः प्रेषितांपासून झाला असून त्यांच्या मागून तो तसाच अव्याहत चालू आहे. ह्या संग्रामांत एका पक्षास अनेक राजे व मोठमोठे बलाढ्य व पराक्रमी पुरुष असून दुसरीकडे पहावें तों फौज ना फांटा, परंतु सर्व पृथ्वीवर संचार करणारे कांहीं लोक. या लोकांचें युद्धसामर्थ्य पाहावें तों बाह्यतः कांहींएक नसून कोणासही न कळणारी अशी अजब परमेश्वरी शक्ति व ख्रिस्ताचा वधस्तंभ हेंच त्यांचें निशाण. या निशाणावर मात्र काय ती त्यांची भिस्त.

"मी तर अकालीं मृत्युमुखीं पडत आहें व हें माझें शव किड्यांमुंग्यांच्या भक्ष्यस्थानीं पडेल. ही माझी हतभाग्य स्थिति व ख्रिस्ताचें अक्षय्य राज्य या दोहोंत केवढें महदंतर! ख्रिस्ताचा महिमा चोहोंकडे लोक गाजवीत आहेत, त्याच्यावर त्यांचें प्रेम बसत चाललें आहे, आणि तो सर्वांस पूज्य होऊन राहिला आहे म्हणजे त्याचें साम्राज्य सर्व जगभर पसरत चाललें आहे. म्हणून ख्रिस्त मेला असें कसें म्हणतां येईल? तो जीवंतच आहे. तो चिरंजीव होऊन राहिला आहे."

इतकें बोलून नेपोलिअन थांबला. त्याचे जवळ बरट्रांड नांवाचा सरदार बसला होता. तो यावर कांहीं उत्तर करीत नाहीं हें पाहून बादशाह त्यास म्हणाला, "येशू ख्रिस्त हा देव आहे हें जर अझून तुझ्या ध्यानांत आलें नाहीं तर तुझी जनरलच्या जाग्यावर नेमणूक करण्यांत माझी मोठी चूक झाली असें मी समजतों."

---

# परिशिष्ट ११.

## बायबलाविषयीं कित्येक विद्वानांचे अभिप्राय.

कित्येक विद्वानांच्या ग्रंथांतून बायबलास अनुकूल असे पुष्कळ लेख देतां येतील. त्यांपैकीं कांहींचे उतारे दिले असतां कार्यभाग होईल असें आह्मांस वाटल्यामुळें पुढील निवडक उतारे वाचकांस सादर करण्याचें आह्मीं योजिलें आहे.

ज्या ग्रंथांतून हे उतारे घेतले आहेत त्या ग्रंथकारांविषयीं एतद्देशीय विद्यार्थिवर्गांत फारच पूज्यभाव आहे, हें आम्ही जाणून आहों.

**लार्ड बेकन**—"परमेश्वरा, तुझी सृष्टि हाच माझा धर्मग्रंथ, परंतु ज्ञानप्राप्तीला तुझें बायबल हें तिजहूनही विशेष आहे. राजदरबार, अरण्य किंवा राई ह्या ठिकाणीं तुझा मीं शोध केला तरी विशेषेंकरून तूं आपल्या भक्तमंडळींत असतोस असें मला दिसून आलें."

"ख्रिस्ती धर्मापासून मानवजातीची जशी उन्नति झाली तशी कोणत्याही तत्त्वशास्त्रानें किंवा पंथानें किंवा धर्मानें किंवा कायद्यानें किंवा सुशिक्षणानें झाल्याचें जगाच्या इतिहासांत आरंभापासून हा कालपर्यंत दिसून आलें नाहीं."

**कविश्रेष्ठ मिल्टन**—"बायबलांत जियोनाचीं गीतें जीं आहेत त्यांच्या तोडीचीं पद्यें कोठेंही मिळत नाहींत. तसेंच, बायबलांतील भविष्यवाद्यांचें वक्तृत्व व त्यांत सांगितलेली राजनीति ह्यांसही दुसरीकडे कोठेंही तोड नाहीं."

त्याच मिल्टन कवीनें आणखीही एके ठिकाणीं आपल्या काव्यांत म्हटलें आहे तें असें :

"कोणतेंही राष्ट्र सुखी कशानें होतें व त्यांत सुखोपभोग कशानें चालू रहातो व कोणत्याही राज्याची धूळधाणी कशानें होते व शहरें उद्ध्वस्त होऊन जमीनदोस्त कशानें होतात इत्यादि गोष्टींची माहिती पाहिजे असल्यास ती बायबलावांचून अन्यत्र मिळणेंच नाहीं. आणखी विशेष गोष्ट ही कीं बायबलांत हें सर्व इतकें सुबोध करून सांगितलें आहे कीं तें सहज रीतीनें कोणासही ग्रहण करितां येणारें आहे."

**लॉक**—"पवित्र शास्त्राचेंच व विशेषतः नव्या कराराचें अध्ययन करा, कारण त्यांत निरंतरच्या जीवनाविषयीं सांगितलें आहे. या शास्त्राचा कर्ता परमेश्वर असून मुक्तीचा मार्ग लोकांस कळावा हा त्याचा हेतु व निर्मलसत्य हा त्यांचा विषय होय."

**न्यूटन**—"तत्त्वशास्त्राची परमावधि बायबलांत झाली आहे."

"बायबलांतील इतिहास विश्वसनीय आहे यास तदंतर्गतप्रमाणें पुष्कळ आहेत परंतु तशीं जगांतील अवांतर इतिहासग्रंथांस आढळून येत नाहींत."

**डॉक्टर जॉनसन**—यानें आपल्या मरणसमयीं एका तरुण मनुष्यास येणेंप्रमाणें उपदेश केला : "मीं जगांत मोठी कीर्ति मिळविली व आतां लवकरच आपला हिशेब देण्याकरितां आपल्या उत्पन्नकर्त्यासमोर उभा रहाणार आहें, तेव्हां मी तुला अशी विनंती करितों कीं सर्वदा नेमानें पवित्र शास्त्र वाचीत जा."

**सर वुइलियम जोन्स**—"पवित्र शास्त्र ईश्वरदत्त आहे ही गोष्ट घटकाभर एकीकडे ठेवून तें पुस्तक नेमानें लक्ष्यपूर्वक वाचून माझी अशी पक्की खातरी झाली आहे कीं या पुस्तकांत जे प्रौढ विचार, जें माधुर्य, जी रसिकता, जी उत्तम नीति, जो काव्यरस, जें शहाणपण व जे उपयुक्त इतिहासलेख आढळतात तसे दुसऱ्या कोणत्याही पुस्तकांत आढळत नाहींत."

